हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमाला-पुस्तक १ लें.

# हिंदुसमाज समर्थ कसा होईल?

( द्वितीयावृत्ति )





उद्धरेदात्मनात्मानम् ।

—गीता

लेखक—महादेवशास्त्री दिवेकर

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमाला–पुस्तक पहिलें

उद्धरेदात्मनात्मानम्–गीता

# हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?

( सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति )



लेखक व प्रकाशकः—महादेवशास्त्री दिवेकर, वाई

मुद्रक

पूर्वार्धः—ल. भा. कोकाटे,
' हनुमान ' प्रेस, ३०० सदाशिव पुणें.

उत्तरार्धः—वामन वासुदेव अतीतकर, बी. ए.,
' नवीन समर्थ विद्यालयाचा '
समर्थभारत छापखाना, ९४७ सदाशिव पेठ, पुणें शहर.

मूल्य एक रुपया

के १८५२ ] [ रामनवमी

# अनुक्रमाणिका

## हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?

### ( पूर्वार्ध )



### (उत्तरार्ध)



---

# मातृदेवो भव

मातेची थोरवी किती वर्णन करावी? परमेश्वरी कृपेची मूर्ती म्हणजे माता होय. समर्थ म्हणतात, त्याचा महिमा कळेल कोणाला माता वाटून कृपाळू झाला। प्रत्यक्ष जगदीश जगाला। रक्षितसे॥ वीट नाही कंटाळा नाहीं। आलस्य नाहीं त्रास नाहीं। ऐसी माया माया कोठेंचि नाहीं। माते वेगळी॥ 'न मातुः परदैवतम्' या शास्त्र-सिद्धान्ताप्रमाणें तीर्थस्वरूप गंगाभागीरथी मातुश्री राधाबाई दिवेकर या देवतेच्या चरणीं हें पुष्प त्यांच्या सुपुत्रानें अर्पण केलें आहे.

---

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेचें पहिलें पुस्तक आज रोजीं महाराष्ट्र-वाचकांना सादर करण्याचा योग येत आहे त्याबद्दल अत्यानंद वाटतो. हल्लींच्या परिस्थितींत अशा तऱ्हेचें वाङ्मय मोठ्या प्रमाणावर लोकांपुढें यावयास पाहिजे. कारण हिंदुसमाजाच्या संघटनेचा प्रश्न सांप्रत निकडीनें पुढें आलेला आहे. परकीय राज्यसत्ता, जगाशीं आलेला संबंध, आधिभौतिक शास्त्रांची वाढ, लोकतंत्र शासनसंस्था, जीवनक्षेत्रांतील दुर्दम्य स्पर्धा आणि स्वयंनिर्णयासारखीं पुढें आलेलीं तत्त्वें यांमुळें हिंदुसमाजाची पुनर्घटना होणार यांत तिळप्राय संदेह नाहीं. ही पुनर्घटना समाजस्वास्थ्यसाधक आणि भावी राष्ट्रीय उद्धारला पोषक अशी व्हावी म्हणून अट्टाहासानें लोकजागृतीचे प्रयत्न केले पाहिजेत.

सिंहस्थीं नाशिक येथें भरलेल्या हिंदुधर्मपरिषदेपासून आम्ही आमचे धार्मिक व सामाजिक विचार प्राचीन परंपरा व देशकालपरिस्थिति यांचा समन्वय करून लेखनभाषणद्वारा महाराष्ट्रापुढें मांडीत आहोंत. हे आमचे विचार महाराष्ट्रजनतेला पसंत पडत आहेत, असा गेल्या सहा वर्षांचा अनुभव आहे. आजपर्यंत हें एकच कार्य एकनिष्ठपणें करण्याला बाह्य व आंतर परिस्थिती अनुकूल नव्हती. परंतु आतां आनुकूल्य आल्यामुळें हिंदुसमाजाचें निरीक्षण, स्मृतिसूत्रांचें वाचन, समाजशास्त्राचें अवलोकन आणि विचारवंतांशीं संभाषण करून तें कार्य भावी आयुष्यांत करण्याचा आमचा संकल्प आहे. त्याप्रमाणें गेल्या विजयादशमीपासून पौषअखेर लोकजागृतीचें कार्य नेमाड, वऱ्हाड व मध्यप्रांतांत आम्हीं केलें. पण दुर्दैवानें संग्रहणीच्या विकारामुळें तें बंद करावें लागलें. जनतेंत उत्पन्न केलेली जागृति स्थिर ठेवण्याकरतां वाङ्मयाची आवश्यकता आहे. म्हणून हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमाला काढून हिंदुसमाजाच्या भावी राष्ट्रीय उद्धाराला पोषक अशीं पुस्तकें मुद्रणमूल्यावर आणि भरपूर लोकाश्रय मिळाल्यास विनामूल्य देण्याचाहि आमचा विचार आहे. आमच्या विनंतीस मान देऊन हैद्राबादचे दानशूर गृहस्थ श्रीमंत वामन रामचंद्र नाईक हे आश्रयदाते झाले आहेत, हें कळविण्यास संतोष वाटतो. असाच लोकाश्रय मिळत गेल्यास वाङ्मयद्वारा लोकजागृतीचें कार्य सुकर होईल. मालेचीं पुढील दोन पुस्तकें 'पुनर्घटनेची चतुःसूत्री' व 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' हीं आहेत.

पुस्तकांतील कांहीं भाग लेखरूपानें स्वराज्य-पुणें, रणगर्जना-मुंबई व ब्राह्मण-पत्रिका-इस्लामपूर, यांमध्यें प्रसिद्ध केला आणि आकोल्यास सरकारी दवाखान्यांत पडल्यावर तेथें सर्व तऱ्हेची उत्तम व्यवस्था ठेवल्यामुळें इतर भाग लिहिला गेला. आज प्रकृति जी आठ आणे सुधारली आहे तिचें श्रेय आकोल्याच्या सरकारी दवाखान्यांतील अधिकाऱ्यांना व ज्यांनीं आमची सर्व तऱ्हेची उत्तम व्यवस्था तन, मन, धन खर्च करून ठेवली त्या श्रीमंत काकासाहेब आठल्यांना आहे, हें कृतज्ञतापूर्वक सांगितलें पाहिजे. लेखनाला श्री. पटवर्धन यांनीं मदत केली म्हणूनच हें पुस्तक इतक्या लवकर बाहेर पडलें. पुस्तक छापण्याचें काम व्यवस्थित व सुबक करून दिल्याबद्दल समर्थ भारत छापखान्याचे व्यवस्थापकहि प्रशंसेस पात्र आहेत.

शेवटीं त्या जगच्चालकाच्या चरणीं या मालेचें हें प्रथम पुष्प अर्पण करून अशीच सेवा करण्यास तो आम्हांस आयुरारोग्य देवो आणि हिंदुसमाज सुशीघ्र समर्थ होवो अशी प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितों.

शके १८४९ हनुमत् जयन्ति,<br>हिंदुसमाजोद्धारक कार्यालय,<br>पो. वाई, जि. सातारा.

महादेवशास्त्री दिवेकर.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेच्या प्रथम पुस्तकाची ही द्वितीयावृत्ति महाराष्ट्रवाचकांस सादर करण्याचा सुप्रसंग आज येत आहे त्याबद्दल धन्यता वाटते. पहिली आवृत्ति संपून एक वर्ष झालें. अवघ्या दोन वर्षांत प्रथमावृत्ति उडाली. यावरून या विचारांची आवड महाराष्ट्रांत कशी वाढत आहे याची कल्पना येते. या द्वितीयावृत्तींत ५० पानांचा विषय अधिक घालून पूर्वीपेक्षां चार प्रकरणेंहि अधिक आहेत. गेल्या तीन वर्षांत हिंदुसमाजांत ज्या खळबळी झाल्या, हिंदु महासभा, शुद्धिसभा, अस्पृश्य सभा इत्यादि सभांतून ज्या विद्वानांनीं हिंदुसमाजाबद्दल जे जे विचार मांडले, त्या सर्वांचा विचार करून ग्रंथाची मांडणी केलेली आहे. प्रथमावृत्तींत कांहीं विषय अपुरे व अस्पष्ट होते ते या वेळीं पूर्ण व स्पष्ट केले असून हिंदुसमाजसंबद्ध प्रमुख विषयांचा या आवृत्तींत अगदीं धागान्धागा उकलून दाखविला आहे. तात्पर्य, सर्व दृष्टींनीं ग्रंथ उत्तम केला असून तो सर्वस्वी नवीन ग्रंथ आहे असें वाचकांना वाटल्याविना राहाणार नाहीं.

तीन वर्षांपूर्वीं हिंदुसंघटनेची चळवळ बाह्यतः जोराची होती, परंतु ती आतां आंतून उचल करीत आहे. रूढिशरण व पुराणप्रिय समाज जागा झाला असून तो नवविचारांना आतां विरोध करीत आहे; उपेक्षा, विरोध व सहानुभूति या त्रयींतून आजवरच्या सर्व चळवळी तावून सुलाखून निघालेल्या आहेत. विरोध म्हणजे उत्कट स्पर्धा व तिला थोडें द्वेषाचें पाठबळ असा संबंध असतो. जे विचार लोकांच्या पोकळ आदराचें किंवा दयेचें स्थान न होतां **असूया व स्पृहा यांचें स्थान होतात**, तेच समाजांत पुढें अग्रेसर होतात, असा नियम आहे. त्या नियमानुसार या ग्रंथांतील विचार व ते धडाडीनें मांडणारी व्यक्ति कांहींचें मत्सरस्थान झाल्यास नवल नाहीं. म्हणजे याहि दृष्टीनें आमच्या विचारांचा आदर जनतेंत वाढत आहे याबद्दल आनंदच वाटतो.

प्रस्तुत लेखकाचा या विषयाशीं गेल्या दहा वर्षांचा परिचय आहे. हिंदुसमाजाच्या पुनर्घटनेची वा संघटनेची १४ कलमी योजना गुा नारायणशास्त्रीबुवा मराठे यांच्या संमतीनें आम्ही पहिल्या हिंदुधर्म परिषदेपुढें नाशिक येथें मांडली. त्या योजनेवर केसरीनें २१।९।२० च्या अंकांत प्रशंसापर स्फुट लिहिलें. २८।९।२० च्या केसरींत व इतर वृत्तपत्रांत आम्ही ती योजना प्रसिद्ध केली.

ज्ञानकोशाच्या पहिल्या खंडांत डॉ. केतकर यांनीं पृ. ४४२ वर तिचा उल्लेखहि केला आहे. गेलीं दहा वर्षे त्या योजनेनुसार आम्ही आमचे विचार देशकाल-परिस्थिति व प्राचीन परंपरा यांचा समन्वय करून निर्भयपणें व प्रामाणिक-पणें मांडीत आहोंत, हें महाराष्ट्रांस विदित आहे. हिंदुसंघटन व तदंतर्गत ब्राह्मण-संघटन, संस्कृतिरक्षण इत्यादि क्षेत्रांत अल्पस्वल्प कार्य आजवर करीत आहोंत व पुढेंहि हेंच कार्य करण्याचा निश्चय आहे. मात्र अकोला ब्राह्मण परिषदेपासून कांहींचा मत्सराग्नि पेट घेत असून दोन तीन वृत्तपत्रांतून व मासिकांतून धांधांत वैयक्तिक खोटीं विधानें प्रसिद्ध होत आहेत. ज्यांचें शिक्षण, व्यवसाय, वृत्ति व चारित्र्य ब्राह्मणवर्णोचित धर्माच्या अगदीं विपरीत आहे, ते लोक आज आम्हांला शिव्याशाप देत आहेत ! तसेंच ज्यांनीं आमच्या हिंदुसमाजाच्या पुनर्घटनेचे लेख आपल्या मासिकांच्या दुसऱ्या वर्षी गौरवपूर्वक छापले व ज्यांनीं आमच्याच विचारांचा अनुवाद आपल्या लेखांत केला त्यांनीं आतां मत्सरानें अद्वातद्वा लिहि-ण्यास प्रवृत्त व्हावें यासारखी आश्चर्यकारक गोष्ट कोणती ? महाराष्ट्रीय मत्सरग्रस्त मेंटॅलिटी ती हीच ! ! एका बाजूनें असा विरोध वाढतो आहे तों दुसऱ्या बाजूनें व्याख्यानांकरितां निमंत्रणांचा वर्षाव होत आहे. बृहन्महाराष्ट्रांतील कार्यकर्ते, पुढारी व संस्था यांचेकडून सारखीं निमंत्रणें येत आहेत. १०।१५ गांवच्या निमं-त्रणांना वर्ष दीड वर्ष होऊन गेलें. प्रकृतिदौर्बल्यामुळें येतां येत नाहीं असें लिहिलें तरी त्यांचे आग्रह आहेतच ! !

हिंदु या दृष्टीनें या ग्रंथांत सर्व विचार स्पष्ट मांडले आहेत. आमच्या या विचारास गु. नारायणशास्त्रीबुवा मराठे यांच्यासारख्या विद्वान्, तपस्वाध्यायनिरत, त्यागी व सज्जन गुरूंची सहानुभूति आहे. अशा गुरूंचे साह्य असल्यावर, सद्गुरुसारिखा असतां पाठिराखा । इतरांचा लेखा कोण करी ॥ या ज्ञानेश्वर-वाक्याप्रमाणें आम्हांला येरां मत्सरग्रस्तांना भिण्याचें मुळींच कारण नाहीं. तथापि टीकाकारांना येवढें स्पष्ट सांगतों कीं, ब्राह्मण्य, सनातनधर्म, आर्यसंस्कृति, शास्त्ररक्षण या सर्वांचा जेवढा अभिमान, जेवढी तळमळ, तुम्हांला असेल त्या पेक्षां कांकणभर आम्हांला अधिकच आहे. तुम्ही याविषयीं जो त्याग केला असेल व जें सक्रिय आचरण करीत असाल त्यापेक्षां आमचा कस अधिक वरचा लागेल हें पक्कें समजा. प्रामाणिकपणानें पाहिजे तसें मतखंडण करा. परंतु अप्रामाणिक, पोटभरू, द्रव्यमानलोभी, बेजबाबदार, उल्लु असलीं हलक्या

वृत्तीचीं द्योतक विशेषणें लावून स्वतःचा अधःपात करून घेऊं नका. दुसऱ्यावर शेणखळा उडवितांना आपले हातहि घाण होतातच. असो.

हा ग्रंथ तयार करण्यास पुष्कळांच्या उपयुक्त सूचनांचा उपयोग झालेला आहे. कार्यकर्त्या विद्वान् व विचारी लोकांशिवाय बाजूस असलेल्या व सोनेरी श्रृंखलेंत सांपडलेल्या लोकांनींहि उपयुक्त सूचना पाठविल्या आहेत त्याबद्दल त्या सर्वांचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत. विशेषतः आमचे स्नेही व ऋणानुबंधी कऱ्हाडचे श्रीमंत पांडुरंग केशव ऊर्फ आण्णासाहेब शिराळकर यांनीं हा ग्रंथ दोन तीन वेळां काळजीपूर्वक वाचून ज्या सूचना केल्या त्यांचा उपयोग फारच झालेला आहे. हा ग्रंथ ह्या वेळीं प्रसिद्ध होण्याचें श्रेय मालेच्या शाश्वत ग्राहकांना आहे. सुमारें २५ गृहस्थांनीं एकदम २५ रुपये देऊन शाश्वत ग्राहक वर्गांत नांवें नोंदलीं. त्याबद्दल त्यांचें आभार मानले पाहिजेत. मालेची सेवा लक्षांत घेऊन सर्वांनीं असेंच साह्य करावें अशी विनंति आहे. मालेच्या वाङ्मयाचा जे गृहस्थ कर्तव्यबुद्धीनें प्रसार करितात त्यांचा साभार नामनिर्देश आर्यसंस्कृतीच्या पूर्वार्धांतील प्रस्तावनेंत आम्ही केला; परंतु तो त्यांपैकीं पुष्कळांना रुचला नाहीं ! तथापि रोषादर पत्करून श्री. अलाटे, घोंगडे, श्री. धर्माधिकारी, रामभाऊ राजवाडे, श्री. देवचक्के, डॉ. हरीभाऊ गोगटे, श्री. नाईक, नानासाहेब फडके, श्री. जांबळे, डॉ. सावजी, श्री. शंकरराव किर्लोस्कर, श्री. आठवले, श्री. पुराणिक, इत्यादि गृहस्थांचा निर्देश आम्ही साभार करितों. त्याबद्दल त्यांनीं क्षमा करावी.

समर्थभारत प्रेस व हनुमान प्रेसच्या मालकांनीं उत्तरार्ध पूर्वार्धाचें काम काळजीपूर्वक केलें व श्री. रोडे मास्तर यांनीं पूर्ववत् लेखकाचें काम केलें.

शेवटीं ज्या दयाघन परमेश्वराच्या सत्तेनें हें चराचर जग चालतें त्याच्या चरणीं विलीन होऊन ईश्वरी कृपेची याचना करून हें प्रास्ताविक निवेदन पुरें करितों.

रामनवमी, १८५२.

हिंदुधर्मप्रचारक,
महादेवशास्त्री दिवेकर.

# हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?

## पूर्वार्ध

## प्रकरण पहिलें

---

### हिंदु संघटनाची भूमिका

हिंदुसंघटनाची चळवळ सुरू होऊन ८–१० वर्षें झालीं; तथापि अद्याप पुष्कळ समंजस हिंदूंनाहि या चळवळीचें रहस्य समजत नाहीं, मग अडाण्यांची तर गोष्ट राहोच ! कुणाला वाटतें ही चळवळ म्हणजे आचारलोप, वर्णलोप व धर्मलोपच आहे; परंतु हा त्यांचा केवळ भ्रम आहे. हिंदुसंघटन म्हणजे एकंकार नाहीं, गोलंकार नाहीं; तर हिंदुसमाजाच्या जीवनाचा, संस्कृतीचा आणि राष्ट्रीयत्वाचा प्रश्न म्हणजेच हिंदुसंघटन होय. यांत मुसलमानांवर चढाई नाहीं, ख्रिश्चनांशीं दांडगाई नाहीं, पारशांचा तिरस्कार नाहीं, व इतर अल्पसंख्य समाजांचा अधिक्षेपहि नाहीं. हिंदुसंघटन म्हणजे विधर्मी समाजाकडून स्वसमाजाच्या हक्कांची होणारी पायमल्ली थांबविणें व त्याला प्रतिकारक्षम बनविणें इतकाच अर्थ आहे. हिंदुसंघटन म्हणजे उल्लु वृत्तीची चळवळ नव्हे किंवा बुद्धीला पटेल तसें वागण्याची एकांडे शिलेदारी नव्हे. हिंदुसमाजांत पुष्कळ दिवसांपासून आलेला विस्कळितपणा घालविण्याचा अभ्यासपूर्वक यत्न करणें म्हणजे हिंदुसंघटन होय. वैदिक आर्यांचा अभ्युदयसूर्य मध्यान्हावर गेल्यानंतर ज्या अनेक कारणांमुळें तो मावळत्या दिशेस कलूं लागला, त्यांचा शोध करून हिंदुसमाजाची पुनर्घटना करणें म्हणजे हिंदुसंघटन होय. विधर्मीयांकडून वेळोवेळीं होणाऱ्या आघातांचा प्रखरपणें टिच्चून प्रतिकार करणें, आणि त्यायोगें परक्यांना आक्रमणबुद्धीनें पाहाण्याचा विचार करण्यास अवसर न देणें हें एक हिंदुसंघटनाचें नैमित्तिक अंग आहे. परंतु हिंदुसमाजाचें सांस्कृतिक दृष्ट्या, सामाजिक दृष्ट्या व राष्ट्रीय दृष्ट्या बल वाढविणें म्हणजेच हिंदुसंघटन होय.

**सांस्कृतिक महत्त्व**–आज जगामध्यें बौद्ध, ख्रिश्चन, इस्लाम आणि हिंदु अथवा आर्य अशा चार संस्कृति प्रमुख आहेत. जगांत सर्वांत अत्यंत जुनी संस्कृति म्हटली

म्हणजे आर्यसंस्कृति ही होय. आर्यसंस्कृतीलाच आज हिंदु संस्कृति असें म्हणतात. अर्वाचीन शोधांप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवर एकशेंपन्नास ते साठ कोटि एवढी लोकसंख्या आहे असें म्हणतात. रानटी, अर्धरानटी असा पांच कोटि मानवसमुदाय सोडून दिला तरी सत्तर बहात्तर कोटि लोक ख्रिश्चन संस्कृतीचे अनुयायी असून ते सत्ता, शस्त्र व शास्त्र यांनीं संपन्न आहेत. ५०।५२ कोटि लोक पूर्वेकडील भागांत बौद्ध संस्कृतीच्या नांवाखालीं मोडत असून तेही शस्त्र व शास्त्र यांनीं संपन्न आहेत. हिंदुस्थानांत आणि बाहेर असणारा मुसलमान समाजही संख्येनें २०।२२ कोटि असून तोहि सामर्थ्यांत कांहीं कमी नाहीं. शेवटीं जगांतलि दुबळा समाज म्हणजे हिंदुसमाजच होय. हिंदुसमाज संख्येनें २१।२२ कोटि असला तरी विस्कळित, अव्यवस्थित व दुर्बळ असा असल्यामुळें हिंदु संस्कृति जगांतून समूळ नष्ट होणार कीं काय अशीही शंका कित्येकांना येते. जगांतलि इतर समाज पाहिजे त्या पृथ्वीच्या भागावर यथेच्छ आक्रमण करीत असून आपआपल्या सत्ता स्थापन करीत आहेत, तर हिंदुसमाजाची त्याच्या घरांत म्हणजे हिंदूंच्या स्थानांतच गळचेपी होत आहे. हिंदुसमाजाला त्याच्या स्वतःच्या घरांत परकीय आक्रमणामुळें जशी मुळींच सत्ता नाहीं, त्याचप्रमाणें त्याला बाहेर त्राताहि नाहीं. **घरांत ना सत्ता व बाहेर ना त्राता** अशा स्थितींत हिंदु संस्कृति जगविण्याकरितां हिंदुसमाजानें संघटित होण्यास नको काय ? जगांतलि इतर संस्कृति जर डौलानें मिरविणार तर सर्वांत प्राचीन व महत्त्वाची अशी जी हिंदु संस्कृति तीही मिरवावयास नको काय ? जगांतील इतर तीन संस्कृतींनीं जर जागतिक कल्याण साधणार आहे तर त्या कल्याणाला भक्कमपणा आणण्याकरितां आणि जगांत शांतता, समता, बंधुत्व ठेवण्याकरितां हिंदु संस्कृतीची आवश्यकता नाहीं काय ? अद्वैत सिद्धांताची पताका घेऊन स्थितप्रज्ञाच्या मनोभूमिकेवर आरोहण करून जगाला इहपर कल्याणाचा मार्ग दाखविण्याचें कार्य परमेश्वरानें हिंदु संस्कृतिकडेच सोंपविलेलें असल्यामुळें तें सिद्धीस नेण्याकरितां हिंदुसमाजानें संघटित होणें अत्यावश्य आहे.

**राजकीय दृष्ट्या महत्त्व**—राजकारणाच्या दृष्टीनें हिंदु जाति संघटित होणें अत्यंतच महत्त्वाचें आहे. हिंदुस्थान देशाला स्वराज्य पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. स्वराज्याचा लढा लढण्याकरितां व मिळविलेलें स्वराज्य टिकविण्याकरितां हिंदुसमाजानें संघटित झालें पाहिजे. हिंदुसमाजाची संघटणा म्हणजेच हिंदु-

समाजाची एकी होय. स्वराज्य मिळविण्याकरितां जशी हिंदु-मुसलमानांची एकी झाली पाहिजे तशीच किंबा त्याच्याही पूर्वी हिंदुसमाजांतील घटकांची एकी होणें हें अत्यावश्य आहे. अनेक जाति, अनेक पंथ, अनेक आचार इत्यादि कारणांमुळें छिन्नविछिन्न झालेला हिंदुसमाज आधीं संघटित झाला तरच हिंदु व मुसलमान या समाजांत एकी होईल. **महात्मा गांधींच्या** म्हणण्याप्रमाणें हिंदु-मुसलमानांच्या एकीशिवाय जसें स्वराज्य मिळवितां येणार नाहीं, तसेंच तें रक्षणही करतां येणार नाहीं. कदाचित् एकटी हिंदु जातही स्वराज्य मिळवील ! पण एवढें निर्विवाद खरें कीं, **तुल्यबल झाल्याशिवाय कोणत्याही दोन समाजांत एकी संभवतच नाहीं.** महात्मा गांधींच्या म्हणण्याप्रमाणें हिंदु हा भ्याड, आणि मुसलमान हा मुजोर झालेला आहे. हिंदु-मुसलमानांमध्यें ऐक्य उत्पन्न होण्यास हिंदूंचा भ्याडपणा व मुसलमानांची मुजोरी हीं नष्ट केलीं पाहिजेत. पड खाऊन ऐक्य होत नाहीं, गय खाऊन होत नाहीं तर दोन्ही घटक जेव्हां स्वभाव, पराक्रम आणि कर्तृत्व यांनीं अगदीं बरोबरीचे होतात तेव्हांच त्यांच्यामध्यें एकी संभवते. हिंदु-मुसलमानांचें ऐक्य हें सबंध हिंदुस्थानांत, कदाचित् महाराष्ट्रांतच लवकर संभवेल. कारण उभय समाजांनीं एकमेकांस आपलें पाणी दाखविलें आहे. एकमेकांच्या सामर्थ्याची जाणीव असणें व समबलत्व स्थापन करणें हीं जर उभय समाजांच्या ऐक्याचीं साधनें आहेत तर त्याकरितां हिंदुसमाजानें संघटित व्हावयास नको काय ?

**लोकशाहीचें राज्य**—भविष्यकालांत लोकसत्ता स्थापन होणार हें निश्चित. मग हिंदुस्थानांतील लोकशाहीमध्यें हिंदु संस्कृतीचेंच प्रतिबिंब उमटावयास नको काय ? जगांतील इतर संस्कृतींचे ठसे निरनिराळ्या देशांतील राज्यपद्धतींत प्रतिबिंबित होण्यास अवसर आहे. हिंदुस्थानाव्यतिरिक्त या संस्कृतीला दुसरें कोणतेंच क्षेत्र अवशिष्ट नसल्यामुळें भावी लोकशाहींतही हिंदु संस्कृतीचाच संस्कार स्पष्टपणें दृग्गोचर झाला पाहिजे. हिंदुस्थानांत बरेच अल्पसंख्य अहिंदु समाज आहेत. त्यांच्या संरक्षणाची हमी केव्हांही घेतली जाईल, पण उद्यां लोकशाहींत अहिंदु समाजांची जर अरेरावी सुरू झाली तर पुनर्जन्मावर विश्वास ठेवणें हाही गुन्हा होईल आणि हिंदु संस्कृतीच्या तत्त्वज्ञानाचा उच्छेद होण्याचा प्रसंग येईल. कांहीं समाजांत पातिव्रत्याला सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वच नाहीं; एका वेळीं चार बायका असल्या म्हणजे झालें. मग दरसाल पुरुषांनीं बायका बदलल्या आणि

बायकांनीं नवरे बदलले तरी फिकीर नाहीं ! अशा कल्पनांच्या समाजाचा वरचष्मा लोकशाहीच्या स्वराज्यांत झाल्यास स्त्रीनें पतिव्रताधर्मानें राहाणें हा एक बहुमतानें अपराध समजला जाईल. विद्वान् व त्यागी मनुष्याचें मत विचारांत अवश्य घ्यावें असा आर्य संस्कृतीचा दंडक आहे. पण मताधिकार हा केवळ रुपये, आणे, पैवर ठेवला, तर संस्कृतीचें सौभाग्य जी विद्या व त्याग त्यांचा लोपच होऊन जाईल. यास्तव भावी लोकशाहींतही संस्कृतिवैशिष्ट्य कायम ठेवण्याकरितां हिंदुसमाजानें जागरूकपणानें संघटित झालेंच पाहिजे.

स्वराज्याकरितां हिंदु-मुसलमान समाजांचें टिकाऊ ऐक्य पाहिजे हें जर खरें तर मुसलमानांनीं या चळवळीला मुळींच बिचकण्याचें किंवा बुजण्याचें कारण नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे. उद्यां स्वराज्याकरितां दहा कोट सैन्य पाहिजे असें ठरलें व त्यापैकीं पांच कोट सैन्य मुसलमानांनीं ते लढवय्ये असल्यामुळें एकदम उभे केलें तर हिंदूंना तितकें सैन्य उभारावयास नको काय ? एकट्या क्षत्रिय जातींतून येवढें सैन्य उभारणें कठीणच आहे. अर्थात् सबंध हिंदु समाजांतून येवढें सैन्य उभारण्याकरितां हिंदुसंघटनच केलें पाहिजे. एकटे मुसलमान हिंदूंच्या मदतीशिवाय हिंदुस्थानांत कधींही स्वराज्य मिळवूं शकत नाहींत व मिळवूं शकले तरी तें टिकवूं शकत नाहींत; यास्तव असंघटित हिंदुसमाज ही आपल्या गळ्यांतील एक धोंड आहे असें समजून मुसलमानांनीं हिंदुसंघटनाला साह्यच केलें पाहिजे. स्वराज्यदृष्ट्या हिंदुसंघटनाची चळवळ हिंदुसमाजाप्रमाणेंच मुसलमानसमाजासहि उपकारक आहे. या चळवळीमुळें हिंदुसमाज मुसलमानांशीं तुल्यबल होणार आहे यापेक्षां कांहीं अधिक नाहीं.

खिलाफतीच्या चळवळीमुळें मुसलमानांमध्यें आक्रमणशीलता आली. अर्थात् हिंदूंना प्रतिकारक्षम होण्याकरितां हिंदुसंघटनाची चळवळ करावी लागली. हिंदुसंघटणेचा उगम जरी मुसलमाननिमित्तक असला तथापि तो आतां तसाच राहाणें शक्य व इष्ट नाहीं. हिंदूंनीं स्वराज्याकरतां अवश्य संघटित झालें पाहिजे व **मुसलमाननिरपेक्ष स्वराज्य मिळविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगिली पाहिजे.** हिंदूंनाच हिंदुस्थानचें राज्य पाहिजे आहे. कारण हिंदूंनाच तो आपला देश वाटतो, इतरांना वाटत नाहीं. आज हजारों वर्षें हिंदुस्थानाकरितां हिंदु जातीनें आत्मयज्ञ केला आहे, शेंकडों कुटुंबें धुळीस मिळविलीं आहेत, व हजारों तरुणांचे बळी स्वातंत्र्य-चामुंडेला अर्पण केले आहेत. हिंदूंच्या उत्तम कवींनीं या पुण्यभूल

आपलें काव्य अर्पण केलें आहे तर हिंदूंच्या सर्व वीरांनीं या पितृभूच्या रक्षणाकरितां आपलें रक्त ओतलें आहे. मुत्सद्यांनीं आपलीं डोकीं व कलावंतांनीं आपली शिल्पकला या मातेच्या रक्षणाकरतांच खर्चीं घातलेली आहे. एवढा त्रिकालाबाधित संबंध हिंदूंचा व हिंदुस्थानाचा आहे. तेव्हां स्वराज्याकरतां कोणीही यत्न न केले तरी हिंदूंना ते केलेच पाहिजेत आणि मुसलमान व ख्रिश्चन हे या कामीं मदतगार झाले तर ठीकच, पण न झाले तरी हिंदूंना त्यांच्या साहाय्यावांचून स्वराज्य मिळविणें अपरिहार्य आहे. हिंदुजाति संघटित झाल्यावांचून हें स्वराज्य मिळणार नाहीं व मिळालें तरी टिकणार नाहीं. हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यानें स्वराज्य मिळालें तर तें नको म्हणणारा पामर या दुनियेंत नाहीं. परंतु मुसलमानसमाजाची जी आज स्वार्थी मनोवृत्ति दिसते ती पाहिली म्हणजे या दोन समाजांचें ऐक्य अशक्य वाटतें. सामान्य फकिरापासून तों जिना, महंमद अल्लींसारख्या पुढाऱ्यांपर्यंत एकच वृत्ति कीं, जींत स्वराज्यापेक्षां समाजस्वार्थाचाच काटा ढळता दिसतो ! मुसलमानांच्या सर्व हालचालींचा कयास आतां झालाच आहे. म्हणून मुसलमाननिरपेक्ष स्वराज्य मिळविण्याकरितां हिंदूंनीं संघटित झालें पाहिजे. सर्वस्वावर लाथ मारणारे एक कोट लोक स्वराज्य मिळवूं शकतात असा जगाचा इतिहास सांगत नाहीं काय ?

एकंदरींत कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी हिंदुसमाजानें संघटित होऊन सामर्थ्यवान् झालें पाहिजे यांत संशय नाहीं. हिंदुसमाजाला समर्थ करण्याचे यत्न ज्यांना करावयाचे असतील त्यांनीं आपल्यापुढें ध्रुवाच्या ताऱ्याप्रमाणें दोन अढळ तत्त्वें ठेविलीं पाहिजेत. पहिलें तत्त्व हें कीं, हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे. तें फार मोठें असलें तरी त्यांतील प्रचंड हिंदुसमाजांत एक संस्कृति, एक परंपरा व एकराष्ट्र यांच्या कल्पना वेदकालापासून अनुस्यूत आहेत. दुसरें तत्त्व असें कीं, हिंदुसंघटनाचें कार्य म्हणजे वैदिक आर्यांच्या संस्कृतिप्रसाराचेंच कार्य होय. हें कार्य त्यांनीं दीर्घकालापर्यंत चालविलें होतें तें मध्यंतरीं खंडित झालें. खंडित झालेलें कार्य पुढें चालविणें; अर्थात् वैदिक संस्कृति हिंदुसमाजाच्या नसानसांत पोंचविणें म्हणजेच हिंदुसंघटन होय. या दोन तत्त्वांचा अमळ विस्तरशः आतां विचार करूं.

हिंदुस्थान हें फार मोठें राष्ट्र आहे. तें इतकें मोठें कीं, जवळ जवळ एका खंडाएवढें आहे. पण तें एक राष्ट्र नसून एक खंड आहे अशी कल्पना करून घेणें

अत्यंत चुकीचें आहे. प्रांतभेदानें भाषा भिन्न असल्या तरी एक राष्ट्रीयत्वास बाध येत नाहीं. हिंदुस्थान म्हणजे हिंदूंचें स्थान. हिंदु संस्कृतीचे सर्व अनुयायी आणि कांहीं मतभेदानें जरा बाजूस गेल्यासारखे भासविणारे सर्व समाजी हे सर्व हिंदु होत, व ते एकराष्ट्र होत. या मोठ्या राष्ट्रांत परस्परविरुद्ध असे आचार, परस्परविरोधी असे आहार व चालीरीति पाहून पुष्कळ लोक भांबावून हें राष्ट्र म्हणजे खंड आहे असें युरोपियन लोकांप्रमाणें म्हणतात. परंतु वेदकालापासून हे एक राष्ट्र आहे ही कल्पना आपल्या वैदिक इतिहासांतहि दिसते.

वैदिक आर्यांची पहिली वसाहत सप्तसिंधूच्या कांठीं पंजाबांत होती हें सिद्ध आहे. अग्निहोत्रपुरःसर जेव्हां त्यांच्या वसाहती वाढूं लागल्या तेव्हां विस्तार पावलेल्या सर्व आर्यांमध्यें त्यांनीं एकराष्ट्रीयत्वाचें सूत्र ओंवण्यास प्रारंभ केला. गंगा, यमुना, सरस्वती, शोणभद्रा, ब्रम्हपुत्रा इत्यादि नद्यांना ते ' राष्ट्रवर्धनी शिवतमा ' अशा विशेषणांनीं ओळखूं लागले. कारण त्या वेळीं राष्ट्राच्या मर्यादा नद्या व पर्वत यांनींच आखल्या जात होत्या. वरील महानद्यांविषयीं ते म्हणतात—

**इमा आपः शिवतमा इमा राष्ट्रस्य भेषजीः ।**
**इमा राष्ट्रस्य वर्धनीरिमा राष्ट्रभृतोपमाः ॥**

वैदिक आर्यांनीं जी एकराष्ट्रदृष्टि " इमं मे गंगे यमुने सरस्वति " या मंत्रांत दाखविली तीच पुढें त्यांच्या वैदिक संतानानें पौराणिक वाङ्मयांतील

**गंगेच यमुनेचैव गोदावरि सरस्वति ।**
**नर्मदे सिंधु कावेरी जलेऽस्मिन् संनिधं कुरु ॥**

या श्लोकांत दाखविली आहे. रामायणकालीं वैदिक आर्यांनीं आपलें अग्निहोत्र लंकेपर्यंत नेलें. रामचंद्रानें लंकमध्यें विजयोत्सवानें प्रवेश केला व आसेतुहिमाचलापर्यंत एकछत्री सत्ता स्थापन केली. दक्षिणेंतील निरनिराळ्या राजांनीं रामचंद्राला सार्वभौमत्वाचा मान ज्या दिवशीं दिला तो दिवस म्हणजे एकराष्ट्रीयत्वाचा जन्मदिवस होय. कारण त्याच दिवशीं आर्य व अनार्य हे दोघेही एकत्र होऊन ते दोघे एका राष्ट्राचे संयुक्त घटक बनले. ही संयुक्तता भारतकालीं नष्ट होऊन ती एकरूप झाली. भारतवर्ष—भरतखंड हें नामाभिधान या महत्तर राष्ट्राला मिळालें. हा भरत वेदकालीन होता का भारतीय दौष्यंती होता हा विषय जरी वादग्रस्त असला, तथापि तो वैदिक होता हें खरें आहे. म्हणूनच तेव्हांपासून या राष्ट्राची व्याख्या पुढीलप्रमाणें झाली.

उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणम् ।
वर्षं तद् भारतं नाम भारती यत्र संततिः ॥

म्हणजे सप्तसिंधूचें आर्यावर्त, व आर्यावर्ताचें भारतवर्ष, अशी उत्क्रांति या कल्पनेची झाली.

वैदिक आर्यांचा आक्रमणशील व विजिगीषु स्वभाव संस्कृतिप्रसारांतही दिसून येतो. वैदिक आर्यांनीं या खंडांत वैदिक वाङ्मयाबद्दल आसेतुहिमाचलापर्यंत सारखा आदर उत्पन्न केला आहे. वैदिक वाङ्मय, तन्मूलक संस्कृति आणि शास्त्रें यांबद्दल काशीपासून रामेश्वरापर्यंत ( म्हणजे लांबीच्या दृष्टीनें लंडनपासून कान्स्टाटिनोपलपर्यंत ) एकवाक्यता उत्पन्न केली ही कामगिरी काय थोडी आहे ? काशीरामेश्वराचे पंडित संस्कृत भाषेंत जिवंत विचार एकमेकाला सांगूं शकतात हें केवढें एकरूपतेचें धोरण ! संस्कृत भाषासंभव संस्कृतीबद्दल या खंडाच्या चारी कोंपऱ्यांत जो आज आदरभाव आहे तो वैदिक आर्यांच्या धोरणामुळेंच होय. सर्व समाजांत व स्त्रियांतसुद्धां वेद हे जसे पूज्य समजण्यांत येतात त्याप्रमाणें भारत–रामायणसंबद्ध गोष्टी, कविता व गाणीं हीं हिंदुस्थानच्या सर्व भागांत अतीव पवित्र मानतात. रामायण–भारतांतील गोष्टी सर्वत्र अत्यंत प्रेमानें सांगितल्या व ऐकल्या जातात. हिंदुसमाजांतील कोळी, कैकाडी फार काय पण अस्पृश्य वर्गांतसुद्धां रामायण–भारत गेलेलें आहे. स्त्रियांच्या तोंडीं भारतरामायणांतील कविता व गाणीं हीं आढळतात. संस्कृत भाषा ही देववाणी अशा भावनेनें तिची जोपासना पंडित वर्ग आजपर्यंत करीत आलेला आहे आणि अशा पंडित वर्गाचा चरितार्थ चालविण्याची वृत्ति सामान्य जनतेमध्येंही वैदिक आर्यांच्या ह्या धोरणामुळेंच उत्पन्न झालेली आहे. वैदिक वाङ्मय, भारत–रामायण, देववाणी व संस्कृत भाषासंभव संस्कृति या सर्वांबद्दल जसा आदर आहे तसाच काशी, रामेश्वर, जगन्नाथ, द्वारका, या चौंरही दिशांस असणाऱ्या तीर्थांबद्दल व पवित्र स्थानाबद्दल कन्याकुमारीपासून बदरीकेदारापर्यंत सर्व हिंदुसमाजांत जो आदर आहे तो वैदिक आर्यांच्या संस्कृतिप्रसाराचेंच फल होय. दक्षिण हिंदुस्थानांतील हिंदु हे अयोध्या, मथुरा, माया यांना जितका मान देतात; गंगा, यमुना नद्यांना जितकें पवित्र समजतात, तितकाच आदर उत्तरेकडील हिंदु लोक कांची, रामेश्वर, मदुरा या स्थानांविषयीं व तुंगा, कावेरी या नद्यांविषयीं दाखवितात. चार धाम, बारा ज्योतिर्लिंगें, सप्त पुऱ्या, गंगा,

यमुना, नर्मदा, गोदावरी, कृष्णा, तुंगभद्रा, कावेरी इत्यादि पवित्रतादर्शक तीर्थीविषयीं सर्वत्र सारखा आदर आहे.

सबंध हिंदु जातींमध्यें एकाच तऱ्हेचें हिंदु व्यवहारशास्त्र आज रूढ आहे. रघुनंदन भट्टाचार्य, जीमूतवाहन, विज्ञानेश्वर या टीकाकारांत जरी कांहीं मतभेद असले तथापि सर्वांचे प्रमाणग्रंथ एकच आहेत व त्यांचें मूळचें स्वरूप न बदलूं देण्याविषयींचें सर्वांचें धोरण एकच आहे. कायद्याप्रमाणेंच उत्सव, सण, जत्रा इत्यादि एकराष्ट्रीयत्वाचीं बंधनेंच आहेत. दसरा, दिवाळी आणि होळी हे सण हिंदुस्थानच्या कोणत्या प्रांतांत नाहींत ? दिवाळीचा सण असा आहे कीं त्या वेळीं प्रत्येक झोंपडींत कांहीं नाहीं तरी एखादी पणती पेटलेलीच दिसते. राखीबंधनाचा महोत्सवही या ना त्या स्वरूपांत सर्वत्र आहे. जगन्नाथाची रथयात्रा, अमृतसरची वैशाखी, कुंभ आणि अर्धकुंभ मेळे, श्रीशैल्य मल्लिकार्जुनाची शिवरात्रीची यात्रा, मकराची काशीची यात्रा, या सर्व यात्रा म्हणजे महापरिषदाच होत. ह्यांच्या योगानें आपल्या जीवनाचा प्रवाह राष्ट्रामध्यें सतत वाहात ठेवला जात आहे. तात्पर्य, समान वाङ्मय, समान भाषा, समान दैवतें, समान यात्रा, समान उत्सव, समान व्रतेंवैकल्यें आणि समान व्यवहारशास्त्र यांमुळें जी हिंदु जाति आज एकरूप दिसत आहे ती वैदिक आर्यांच्या एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेनें केलेल्या संस्कृतिप्रसाराचीच परिणति होय.

वैदिक आर्यांनीं भिन्नत्वांत अभिन्नता, भेदांत अभेद, अनेकत्वांत एकत्व उत्पन्न केलें आहे. हिंदुसमाजांत अनेक देव, अनेक पंथ, अनेक आचार, अनेक तत्त्वज्ञानें हीं असलीं तरी त्या वैचित्र्यात एकत्वाचें तत्त्व अनुस्यूत आहे. हिंदु समाजांतील सर्व पंथ वेदानुकूल किंवा वेदविरोधी असले तरी वेद हें केंद्र सर्वत्र दृढ आहे. या केंद्राभोंवतीं भिन्न भिन्न पंथांचें कुंपण पडलेलें आहे. शिव, विष्णु, रुद्र, आदित्य, गणपति, राम, कृष्ण, विठ्ठल, हनुमान इत्यादि अनेक दैवतें असलीं तथापि त्यांचा समन्वयानें विचार करण्याचें तत्त्वज्ञान आर्यांनीं उत्पन्न केलेलें आहे. स्मार्त, वैष्णव, शैव, गाणपत्य, शाक्त इत्यादि पंथ आणि द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैतादि संप्रदाय असले तरी त्यांतहि अभेद बुद्धीनें पाहाण्याचेंच धोरण वैदिक आर्यांनीं शिकविलें आहे. त्यांची संस्कृतिप्रसाराची दृष्टी अतिशय व्यापक व उदात्त होती. आस्तिक मताप्रमाणें नास्तिक मतांनाही त्यांनीं मान दिला असून सत्‌शास्त्रांप्रमाणें असत्‌शास्त्रांनाही स्थान ठेवलेलें आहे.

मनुष्य-स्वभाव, मानसशास्त्र, मानवी अंत:करणांतील अनेक वृत्ति, यांचें परीक्षण करून संस्कृतिप्रसाराचें धोरण आंखलेलें दिसतें. पाहिजे तो देव भज, पाहिजे तें कर्म कर व पाहिजे त्या साधूस मान, पण भक्तींत अहेतुकता, कर्मांत निष्कामता व तत्त्वज्ञानांत उदात्तता असली म्हणजे झालें. एकाच समाजाच्या घटकांत मतांतरें असलीं तरी समाजांतरांची आवश्यकता नाहीं, असें त्यांचें तत्त्वज्ञान आहे. आणि हेंच कार्य पुढें चालवावयाचें आहे. भगवान् बुद्धाच्या क्रांतीपर्यंत हें कार्य अखंड व अव्याहत चाललें होतें. बुद्धाच्या क्रांतीनें वैदिक आर्यांच्या संस्कृतिप्रसाराच्या धोरणाला पायबंद घातला आणि मुसलमानांना बद्धमूल होण्यास संधि साधून दिली. मुसलमान व ख्रिश्चन हे आल्यापासूनच मतांतर म्हणजे धर्मांतर आणि धर्मांतर म्हणजे समाजांतर अशी प्रथा सुरू झाल्यामुळें या पाखंडांनीं फारच अस्वास्थ्य उत्पन्न केलें. मुसलमानांची रक्तपिपासा, क्रूरता, कपटनीति आणि विश्वासघात यांपुढें हिंदुसमाजाचा टिकाव लागला नाहीं. मराठे, रजपूत व शीख यांनीं थोडी उचल करून इस्लामचा प्रतिकार केला, पण प्रतिकार करतां करतांच हे जेरीस आल्यामुळें संस्कृतिप्रसाराचें कार्य त्यांना फारसें करतां आलें नाहीं. त्या दीर्घ कालांत बचावाशिवाय कांहींच झालें नाहीं आणि नांदा व नांदूं द्या या सहिष्णु वृत्तीमुळें संस्कृतिप्रसार हळू हळू करीत सर्व समाजांना एका तत्त्वाच्या केंद्रांत पचविण्याचें कार्य घडून आलें नाहीं. हिंदुसमाजाला समर्थ करण्याकरितां समाजांतील सर्व घटकांमध्यें एकरूपता उत्पन्न करणें, त्यांतील अस्वाभाविक वैषम्य आणि वैलक्षण्य घालविणें व हें सर्व हळू हळू संस्कृतिप्रसारानें घडवून आणणें हीं कार्यें केलीं पाहिजेत. परकीय सत्ता ही केव्हांही वाईटच, पण त्या वाईटाचाही चांगला उपयोग करून घेण्याची योजना दुर्लभ योजक करीत असतो. परकीय राजसत्तेमुळें हिंदुसमाजाचा हल्लीं सर्व जगाशीं संबंध आलेला आहे. जगांतील निरनिराळे शोध, साधनें, समाजधारणेचीं मतें यांचा संबंध हिंदुस्थानाशीं येऊं लागल्यामुळें जगाच्या जीवनकलहांत हिंदुसमाज आतां पडलेला आहे. एकाच पद्धतीचें राज्य, एकाच पद्धतीचा जुलूम, एकाच तऱ्हेचें शिक्षण, एकाच तऱ्हेचें न्यायदान इत्यादि कारणांमुळें आसेतुहिमाचलापर्यंत एक प्रकारची एकरूपता येत आहे व समाजांतील दूरदूरच्या घटकांमधील अंतर सारखें तुटत आहे. विद्यार्थी बारा वर्षांच्या परिश्रमानें शिक्षक व स्वत: यांमधील अंतर तोडतो, गरीब मनुष्य दीर्घोद्योगानें श्रीमंत व आपण यांमधील अंतर तोडतो. तसेंच

अंतर तोडण्याचें कार्य मागासलेल्या थराकडून स्वाभाविकच होत आहे. हिंदुसमाजांतील कांहीं थर फार पुढारलेले व कांहीं फार मागासलेले असे आहेत व त्यांमध्यें महदंतर आहे. हें अंतर शिक्षण, सभ्यता व संस्कृतिप्रसार यांनीं तुटलें म्हणजे हिंदुसमाज समर्थ होईल. समाजांतील असंतोष, समाजांच्या स्पर्धा व हालचाली, महर्घता आणि दळणवळणाचीं साधनें यांमुळें हें अंतर झटाझट तुटत आहे. तें पद्धतशीर तोडणें, संस्कृति पचवीत पचवीत मागच्या थरांना जवळ आणणें संस्कृतिवैशिष्ट्य ठेवून समाजांतील घटकांत तुल्यबलत्व उत्पन्न करणें असें मोठें व्यापक व उदात्त कार्य झालें कीं हा समाज समर्थ होईल.

संस्कृतिप्रसाराचें हें कार्य करण्याकरितां हिंदुसमाजाचा सहिष्णु स्वभाव बदलून तो जयिष्णु केला पाहिजे. आर्यांचा वेदकाळचा इतिहास पाहिला तर त्यांत त्यांची विजिगीषा बुद्धीच आढळते. आर्यांचें मूलस्थान उत्तर ध्रुवाकडे होतें असें म्हटलें तरी तेथून आर्य जगभर पसरले व त्यांनीं जग जिंकलें हेंच सिद्ध होतें. श्री. पावगींच्या म्हणण्याप्रमाणें हिंदुस्थानांतील आर्य उत्तरेकडे गेले असें मानलें तरी जयिष्णु वृत्तीनेंच आर्य वर चढले व त्यांनीं तेथें आपली संस्कृति स्थापिली. संशोधनाचार्य राजवाडे म्हणतात कीं, पामीर पठारावरूनच आर्य जग जिंकण्यास गेले. टिळक, पावगी, राजवाडे या सर्वांच्या शोधांत आर्यांच्या चढाईच्या स्वभावाचें स्पष्ट प्रतिबिंब दिसतें. म्हणून हिंदुसमाजाचा स्वभाव जयिष्णु करण्याकरतां वैदिक आर्यांच्या स्वभावाचे धडे गिरविले पाहिजेत आणि हिंदूंच्या स्वभावावर जो राखेसारखा गंज आलेला आहे तो फुंकून दूर करून आंतील विस्फुलिंग जागृत केला पाहिजे. उत्तम हवा पाणी, उत्कृष्ट सृष्टिसौंदर्य आणि अन्नवैपुल्य यांचा मनुष्यस्वभावावर परिणाम होतो, असें समाजशास्त्रज्ञ म्हणतात. कोणताही मानवसमूह अन्नाकरितांच उलाढाली करतो. खूप अन्न मिळविण्याकरतां तो जयिष्णु होतो आणि वैपुल्य होऊन पोट तुडुंब भरलें कीं तो समाज आपोआप सहिष्णु होतो. हिंदुसमाजाचा स्वभाव सहिष्णु बनण्याला अन्नवैपुल्य, हवापाणी, सृष्टिसौंदर्य, जगन्मिथ्यात्व, कलिकल्पना, दैववाद, अहिंसावृत्ति इत्यादि कारणें घडलेलीं असावींत. कारणें बरींच असतील आणि तीं सांगतां येण्याजोगीं नसलीं, तथापि आजच्या धकाधकीच्या सामन्यांत सहिष्णु वृत्तीनें कोणताही समाज जगूं शकत नाहीं. Live and let live म्हणजे नांदा आणि नांदू द्या हें तत्त्वज्ञान सहिष्णुवृत्तिद्योतकच आहे. हा स्वभाव बदलून We must live and

then we may allow you to live म्हणजे आम्ही तर नांदणारच व तुम्हालाही नांदूं देऊं असा स्वभाव बनला पाहिजे. जयिष्णु स्वभाव म्हणजे इतकाच; यापेक्षां अधिकाची आवश्यकता नाहीं. जीवनाचा प्रश्न सोडविण्याला व संस्कृतिप्रसार करण्याला उपयोगी पडणारा हा जयिष्णु स्वभाव हिंदुसमाजांत उत्पन्न केला पाहिजे.

हिंदुसमाजाचा स्वभाव जयिष्णु बनल्यावांचून संस्कृतीचा प्रसार होणार नाहीं आणि स्वसंरक्षणही होणार नाहीं. कारण आज हिंदुसमाजाशेजारीं जे मुसलमान व ख्रिश्चन असे दोन समाज आहेत, त्यांचा स्वभाव आक्रमणाचा आहे. शेजारचे समाज जयिष्णु व आक्रमणशील आणि हिंदुसमाज सहिष्णु व संकुचित वृत्तीचा यांचें ऐक्य होईल काय ? बिऱ्हाड करावयाच्या आधीं अथवा घर बांधावयाच्या पूर्वी शेजार कसें आहे हें पाहावयाचें असतें. तसेंच स्वसमाज समर्थ करण्याकरितां परक्या समाजांचें स्वभावज्ञान अवश्य असतें. कारण जशास तसें वागल्यावांचून स्वसंरक्षणही होत नसतें हें सत्य अबाधित आहे.

**इस्लामचा स्वभाव**—महंमद कासमनें आठव्या शतकाच्या पूर्वार्धांत सिंध देशाच्या दाहीर राजावर स्वारी करून आर्य संस्कृतीच्या भरभक्कम तटाला भगदाडें पाडलीं, व आपला स्वभाव कसा आहे, हें प्रथम दाखविलें. इ. स. ७१० पासून १९२९ पर्यंतचा इस्लामचा इतिहास पाहिला तर इस्लामचा स्वभाव " क्रौर्य, विश्वासघात, रक्तपिपासा, बेइमान, कपटनीति " एवंगुण विशिष्ट आहे असें सिद्ध होतें. हे शब्द इतिहासकार सरदेसाई यांचे आहेत, एका निःपक्षपाती संशोधकाचे आहेत. हिंदूंना पदोपदीं मुसलमानांच्या स्वभावाचें ज्ञान होतच आहे, म्हणून अधिक विवरण करण्याची जरूर नाहीं. मुसलमानी धर्म सर्वांत श्रेष्ठ, अन्यधर्मीय लोक काफर, अर्थात् काफराला मोक्षाकरितां स्वधर्मच्युत करणें, त्याच्या स्त्रीला स्वर्गप्राप्तीकरितां भ्रष्ट करणें, आणि दानधर्माकरितां त्याची सर्व संपत्ति लुटणें हें ज्यांचें तत्त्वज्ञान व तदनुरोधानेंच ज्यांचें आचरण त्यांच्या स्वभाववर्णनाचें अधिक पुण्य कोणताहि सुज्ञ हिंदु करणार नाहीं.

**ख्रिस्त संस्कृतीचा स्वभाव**–हिंदुसमाजाशेजारीं ख्रिश्चन समाज आहे. तो स्वभावानें बराचसा हिंदुसदृश दिसला तरी त्या समाजामागें व एकंदर हिंदुस्थानावर जी शक्ति आहे ती म्हटली म्हणजे पाश्चात्य संस्कृति ही होय. पाश्चात्य संस्कृति ही दुसऱ्या संस्कृतीला एक गुलाम करिते (Enslaving

culture ) किंवा ठार तरी करिते, असें संशोधनाचार्य राजवाडे म्हणतात. कलकत्ता हायकोर्टचे माजी जज्ज सर जॉन वुड्राफ म्हणतात कीं, पाश्चात्य संस्कृति आसुरी आहे, राक्षसी आहे. अति खादाड आहे. अर्थात् तिचा अवतार या जगाला गिळण्याकारितां आहे. साहेबमजकुरांचे मूळ शब्द ग्रेट ईटर (great eater) असे आहेत. पेरू देश, मेक्सिको देश, अमेरिकेंतील मूळचे रेड इंडियन, दक्षिण आफ्रिका आणि हिंदुस्थान इतक्यांशीं पाश्चात्य संस्कृतीचा जो सहवास घडला त्यावरून वरील विधान असत्य व असंभाव्य आहे असें सुसंबद्धपणें कोणीही म्हणणार नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, हे शेजाऱ्यांचे स्वभाव लक्षांत घेऊन हिंदुसमाजानें आपला स्वभाव "जशास तसें" यापेक्षां "शेरास सव्वाशेर" असा बनवला पाहिजे.

हिंदुसमाज जगांतील अत्यंत प्राचीन समाज आहे. या समाजानें गेल्या दहा हजार वर्षांतील अनेक सामाजिक, धार्मिक, राजकीय क्रांत्या पाहिलेल्या आहेत. हिंदुसमाजाच्या अंतःकरणांवर या सर्व उलाढालींचा संस्कार झालेला आहे. नवा करकरीत मनुष्य आणि अनुभवी पोक्त मनुष्य या उभयतांत जो भेद दृष्टीस पडतो तोच भेद हिंदुसमाज व इतर समाज यांमध्यें आहे. यास्तव हिंदुसमाजाची सुधारणा पंजाब मेल अगर पूना–बॉंबे मेल यांच्या वेगानें होण्याची आशा करूं नये. कारण हिंदुसमाजांतील निरनिराळ्या थरांमध्यें शिक्षण व संस्कृतिदृष्ट्या बरेंच अंतर आहे. हें अंतर तुटत आहे व तोडलें पाहिजे, याबद्दल दुमत नाहीं. परंतु सामाजिक प्रगतीची गाडी चांगल्या गोष्टी पचवीत पचवीत सदर्न मराठा गाडीच्या वेगानेंच गेली पाहिजे. घिसाडघाई आणि दीर्घसूत्रीपणा हीं दोन्हीही टाकून धिमेपणानें आणि चिकाटीनें हें कार्य चालविलें पाहिजे. हजार दीड हजार वर्षांत उत्पन्न झालेले दोष घालविण्याचें काय कांहीं लहान नाहीं. अति त्वरा केल्यास अफगाणिस्थानच्या अमानुल्लासारखी स्थिती व्हावयाची. डोंगराची चढण खड्या सरळ चढ्या मार्गानें चढूं लागल्यास जीव कासावीस होतो व दम भरतो. पण तीच चढण वळणें वळणें घेत सावकाश चढल्यास त्रास न होतां कार्यभाग होतो. हिंदुसंघटनाच्या क्षेत्रांत काम करणाऱ्यांच्या पुढें हें धिमें व निश्चित धोरण पाहिजे.

आजच्या हिंदुसमाजाच्या दुर्बलतेचा व इतर समाजांच्या प्रबलतेचा विचार केल्यास हिंदुसमाजावर प्राणांतपर्यवसायी आपत्ति आलेली दिसते. जगांतील इतर समाज संघटित, व्यवस्थित आणि सत्तावान् असून त्यांच्याजवळ शस्त्र आणि

शास्त्रं हीं सज्ज आहेत. हिंदुसमाजाजवळ यांतील कांहींच नाहीं. म्हणून या निर्वाणीच्या प्राणांतिक कलहांत त्याला जगविण्याचा विचार आधीं केला पाहिजे. दोन व्यक्तींच्या प्राणांतिक स्पर्धेत टोपी, धोतर, पादत्राण यांकडे उभयतांचें लक्ष नसतें, पण हीं सर्व गेलीं तरी बेहेत्तर पण जीव बचावावा हें ध्येय असतें. याच ध्येयानें या व्यापक क्षेत्रांत कार्य करावयास पाहिजे.

हिंदुसंघटन म्हणजे पूर्वपरंपरा व सद्यःस्थिती यांचा समन्वय करण्याची योजना होय. पूर्वपरंपरेचें ज्ञान शास्त्रवचनांनीं होतें, व सद्यःस्थितीचें ज्ञान विचारानें आणि अवलोकनानें होतें. म्हणून वचन व विचार ह्यांचा मेळ घातला पाहिजे. पूर्वीची परंपरा केवळ " वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः" अशी होती तर नवी विचारसरणी केवळ " विचारात् प्रवृत्तिः व विचारात् निवृत्तिः " अशी आहे. हीं दोन्ही टोकें सोडून सुवर्णमध्य धरिला पाहिजे. तो म्हटला म्हणजे वचन व विचार यांचें मधुर मेलन करणें हा होय. समाजाच्या सामर्थ्याला जो उपयुक्त उपाय सुचवावयाचा तो अगदीं परका न वाटावा म्हणजे लोकांना त्याचें अनुकरण करण्यास बरें वाटतें. समाजाला कोणतीही गोष्ट अगदीं नवीन अशी वाटली कीं समाज त्याचें ग्रहण करीत नाहीं. निसर्गाचा हा नियमच आहे कीं, नाविन्यापासून अपाय होत असतो अशा समजुतीनें प्रत्येक प्राणी त्याच्यापासून दूर राहातो. छत्रीला जनावर बुजतें, कारण जीवनाला ती अपायकारक अशी त्याची समजूत ! मोटारींना अलीकडे जनावरें फारशीं बुजत नाहींत ह्याचें कारण चिरपरिचयामुळें मोटारींतील मारकता नाहींशी झाली असें त्यांना वाटतें हें होय. हाच न्याय समाजास लागू पडतो. हिंदुसमाजाची पुनर्घटना करतांना किंवा संघटना करतांना पूर्वपरंपरा सर्वस्वीं विसरून चालणार नाहीं. केवळ आज बुद्धीला पटतें म्हणून एखादें तत्त्व समाजांत रूढ होणें हें कठीण व अनिष्ट आहे. कारण समाज अत्राढव्य असून तो शैक्षणिक दृष्ट्या नवीन विचार ग्रहण करण्याला असमर्थ असा आहे, म्हणून हिंदुसमाजाची इमारत जोरदार करावयाची असेल तर जुना मालमसाला उपयोगांत आणला पाहिजे. कांहीं वाया जातां कामा नये. फक्त माती, विटा, तुळया, खांब, आढीं यांची रचना नव्या सोयींप्रमाणें केली पाहिजे. एकादें लाकूड किंवा इमारतींतील कांहीं सामान अगदीं निरुपयोगी असेल तर तेवढेंच टाकिलें पाहिजे आणि त्याच्या जागीं नवीन विकत घेऊन घातलें पाहिजे. वास्तुपुरती चार दोन खण जुनी इमारत ठेवून बाकीची सर्व पाडून ती जशी नवी बांधतात

तशी स्थिती हिंदुसमाजाची होणार आहे. सारांश, अशा प्रकारच्या दूरदर्शी, व्यापक व उदात्त धोरणानें हिंदुसमाजाच्या जीवनाचा प्रश्न सोडवणें म्हणजे हिंदु-संघटन होय. या प्रास्ताविक प्रकरणांत हिंदुसंघटनाची भूमिका सांगितली. पुढच्या प्रकरणांत हिंदु कोणास म्हणावें याचा विचार करूं.

---

# प्रकरण २ रें

## हिंदु कोणास म्हणावें ?

हिंदुस्थान हें फार मोठें राष्ट्र आहे, व त्या राष्ट्रांत प्रांतभेद, भाषाभेद, आचारभेद, आहारभेद, कल्पनाभेद, पंथभेद व जातिभेद यांचें बाहुल्य आहे. अनेक देवता, अनेक साधु, अनेक ग्रंथ यांचें अस्तित्व असल्यामुळें हिंदु शब्दाची व्याख्या करणें पुष्कळांना कठीण जातें. हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे. हिंदुसमाज हा आर्य, द्राविडी, कोलेरियन, मंगोलियन अशा वंशांचें मिश्रण आहे. पण हा समाज एक देवता, एक तत्त्वज्ञान, एक ग्रंथ व एक साधु मानणारा समाज नाहीं. कुराण मानलें, महंमदावर विश्वास ठेवला कीं तो मुसलमान, बायबल मानलें, ख्रिस्तावर विश्वास ठेवला कीं तो ख्रिस्ती; असली सांप्रदायिक हिंदु शब्दाची व्याख्या करणें फार सोपें आहे. ज्ञानेश्वर, तुकारामादि संतांना मानून जो पंढरीच्या वाऱ्या करितो, तो वारकरी. रामदासांना मानून ग्रंथराज दासबोध वाचून जो **रामोपासना करतो तो रामदासी. आद्य शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान व संन्यास जो मानतो तो अद्वैती. शिव, विष्णु, गणपती यांना भजतात ते शैव, वैष्णव व गाणपत्य** असें चटकन् सांगतां येतें. याप्रमाणेंच जैन, बौद्ध, लिंगायत, शीख, मानभाव, गोसावी, गोरखनाथी, दादुपंथी, कबीरपंथी, गुरखे, नेपाळी या सर्व लोकांची संप्रदायदृष्ट्या व्याख्या प्रत्येकाला समजत असते. हे सर्व अनेक संप्रदायांचे अनुयायी हिंदूच होत. कारण पुष्कळ संप्रदाय वेदमूलक व वेदानुकूल असे आहेत. तर कांहीं संप्रदाय वेदाला सर्वस्वीं प्रामाण्य देत नाहींत, अंशतः देतात; एवढाच काय तो फरक आहे.

श्रुतिस्मृतिपुराणोक्त जो धर्म तो हिंदु धर्म, व श्रुतिस्मृतिपुराणांना जो

मानतो तो हिंदु, एवढी संकुचित व्याख्या उपयोगीं पडत नाहीं. ही फारतर सनातनी हिंदूंची व्याख्या होईल. श्रुतिस्मृतिपुराणांमध्यें ज्यांना ज्यांना उद्देशून विधि व निषेध सांगितलेले आहेत ते सर्व हिंदु, अशा व्याख्येनेंही निर्वाह होत नाहीं. लो० टिळकांनीं "प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता । उपास्यानामनियमः।" इत्यादि जी व्याख्या केली आहे ती फक्त सनातनी हिंदूलाच लागते. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं जातिबद्ध असणें व हिंदु कायद्याप्रमाणें दायभाग करून घेणें अशी हिंदु शब्दाची व्याख्या केली आहे. या सर्व व्याख्या अंशतः खऱ्या आहेत. लोकसमजूत तर अशी आहे कीं, वेद, संस्कृत भाषा, रामायण, भारत यांबद्दल आदर; गीता, गंगा, गायत्री यांबद्दल पावित्र्यबुद्धि, व सण, उत्सव, यात्रा, तीर्थस्नानें यांचें आचरण, जो करतो तो हिंदु. आज आपणांस अहिंदूंचा समावेश न होईल आणि हिंदु संस्कृतीच्या प्रत्येक अनुयायाला घेतां येईल अशी अव्याप्ति व अतिव्याप्तिरहित व्याख्या करावयाला पाहिजे. आमचें असें मत आहे कीं, सनातन वैदिक धर्म व हिंदु धर्म या गोष्टी भिन्न आहेत. त्याचप्रमाणें हिंदु धर्म व हिंदुसमाज याही बाबी भिन्न आहेत. हिंदुसमाज व्यापक व त्यानें व्याप्य असा हिंदु धर्म आहे. हिंदुसमाज हिंदु धर्म बनवतो. हिंदु धर्म व सनातन धर्म यांमध्यें हिंदु धर्म व्यापक व सनातन धर्म हा व्याप्य आहे. म्हणजे हिंदु धर्माच्या विशाल उदरांत जे अनेक शीख, बौद्ध, जैन, लिंगायत इत्यादि संप्रदाय आहेत, त्यांतीलच सनातन वैदिक हा एक संप्रदाय आहे. हिंदु या नात्यानें सर्व सांप्रदायिक सारखेच आहेत. अव्याप्ति, अतिव्याप्ति हे दोष टाळून अहिंदूंना व्यावर्तक अशी बॅरिस्टर सावरकर यांची निर्दोष व्याख्या पुढीलप्रमाणें आहे.

आसिंधु सिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका
पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिंदुरिति स्मृतः ॥

तो मनुष्य हिंदु होय कीं जो सिंधुनदीपासून तों समुद्रापर्यंत पसरलेल्या देशाला आपली 'पितृभू' मानतो; जी जाती सारखें आक्रमण करीत करीत व विस्तार पावत पावत, जें जें अंतर्भूत झालें तें तें पचवीत आणि जें जें पचविलें, त्याला त्याला महनीय स्वरूप देत, अखेर 'हिंदुजाति' म्हणून जगांत प्रसिद्ध झाली व ज्या जातीच्या उत्पत्तीचा धागा थेट वेदकालीन सप्तसिंधूशीं जाऊन पोंचतो, त्या जातीचें रक्त ज्यांच्या अंगांत खेळत आहे; मुख्यतः संकृत भाषेंत जी आविष्कृत केली गेली व जी एक इतिहास, एक वाङ्मय, एक कला, एक शिल्पशास्त्र, एक

कायदा, एक धर्मशास्त्र, एक आचार, आणि एक संस्कार, क्रियाकर्में आणि विधि-नियम, समान उत्सव आणि समान यात्रा, यांच्या समुच्चयानें जी बनली गेली आहे, अशी या ' हिंदुजाती 'ची संस्कृति जो स्वतःची मानतो; आणि जो या सर्वांवर या भूमीला-या 'सिंधुस्थानाला ' आपली ' पुण्यभू ' समजतो; तिच्यांत आपले तत्त्ववेत्ते आणि ऋषी, अवतार आणि धर्मगुरु उत्पन्न झाले असें मानतो व हीच माझी कारुण्यभूमि व तीर्थभूमि आहे अशी निष्ठा ठेवितो-तो तो ' हिंदु ' होतो. समान राष्ट्र, समान जाति, आणि समान संस्कृति हीं हिंदुत्वाचीं लक्षणें आहेत. आणि हीं सर्व लक्षणें मोजक्या शब्दांत सांगावयाचीं म्हणजे अशीं कीं, ज्याला ' सिंधुस्थान ' हें केवळ ' पितृभू ' च वाटतें असें नव्हे तर ' पुण्यभू 'ही वाटतें तो हिंदु. हिंदुत्वाचीं पहिलीं दोन लक्षणें जीं ' राष्ट्र ' व ' जाति ' हीं ' पितृभू ' या शब्दानें व्यक्त होतात, तिसरें अवश्य लक्षण जें ' संस्कृति ' हें ' पुण्यभू ' या शब्दानें विशेषेंकरून व्यक्त होतें.

संस्कृत श्लोकांतील वरील व्याख्या व तिजवरील त्यांचें स्पष्टीकरण हिंदुत्व या पुस्तकांतून येथें दिलें आहे. आमच्या मतें ही व्याख्या सुटसुटीत व मुख्यार्थ-बोधक अशी आहे. हिंदुस्थानाला जो पितृभू व पुण्यभू मानतो तो हिंदु या दोन्ही शब्दांत वंशवैशिष्ट्य व संस्कृतिवैशिष्ट्य यांचें रहस्य सांठवलेलें आहे. ज्यांचे धर्म-प्रवर्तक येथेंच जन्माला आले त्यांना ही पुण्यभूमि वाटते, व ज्यांचे वाडवडील हजारों वर्षें येथें राहिले त्यांची ही पितृभू होय.

या व्याख्येप्रमाणें शीख हें हिंदूच आहेत. शीखांमध्यें सहजधारी, केशधारी, उदासी, निर्मल, गहनगंभीर आणि सिंधी असे जरी भेद असले तथापि ते हिंदु-स्थानाला पितृभू व पुण्यभूच मानतात. कारण वेदकालापासून त्यांचे पूर्वज याच भूमीवर राहिले व त्यांनीं भक्तिभावानें ईश्वराला आळवलें. शिखांच्या पूर्वजांची वस्ती तर पंजाबांतील सरस्वती नदीचे कांठीं होती. त्या सरस्वतीला त्यांनीं सनातनी हिंदूंप्रमाणेंच मानलेलें आहे. वेद हे धर्मग्रंथ या दृष्टीनें जरी त्यांना प्रमाण नसले तथापि अत्यंत प्राचीन वाङ्मय, मानवजातीच्या अज्ञात दशेवर प्रकाश पाड-णारें वाङ्मय या दृष्टीनें त्यांना ते वंद्य आहेत. शिखांची गुरुमुखी आणि पंजाबी या भाषांची उत्पत्ति संस्कृत भाषेपासूनच झाली म्हणून ती भाषाहि त्यांना वंद्य आहे. भारतरामायणांतील कथा, गंगायमुना या नद्या, तीर्थें, पवित्र स्थानें, हीं त्यांना

मान्य आहेत म्हणूनच ही भारतभूमि त्यांना पुण्यभूमि वाटते. गुरु नानक, गुरु गोविंदसिंह, गुरु बंदाबैरागी व गुरु रामदास हे सर्व हिंदुस्थानांतच जन्मले, येथेंच वाढले, त्यांच्या प्रभावानें अमृतसर व मुक्तसर हीं पवित्र स्थानें झालीं आहेत.

आर्यसंस्कृतीच्या छत्राखालीं जो जो संप्रदाय आहे. व जो जो स्वतःला हिंदु म्हणवून घेतो तो तो हिंदु आहे. शीख या शब्दाचा मूळ अर्थ शीष्य असा आहे. महाराष्ट्रांत जें प्रचंड कार्य पुण्यश्लोक शिवछत्रपतीनें केलें, तेंच कार्य उत्तरेंत गुरु नानक व गुरु गोविंदसिंह यांनीं केलें. शीखसमाजानें हिंदु संस्कृतीकरितां कांहीं थोडें थोडकें रक्त सांडलें नाहीं. शिखसमाज हा लढवय्या वृत्तीचा आहे. म्हणून महेन्द्रसिंह, दिलीपसिंह, रिपुदमनसिंह, अशा तऱ्हेचीं क्षात्रप्रभावदर्शक त्यांचीं नांवें असतात. शीख हे रामकृष्णादिकांना अवतार मानतात, ब्राह्मण उपाध्यायाकडून धर्मकर्मे करवून घेतात. तात्पर्य, ते आर्यसंस्कृतीचें संतान आहेत हें सनातनी वैदिक लोकांनीं ध्यानांत ठेवून हिंदु या नात्यानें त्यांच्याशीं वागावें. शीख धर्म हा हिंदुसमाजांतील एक पंथ आहे, यापेक्षां कांहीं अधिक नाहीं. शिखांप्रमाणेंच जैन, लिंगायत, वैष्णव, देवसमाजी, आर्यसमाजी, निरीश्वरवादी, नास्तिकवादी, इत्यादि सर्व झाडून हिंदु आहेत. कारण या पंथांचे सर्व प्रवर्तक व अनुयायी हे हिंदुस्थानांतच जन्माला आले व त्यांनीं ही भरतभूमि पितृभू व पुण्यभू मानली. वेदकालीन मंत्रद्रष्टया ऋषींपासून तों दयानंदापर्यंत, चार्वाकापासून तों आजच्या नास्तिकापर्यंत, जिनवरांपासून तो महावीरांपर्यंत, कपिलसांख्यापासून तों आजच्या अणुवाद्यापर्यंत, वीरबंदापासून तों बसवेश्वरापर्यंत, चक्रधरापासून तों चैतन्यापर्यंत, रामदासापासून तों राममोहनापर्यंत सर्व द्रष्टे आणि तत्त्ववेत्ते, आचार्य आणि साधु हे सर्व याच भूमींत जन्मास आले. म्हणून वरील सर्व संप्रदायांच्या अनुयायांना भारतभूंतील प्रत्येक धूलीकणाला वंदन करावेंसें वाटतें, कारण त्यांत पावित्र्य भरलें आहे. तात्पर्य, जे जे या भूमीला पितृभू व पुण्यभू मानतात ते ते सर्व हिंदूच होत.

हिंदुस्थानांतील जैन लोक हें हिंदूच आहेत. त्यांची धर्मभूमि हिंदुस्थानच आहे. जैन धर्माचा संस्थापक जिनक व शेवटचा तीर्थंकर महावीर हे येथेंच जन्मले व त्यांनीं येथेंच आपलें कर्तृत्व दाखविलें. महावीरापूर्वीचा तेविसावा. तीर्थंकर जो पार्श्व त्याचाहि जन्म येथेंच झाला. जैन हे रामकृष्णांना आपले तीर्थंकर समजतात. जैनधर्मावर हिंदूंच्या सूत संस्कृतीचा प्रभाव पुष्कळच पडलेला आहे. इंद्रियसंयमनाचें महत्त्व सांगणारे जैन मुनि व यति आणि उपनिषदांतील ब्रह्मवेत्ते

यांच्या यतिधर्मात कांहीं फरक नाहीं. वेदांत व भागवतांत ज्याचा उल्लेख आला आहे, असा ऋषभदेव हा सनातनी हिंदूंचा ऋषि म्हणून तर जैनांचा तीर्थंकर म्हणून मान्य आहे. जैन हे वेदग्रंथांना धर्मग्रंथ म्हणून प्रमाण मानीत नसले तथापि वेदप्रतिपादित आत्मा, कर्म, व ईश्वर हीं त्यांना मान्य आहेत. ईश्वर हा सर्वज्ञ, नित्य व मंगल आहे असें ते मानतात. ईश्वर हा सृष्टीचा निर्माता, शास्ता व संहारकर्ता आहे, हें त्यांनीं अमान्य केलें तर तेवढयानें हिंदुत्व बिघडतें काय ? मीमांसक कोठें ईश्वर मानतात ? सांख्यांत निरीश्वर सांख्य आहेतच ना ? निरीश्वर सांख्य जसे सनातनी त्याप्रमाणें जैन हे हिंदूच होत. जैन लोक आपले धार्मिक विधि ब्राम्हणाकडून करवून घेतात. त्यांचे धार्मिक विधि वैदिक विधींप्रमाणेंच आहेत. सारांश, या भारतभूला पितृभू मानणारे व हिंदु कायद्याप्रमाणें दायविभाग पाळणारे जैन हिंदूच होत.

जैनांप्रमाणें लिंगायत हेहि हिंदूच आहेत. कारण त्यांची पितृभू व पुण्यभू भारतभू हीच आहे. लिंगायत पंथाचे प्रचारक बसव व चन्नबसव मडिवाल, प्रभुदेव, सिद्धराम, इत्यादि सर्व येथेंच जन्मले, व येथेंच कार्यकर्ते झाले. हिंदुस्थान हीच त्यांची कर्मभूमि, धर्मभूमि व पुण्यभूमि आहे. शैवशास्त्र हें वेदसंमत आहे. सामान्य शैव, मिश्रशैव, शुद्धशैव व वीरशैव अशा चारहि पंथांमध्यें पंचयज्ञ आहेत, संस्कार आहेत, शिवपूजा आहे, लिंगधारण आहे. तात्पर्य, सनातन वैदिक हिंदूंप्रमाणें हाहि समाज पूर्ण हिंदु आहे.

नेपाळांतील गुरखे लोक आणि नेपाळी लोक हे हिंदु नाहींत असें कोण म्हणेल? मुसलमानांचे अनन्वित अत्याचार झाल्यावर पराभूत परंतु तेजस्वी रजपुतांनीं नेपाळांत जाऊन राज्यस्थापना केली, तेच हे गुरखे लोक. हे शिवभक्त आहेत, कडवे आहेत, गोरक्षा करणारे, अतएव गुरखे असें त्यांचें सार्थ नांव आहे. या लोकांनीं आर्य संस्कृतीच्या रक्षणाकरितां कांहीं थोडें थोडकें रक्त सांडलेलें नाहीं. नेपाळचें राजघराणें गुरखा जातीचें आहे. शिवरात्रीचा उपास व उत्सव गुरखे करितात. पशुपतेश्वराचें स्थान बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. गुरख्यांच्या पुष्कळ चालीरीती रजपुतांप्रमाणें आहेत.

आर्यसमाज हाहि कट्टा हिंदुसमाज आहे. आर्यसमाजाचे मोठमोठे वीर संस्कृतिरक्षणार्थ आत्मयज्ञ सारखे करीत आहेत. हिंदुस्थानांत आज मुसलमान व मिशनरी यांना तोंडीस तोंड देऊन हिंदुसमाजाचें रक्षण एकटया आर्य-

समाजानें केलें आहे. आर्यसमाज वेदग्रंथांना प्रमाण मानतो. वेद हे ईश्वरप्रणीत आहेत, किंबहुना हा एकच ग्रंथ ईश्वरप्रणीत आहे, अशी या पंथाची समजूत आहे. वेद व चातुर्वर्ण्य मानणारा, कर्म व पुनर्जन्म यांवर विश्वास ठेवणारा, पंच-महायज्ञाची आज्ञा करणारा, हिंदुस्थानाला पितृभू व पुण्यभू समजणारा हा समाज खास खास आर्य हिंदु होय.

आतांपर्यंत पितृभू व पुण्यभू ही व्याख्या शीख, जैन, लिंगायत, गुरखे व आर्य-समाजी यांना कशी लागू पडते हें दाखविलें. याप्रमाणें हिंदुसमाजांतील प्रत्येक पंथीय अनुयायाला ही व्याख्या लावतां येईल. हें काम आम्हीं विस्तरभयास्तव वाचकांवरच सोंपवितों. हिंदुसमाजांत असे पुष्कळ लोक आहेत कीं, ज्यांचा समावेश प्रति-शिरगणतीच्या वेळीं खानेसुमारीचे अधिकारी उगाचच्याउगाच अहिंदूंमध्यें करतात. तें चूक आहे. हें हिंदुसमाजानें दृष्टीआड करूं नये. महार, मांग, चांभार, ढोर, भंगी, धेड हे सर्व हिंदु आहेतच आहेत. कारण महारांतला चोखामेळा व चांभारांतला रोहिदास हे हिंदुस्थानांतच जन्मले व येथेंच त्यांनीं भक्तिभावानें ईश्वराला आळवलें. अर्थात् त्याची ही पितृभूमि व पुण्यभूमीच आहे. अस्पृश्य लोकां-शिवाय ज्या लोकांचा समावेश स्पृश्य व अस्पृश्य यांच्यामध्यें होतो, पण जे अमुक एक संप्रदायी असे एकदम ओळखले जात नाहींत हे सर्व लोक म्हणजे रामोशी, भिल्ल, काठक, कोळी, बेरड, वडारी, कैकाडी, फासेपारधी, डोंबारी, कोल्हाटी, बेलदार, कातकरी, वारळी, मेणा, गोंड, वाघरी, भोई इत्यादि सर्व हिंदूच होत. या सर्व हिंदूंचा समावेश हिंदुसमाजांत होतो, म्हणून या सर्वांना हिंदु सभेचे सभासद होण्याचा अधिकार आहे. हिंदु सभेमध्यें जसे सनातनी पाहिजेत तसे आर्य-समाजी पाहिजेत, जसे शीख पाहिजेत तसेच जैनही पाहिजेत. लिंगायत, गुरखे, ब्राम्हो, प्रार्थनासमाजी, स्पृश्य, अस्पृश्य व आतां वर सांगितलेले इत्यादि सर्व हिंदु सभेच्या कार्यांत आले पाहिजेत. महाराष्ट्रांत सनातनी हिंदूच विशेषतः अधिक आहेत. त्यांनीं या व्यापक दृष्टीनें इतर सर्व हिंदु बंधूंकडे पहावें व सर्वांशीं भ्रातृभावानें वागून हिंदुसमाजाचें बल वाढवावें.

कोणताहि समाज समर्थ होण्यास त्यामध्यें मनोबल, शरीरबल व समाजबल, यांची अपेक्षा असते. संपत्तिसुद्धां समाजाचें बल वाढवते. समाज विजिगीषु व सर्व दृष्टीनें समर्थ होण्याला सर्वांमध्यें मनोबलाची फार आवश्यकता असते. हिंदु-समाजामध्यें सर्वांपेक्षां मनोदौर्बल्यच अधिक दिसतें. मनानें दुर्बल असणारा समाज

हा कशानेंहि समर्थ होऊं शकत नाहीं, असा सिद्धांत आहे. अर्थात् हिंदुसंघटनाची भूमिका व हिंदु शब्दाची व्याख्या सांगितल्यावर हिंदुसमाजाच्या मनोदौर्बल्याचाच विचार एकदम डोळ्यांपुढें येतो. यास्तव पुढील प्रकरणापासून पूर्वार्धसमाप्तीपर्यंत याच विषयाची चर्चा करतों.

---

# प्रकरण ३ रें

## मनोबल-विचार

### शकुन, फलज्योतिष व भुतेंखेतें

हिंदुसमाजाचें मन एकंदरींत फारच दुर्बल आहे. आधिभौतिक सुधारणांचा प्रसार झाल्यापासून हिंदुसमाजाच्या मनावरील दुबळे संस्कार पुष्कळसे कमी होत आहेत. तथापि अद्याप बहुजनसमाजाच्या मनांतील वरील विषयांच्या दुर्बल कल्पना काढून टाकण्याचा यत्न केलाच पाहिजे. घरांत घोडें नवीन घेतलें कीं, त्याच्या पायगुणानें बरेंवाईट होतें, किंवा नवीन चाकर ठेवला, पाहुणा आला, सून आली, देवाच्या मूर्ति घरांत आणल्या, फार काय पण रामायण-भारतादि ग्रंथ आणले, तर त्यांचा पायगुण बाधतो किंवा लाभतो, अशा प्रकारच्या समजुती आहेत. बोडका ब्राम्हण पुढें आला, विधवा पुढें आली कीं कार्यहानी होते असें कित्येकांना वाटतें, पण मद्रासेकडे सर्वच ब्राह्मण बोडके फिरतात आणि वपन केलेल्या स्त्रियाहि तिरुपती व गोविंदराजपट्टण या भागांत डोकें उघडें टाकून पुरुषांप्रमाणें रस्त्यांत हिंडतात; तेथें कसलें आलें आहे शुभाशुभ ! वावटळ सुटली, चंद्राआड खळें दिसलें, प्रेत पुढें आलें कीं अपशकुन होतो; पण या गोष्टी निसर्गनियमांप्रमाणें स्वाभाविक होतात. येथें शुभाशुभ कसलें ? मांजर आडवें येतें किंवा कुत्रें रडतें तें कांहीं अपशकुन करण्याकरितां मुद्दाम तसें करतें काय ? मुळींच नाहीं. शिंक येणें, डोळा लवणें, बाहु फुरफुरणें, पायाच्या तळव्याला कंड सुटणें, या गोष्टी शरीरधर्माच्या आहेत. त्यांचा व कोणत्याहि कार्याचा मुळींच कार्यकारणसंबंध नसतो.

चमत्कार असा कीं, जेव्हां आपला उज्ज्वल वैदिक धर्म गेला व सर्वत्र संन्यासधर्माची छाप बसली त्या प्रतिकारशून्यतेच्या कालांत मनुष्याला कावळा, पाल,

मुंगूस, घुबड, टिटवी इत्यादि सर्वांपासून उपद्रव होऊं लागला व शेवगा, गाजर, कांदा, लसूण, यांचा स्पर्श प्रायश्चित्तार्ह ठरला. पाल अंगावर पडली, कावळा अगर सरडा यांचा स्पर्श झाला कीं प्रायश्चित्त, असला धर्म आला ! घरोघरीं पालीसारखे प्राणी कितो तरी असतात. ती बिचारी अंगावर पडली तर स्नानाचें प्रायश्चित्त कशाला ? शिवकांची व विष्णुकांची येथें एका देवालयांत सोन्याची पाल आहे, तिचें दर्शन झालें म्हणजे जन्मभर जेवढया पाली अंगावर पडतील त्यांचा दोष नाहीं अशी समजूत आहे. यःकश्चित पाल ती काय व तिच्या पतनाला प्रायश्चित्त तें काय ? कावळा चुकून डोक्यावर बसला अन् त्यांत सुवासिनी स्त्रीच्या मस्तकावर तो बसला कीं मुलगा किंवा नवरा यांचा नाश होतो ! अशा तऱ्हेचे श्लोक पुराणग्रंथांमध्यें आहेत व ते निबंधग्रंथांत उद्धृत केलेले आहेत; याचें खरोखरी हसूं येतें. उदाहरणार्थ कांहीं श्लोक देतों.

पल्लीपतन—**तिलमाषादि-दानंच स्नात्वा देयं द्विजन्मने ।**
**पिनाकिनं नमस्कृत्य जपेन्मंत्रं षडक्षरम् ।**
**शतं सहस्रमथवा सर्व-दोष-निबर्हणम् ।**
**शिवालये प्रदद्याद्वा दीपं दोषोपशांतये ।** ( आदित्यपुराण )

या श्लोकांत सांगितलेले तीळ, उडीद यांचें दान, स्नान, शंकराचा षडक्षरी मंत्र वगैरे प्रायश्चित्त पाल पडल्यावर व एखादा सरडोका जर अंगावर चढला तरीहि करावें असें म्हटलें आहे.

कावळ्याच्या स्पर्शाबद्दल नारदसंहितेंतील म्हणून पुढील श्लोक दिलेले आहेत.

**मस्तके वायसस्पर्शे दारिद्र्यं मरणं कलिः**
**कट्यां स्कंधे महाभीतिररिष्टं चैव कीर्तितम् ॥**
**योषितां मस्तके भर्तुर्विनाशो वा सुतस्यच**
**दिवा वा यदि वा रात्रौ यः पश्येत् काकमैथुनम्**
**स नरो मृत्युमाप्नोति ह्यथवा स्थाननाशनम् ॥**

कोणतीहि कल्पना संस्कृत श्लोकांत ग्रथित केली म्हणजे तिला शास्त्राचें स्वरूप कसें येतें याचा हा उत्तम नमुना आहे. स्नान केल्यानंतर ओलें वस्त्र लागलीच पिळावें, न पिळल्यास स्नान निष्फळ होतें; व स्नानावेळचें ओलें वस्त्र खालीं सोडलें कीं पुनः प्रायश्चित्त घ्यावें लागतें ! म्हणजे तें ओलें वस्त्र पिळण्याकरितां वरच्या-वरच घ्यावें, असें प्रयोगपारिजात नामक ग्रंथांत म्हटलेलें आहे. या असल्या कल्पनांविरुद्ध म्हणजे बौद्धिक गुलामगिरीविरुद्ध बंड कां करूं नये ?

शकुनाप्रमाणें फलज्योतिषाच्या बऱ्याच कल्पना हिंदुसमाजाच्या मनाला दुबळ्या करीत आहेत. व्यतिपात व वैधृति या कुयोगांवर अपयश येतें म्हणून खटल्याची तारीख लोक चुकवितात व आर्थिक हानि करून घेतात असा अनुभव आहे. इंग्रजांचें कोर्ट कांहीं असले योग पाहून तारखा ठरवीत नाहीं. एकापुढें एकेक सवडीनें कामाच्या तारखा ठरविल्या जातात. पण तें लक्षांत न घेतां दग्धयोग व मृत्युयोग यांच्या निमित्तावर पुष्कळ माणसें हताश होऊन बसलेलीं असतात. पंचांगाचें पान पाहिलें तर दर पंधरवड्याला सरासरी अमृतसिद्धियोग, मृत्युयोग व दग्धयोग हे एकेकदां तर येतातच पण केव्हां केव्हां त्यांच्या दोनदोन फेऱ्या होतात. मृत्युयोगावर गांवाला गेल्यास मनुष्य मरतोच असें नाहीं व अमृतसिद्धियोगावर प्रयाण केलें तर तो अमर होतो असेंही नाहीं. कार्याच्या आड येणारें हें योगाचें लचांड हिंदूंनीं कशाला बरें उराशीं बाळगावें ? व्यतिपात, वैधृति या योगांवर कार्य फत्ते व्हावें म्हणून कांहीं लोक ब्राह्मणाला दानधर्म करितात. कांहीं लोकांचा तर या योगावर दान मिळवून जगण्याचा धंदाच आहे ! धंदा या दृष्टीनें तो ठीक आहे, पण समाजाच्या मनःसामर्थ्याकरितां या असल्या कल्पना घालविल्याच पाहिजेत. पंचांग हें एक आपल्या धर्मशास्त्राचें अंग आहे एवढें हिंदुसमाजानें समजावें व सणवार, श्राद्धपक्ष, हव्यकव्य हीं त्या त्या तिथीस नियमानें करावीं. पण प्रत्येक कार्याच्या वेळीं मुहूर्त, पंचांग व शुभाशुभ पाहाण्याची जी पुष्कळ ठिकाणीं चाल आहे ही वाईट आहे. शेतकऱ्याला खळें करण्याला, तिवडा रोवण्याला, मळणी करण्याला व रास काढण्यालाहि मुहूर्त लागतो. एकापुढें एकेक मुहूर्त न मिळत गेला तर कित्येक लोक आपलें फार नुकसान करून घेतात. मळणी करावी व रास काढायला मुहूर्त नाहीं म्हणून दोन दिवस थांबावें तों मध्यें पाऊस तरी येतो किंवा चोरी तरी होते, अशीं उदाहरणें कांहीं थोडींथोडकीं घडत नाहींत. खेड्यापाड्यांतील लोकांना शहरांत व कोर्टांत अधिकाऱ्यांकडे कामाधामाकरितां जावें लागतें. हे शेतकरी मुहूर्त न मिळाल्यामुळें हजामत सुद्धां करून जात नाहींत ! कारण हजामतीला सुद्धां कांहीं दिवस वर्ज्यच आहेत. भाऊ असेल त्यानें चतुर्थी, बहीण असेल त्यानें पंचमी, आई असेल त्यानें षष्ठी व मुलगा असेल त्यानें सोमवार हे दिवस हजामतीस वर्ज्य करावेत, असलें अगडबंब शास्त्र पुढें येतें ! गलिच्छपणें व बेंगरूळपणें लोकांपुढें किंवा अधिकाऱ्यांपुढें गेल्यास छाप पडत

नाहीं व कार्यभागहि व्हावा तसा होत नाहीं हें हिंदूंच्या ध्यानीं येत नाहीं. पण मुसलमानाला मात्र यांतील कांहीं नाहीं. तो व्यतिपात असो, वैधृति असो, मृत्युयोग असो वा अमावास्या असो, व्यवस्थित हजामत करून कपडे नीटनेटके घालून रुबाबदारपणानें अधिकाऱ्यापुढें जातो, आपल्याबद्दल चांगला ग्रह उत्पन्न करतो आणि काम करून घेऊन मोकळा होतो. म्हणजे त्याच्या कार्याला पंचांग नडवीत नाहीं, शकुन अडवीत नाहीं किंवा इतर कसलीहि बाधा होत नाहीं. हिंदूंच्या आड मात्र यांतील प्रत्येक गोष्ट येते !

फलज्योतिष हें एक शास्त्र आहे. त्याचें कांहीं गणित आहे, कांहीं आडाखे आहेत, ठोकताळे आहेत हें आम्हाला मान्य आहे. गणित या दृष्टीनें शास्त्र म्हणून त्याचा विचार व अभ्यास खुशाल करावा. परंतु पत्रिका हातीं घेऊन ज्योतिषाच्या घरीं धांवपळ करून उद्योग न करतां नशीब शोधीत बसण्यांतच वेळ घालवणें हा मूर्खपणा नव्हे काय ? पडसें, खोकला, ताप, गोंवर, कांहीं आलें कीं जा ज्योतिषा-कडे; खटला चालू झाला, मुलाची परीक्षा आली कीं पळ ज्योतिषाकडे ! असलें वर्तन निंद्य नव्हे काय ? खानदेश व नेमाड प्रांतांत दक्षिण महाराष्ट्रापेक्षां ज्योतिषांची चंगळ चांगली चाललेली दिसते. कांहीं खरे ज्ञाते तर कांहीं ढोंगी असे असले तरी धंदा मात्र उत्तम चालतो हें खरें आहे. ज्योतिष-शास्त्र हें शास्त्र या दृष्टीनें समाजाला फार थोडें परिचित आहे. कांहीं सामान्य आडाखे, शकुनवंती, सहदेव–भाडळी यांसारखे ग्रंथ मात्र लोकांच्या डोळ्यांपुढें असतात. नवग्रहांची बाधा ही प्रत्येकाला असतेच. कारण नऊ ग्रहां-पैकीं सगळेच ग्रह सर्वस्वीं अनुकूल असें क्वचितच होतें. मग त्यांच्या वक्री दृष्टीचा परिहार करण्याकरितां शनिमाहात्म्यासारख्या ग्रंथांचीं पारायणें चालतात. ग्रह वक्री होते ते सरळ झाले, पालथे होते ते सोईचे केले, म्हणजेच कार्य होतें काय ? ग्रहांच्या मुख्य दशा व अंतर्दशा पाहूं लागलें कीं, ग्रह आपली दुर्दशा करून टाकतात असा अनुभव येतो. पण हिंदुसमाजानें मुख्य गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे व ती ही कीं, अंतःस्फूर्तीनेंच कोणतेंही कार्य होतें. अंतःस्फूर्ति, धैर्य, उत्साह, अचुक यत्न व सारखा उद्योग हीं साधनें हस्तगत झालीं म्हणजे शकुन, ग्रह, ज्योतिष व नक्षत्रें ह्यांची कांहीं आडकाठी होत नाहीं. ज्युलियस सीझरपासून तों शिवाजीपर्यंत जे योद्धे झाले, आर्य चाणक्यापासून तों आजच्या आयर्विनसाहेबांपर्यंत जे मुत्सद्दी झाले, महावीरापासून तों राममोहनरायापर्यंत

जे नवमतप्रणेते झाले; यांच्या मार्गांत दुःस्वप्न, शकुन, ग्रह, ज्योतिषी इत्यादि कोणीहि विघ्नें करण्यास आले नाहींत. स्वप्नें पडलीं म्हणजे माणसें त्याच्या शुभाशुभ विचारामध्यें वेळ घालवतात. पण स्वप्नांचें निर्मूलन ज्या गाढ झोपेनें होतें ती येण्याचें साधन दिवसभर सारखे श्रम करणें हें मात्र कोणी लक्षांत घेत नाहींत.

**दिवसार्धे न तत्कुर्यात् येन रात्रौ सुखं स्वपेत्** असें महाभारतांत म्हटलेलें आहे. दिवसभर सदुद्योग केला कीं, रात्रीं जमिनीला पाठ टेकतांच मनुष्य घोरूं लागतो. हा जर प्रत्यक्ष अनुभव आहे तर दुस्स्वप्ननाशाची उठाठेव कशाला ? ज्योतिषशास्त्राचें मत कांहीं प्रमाणांत विशिष्ट प्रसंगीं विचारांत घ्यावें. कारण तें शास्त्र आहे. परंतु प्रत्येक हंगामांत, प्रत्येक दुखण्यांत व प्रत्येक कार्यांत बारा घरांची कुंडली घेऊन तिचा विचार करीत बसणें यासारखा दुधखुळेपणा नाहीं. हिंदुसमाजाला जर धडाडीनें व उत्साहभरानें जगावर आक्रमण करावयाचें असेल तर हें मनोदौर्बल्य त्यानें टाकून दिलें पाहिजे.

हिंदुसमाजाच्या दौर्बल्याला अंशतः कारणीभूत असलेल्या शकुन व ज्योतिष यांचें विवेचन आतांपर्यंत केलें. या कल्पनेप्रमाणेंच भुताखेतांची अवास्तव कल्पना हिंदुसमाजावर चांगलेंच प्रभुत्व गाजवीत आहे. बहुतेक हिंदु जनता या कल्पनेनें पछाडली आहे. तिचा थोडा विचार करून हें प्रकरण संपवितों.

हिंदुसमाजाला जिकडे तिकडे भुतेंखेतें दिसतात. भुतेंखेतें, मुंजे, समंध, डाकिणी, पापिणी, शंखिणी, हडळ यांनीं हिंदुसमाजाला इतकें भेडसावून सोडिलें आहे कीं, सांगून सोय नाहीं. घरांत अंधार असला कीं, ती जागा मुलांना झपाटते ! घराबाहेर वठलेलें झाड असलें कीं त्यांवरील मुंजा बोकांडीं बसतो ! घरांत आणि घराबाहेर कांहीं नसलें तर गांवांत एकादा झोटिंग किंवा वेताळ ह्या असल्या दुर्बळांवर कृपा करण्याकरितां टपलेला असतोच ! घरांत ओल आली व त्यावर चालून अगर रांगून मुलाला पडसें, खोकला आला तर भलताच कार्य-कारणसंबंध जोडून उतार पाडण्याकरितां भुतांचे अंगारे लावण्यांत येतात ! व जनावरांचा आजार किंवा अशाच कांहीं शारीरिक दुःखाच्या गोष्टी घडल्या कीं, आरोग्याचे नियम अगर निसर्गाचे नियम मोडले हें लक्षांत न घेतां एकदम भलती-कडेच लक्ष जातें. याचा परिणाम हिंदुसमाजावर इतका अनिष्ट झाला आहे कीं, अमक्या ठिकाणीं भूत, प्रेत, पिशाच्च आहे असें दहापांचजणांनीं म्हटलें कीं

कोणताहि हिंदु स्त्रीपुरुष तेथें जाण्यास धजावत नाहीं. ह्या भुताखेतांच्या भीतीनें कोणीं घरें सोडलीं, कोणीं दारें सोडलीं, कोणीं बायका सोडल्या आणि कोणीं पोरेंहि सोडलीं, अशीं उदाहरणें ऐकण्यांत येतात ! भुताखेतांनीं त्रस्त झालेल्या हिंदुसमाजाला, मुसलमान, ख्रिश्चन आणि इंग्रज यांच्याकडे पहावयाला वेळ झाला तर मोठी मुष्कील ! कारण नेहमीं अदृश्य भुतें पाहाण्याकडेच या समाजाचे डोळे !

प्रारंभींच हें निश्चित सांगितलें पाहिजे कीं, कांहीं लोक भूतपिशाच्चांचा अत्यंत अभाव मानितात, तसा आम्ही मानीत नाहीं. जगांत पिशाच्चादि योनि आहे पण ती मनुष्यांना त्रास देण्याकरितांच नाहीं. निसर्गनियमांप्रमाणें उगाच भुतांनीं मनुष्याला त्रास देणें संभवत नाहीं. मनुष्यांपेक्षां भुतें संख्येनें फारच थोडीं असलीं पाहिजेत आणि त्यांना तेहतीस कोटि देवांची भीति असली पाहिजे.

चमत्कार असा कीं, गेल्या दहा वर्षांत भुताखेतांची संख्या कमी झाली आहे. औदुंबर, श्रीनृसिंहवाडी, बिराडसिद्धाचें कवठें इत्यादि भूतप्रसिद्ध क्षेत्रांतील माहिती पाहिली तर असें दिसतें कीं, या ठिकाणीं गति घेणाऱ्या भुतांची संख्या अलीकडे पुष्कळच कमी झाली आहे नवीन शोध, नवीन सुधारणा, नवीन कल्पना यांनीं गेल्या दहा वर्षांत जर भुतें कमी केलीं असतील तर भुतांचें अस्तित्व हें बरेंचसें मनुष्यांच्या अज्ञानावर अवलंबून आहे असें म्हणावें लागतें. भुतें नाहींतशीं झालीं म्हणजे काय झालें ? लोकांच्या पूर्वी भुतांच्या ज्या कल्पना अज्ञानजन्य होत्या त्या आज ज्ञानानें बदलल्या ! अज्ञानांत ज्यांचा उदय झाला होता, त्यांचा ज्ञानानें लय केला इतकाच अर्थ ! आम्ही लहानपणीं बारघाट रिव्हर्सिंगच्या समंधाची गोष्ट ऐकत होतों कीं, तो आगगाडीला पुढें जाऊंच देत नाहीं ! पण नारळ फोडून नमस्कार केला कीं, लगेच वळण घेऊन आगगाडीला जाऊं देतो; पण समोर कधीं जाऊं देत नाहीं ! या गोष्टींत किती तथ्यांश आहे हें सांगावयास नकोच. पण भुतांसमंधांच्या शेंकडा नव्वद गोष्टी अशाच तऱ्हेच्या आहेत हेंहि सांगितलें पाहिजे. * इंग्रजांच्या आगगाड्या भों भों करीत धांवू लागतांच

*श्रीपांचलेगांवकर महाराज गांवोगांवीं भुतें काढतात. त्यांनीं वांईस आल्या वेळीं असें स्पष्ट सांगितलें कीं, हजारांत १।२ भुतेंच खरीं असतात; बाकी सब झूट होत.

हिंदुस्थानांतील बऱ्याचशा भुतांची दाणादाण झाली आणि राहिलेलीं भुतें मोटारी-खालीं चिरडून मरत आहेत असेंच म्हणण्याचा प्रसंग येतो !

ज्यांची मृत्युसमयीं अत्यंत उत्कट वासना एखाद्या गोष्टीबद्दल राहाते, त्यांना पुण्य कमी असल्यास ही योनि प्राप्त होते, अशी समजूत आहे व ती शास्त्राला धरून आहे. वासनाबीज जोंपर्यंत आहे तोंपर्यंत पुनर्जन्म आहे, तिच्या क्षयावांचून मोक्ष नाहीं, हा शास्त्रसिद्धांत लक्षांत घेतला तर सगळे जीव भूतयोनींत जाण्या-इतके पापी होते असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. भूतयोनीशिवाय ज्या इतर लक्षा-वधी योनि आहेत त्यांत जाण्याइतकें पापपुण्य प्रत्येक जीवांत असतेंच. तेव्हां या योनींचें प्रमाण अल्पस्वल्पच असलें पाहिजे. बरें, भूतयोनींतील हे प्राणी आपलीं कर्में भोगतां भोगतां त्रस्त होत असतात; मग माणसांना उठल्या बसल्या ते कशी पीडा करतील ? यदाकदाचित् पीडा देण्याचें सामर्थ्य असलें तरी पूर्वजन्माचा कांहीं तरी जिव्हाळ्याचा संबंध असल्याशिवाय पाहिजे त्याला पीडा जर हीं सैतानें देऊं लागलीं तर ईश्वराच्या अस्तित्वाचें कारण काय ? ईश्वर आणि इतर तेहतीस कोटी देवता या जोंवर झोंप घेत नाहींत, तोंवर भुतांचा इतका धुमाकूळ या जगांत चालण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. पुष्कळांमध्यें एखाद्या मनुष्याला भूतबाधेचा भास क्वचित् होत असावा असें, देवता व ईश्वर यांचें अस्तित्व आणि शास्त्रसिद्धांत गृहित धरून विधान करावेंसें वाटतें. त्यावांचून इतर अन्य ज्या पीडा व बाधा होत असतील त्यांचे कार्यकारणसंबंध अगदीं स्वतंत्र आहेत, अज्ञानमूलक आहेत असेंच समजलें पाहिजे.

एखाद्या गांवांत भुतांच्या अस्तित्वाची साक्ष लोक निरनिराळ्या तऱ्हेनें देत असतात. पण त्याच गांवांत मारुति, खंडोबा, बहिरोबा, विठ्ठल, गणपति असे दहा पांच तरी देव असतात. भुतांपेक्षां देवांची संख्या जास्त असतांना पाहिजे तसल्या भलत्यासलत्या गोष्टी भुतें करतात कशा व देव त्या चालवितात कशा ? असाहि विचार मनांत येतो.

हीं सर्व भुतें दुर्बळांना पीडा देण्याकरितांच आहेत कीं काय न कळे ! कारण सबळांवर यांचें कांहींच चालत नाहीं. दहापांच ब्रह्मसमंध डायर ओडवायरसारख्या इंग्रजांच्या बोकांडीं बसत नाहींत किंवा औरंगजेबासारख्या हिंदुद्वेष्ट्या राजाला झपाटीत नाहींत ! हिंदुस्थानांतील भुतें केवळ घरच्या म्हातारीचे काळ होतात म्हणून त्या लबाडांना पळवून लाविलें पाहिजे. भुता-

खेतांची कल्पना हिंदुसमाजाप्रमाणें इतर समजांतहि आहे. परंतु इतर समाजांत ती इतकी मारक झालेली आढळत नाहीं. पवित्र बायबलामध्यें पवित्र भूत ( Holy Ghost ) असल्यामुळें तें बरेंचसें निरुपद्रवी असावें कीं काय असा संशय येतो. मुसलमानी धर्मांत भुतें असलीं तर तीं त्यांनीं दुसऱ्या समाजाला पीडा देण्याकरितां कुत्र्याप्रमाणें सोडलेलीं असावीं. कारण मुसलमानांचें सर्व कांहीं परकीय समाजावर चालतें. हिंदु धर्माला पीडक म्हणून त्यांनीं भुतें जवळ बाळगलीं असावीं म्हणून हिंदूंनींहि तेंच केलें पाहिजे. हिंदुसमाजाला त्रासदायक भुतें व त्यांची कल्पना हीं जमिनींत खोल गाडून ठेविलीं पाहिजेत. आणि दुसऱ्या समाजावर सोडण्यासारखीं जर कांहीं दृश्य अगर अदृश्य भूतें असतील तर तीं खाकोटींत मारून त्यांचा संग्रह करून घेतला पाहिजे. श्री. तुळसीदास ह्यांनीं असेंच एक भूत संग्रहीं ठेविलें होतें. त्या भुतानें त्यांना रामदर्शन घडविलें ! हिंदुसमाजाच्या राक्षसी शत्रूंचा संहार करणारीं भुतें असतील तेवढींच शिल्लक ठेवावींत; बाकीच्यांचें कार्य संपलें आहे असें समजून त्यांची कत्तल करून त्यांना मोक्षाच्या मार्गास लावावें.

ईश्वराला स्मरून जो आपलें कर्तव्य करीत असेल, त्याला भुतांची बाधा होत नाहीं. जो जो कोणी आपल्या धर्माप्रमाणें आचरण करीत असेल त्याला भुतांची पीडा होण्याचें कारण नाहीं. जो जो कोणी कर्तव्याचा विचार आणि अखिल मानवांच्या हिताला उपयुक्त अशा गोष्टी करण्यास झटत असेल, त्याला भुतें पीडा तर देणार नाहींतच; तर उलट साहाय्य करतील. हें तत्त्व हिंदूंनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. हिंदुस्थानांत हिंदुसमाजाला जिवंत भुतें अनेक प्रकारांनीं पीडा देत असल्यामुळें आतां मृत भुतांचें प्रयोजन नाहीं, अर्थात् हिंदुसमाजानें मनोदौर्बल्याच्या या नसत्या कल्पना टाकून देऊन उद्योगास लागलें पाहिजे.

---

# प्रकरण चौथें



## मनोबल--विचार

### आचरट कलिकल्पना

हिंदुसमाजाच्या दौर्बल्याचा विचार करितांना हिंदुसमाजाच्या मनावर कलि-कल्पनेचा बराच प्रभाव गाजत आहे असें प्रत्ययास येतें. हिंदुसमाज दुर्बल बनण्याला जीं अनेक कारणें घडलीं, त्यांतीलच हें एक आहे, म्हणून त्या कलि-कल्पनेकडे आपण वळूं.

हल्लीं कलियुगास प्रारंभ असून तो एकंदर ४३२००० वर्षें आपला प्रभाव चालवितो, चार लक्ष बत्तीस हजार वर्षांपैकीं नुकतींच पांच वर्षें संपलीं. या एवढया मोठ्या कालाचा नियंता कलि असून तो मनुष्यांना शिश्नोदरपरायण करितो, जगांत अधर्म माजावितो, नीति तुडवितो, सत्य, न्याय, दया, परोपकार यांचा नायनाट करितो; सारांश जगांत जितकें चांगलें असेल त्याचा सत्यानाश करून जितकें म्हणून वाईट आहे अगर असेल तितकें सर्व या येवढ्या दीर्घकालांत कलीच्या प्रेरणेनें होत असतें ! अर्थात् अशा वेळीं युगमाहात्म्य पाहून माणसानें स्वस्थ राहावें, कारण कांहीं केलें तरी या वेळीं चांगलें होत नाहीं, इत्यादि कल्पना लोकसमुदायांत वावरत आहेत. कोणत्याहि समाजांत ज्या धार्मिक बऱ्यावाईट कल्पना अस्तित्वांत असतात त्यांना आधार कोणत्या तरी धर्मग्रंथाचा असतो. आतां ते ग्रंथ खरें धर्मरहस्य सांगणारे ग्रंथ असोत, किंवा त्यांचें यथार्थ स्वरूप अगम्य असे ते असोत ! कांहीं तरी धर्मग्रंथांचा व अशा कल्पनांचा संबंध असतो यांत मुळींच शंका नाहीं.

या दृष्टीनें हिंदुसमाजाच्या अयथार्थ कलिकल्पनेचा उद्भव पुराणांमध्यें झाला असें स्पष्ट दिसतें. लोकप्रसिद्ध असें भागवत पुराण जरी घेतलें तरी त्याच्या भागवतमाहात्म्यांत व द्वादशस्कंधांत जें कलीचें वर्णन आहे तेंच ऐकून ऐकून लोकांच्या कल्पना दृढमूल झाल्या आहेत असें म्हणावें लागतें. कारण भागवत हा लोकप्रसिद्ध ग्रंथ आहे. भागवताप्रमाणें लोकप्रसिद्ध असें अध्यात्मरामायण जरी घेतलें तरी त्यांत कलीचें माहात्म्य पहिल्यानेंच वर्णन केलें आहे. पुराणांमध्यें

पुष्कळ ठिकाणीं या कलिकल्पनेचा प्रादुर्भाव झालेला आहे. हें पुढील श्लोकांवरून दिसून येईल.

तपःपरं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुत्तमम् ।
द्वापरे यज्ञमेवाहुर्दानमेकं कलौ युगे ॥ महाभारत.
कलौ विश्वेश्वरो देवः कलौ वाराणसी पुरी ।
कलौ भागीरथी गंगा कलौ दानं विशिष्यते ॥ काशीखंड.
ध्यानं परं कृतयुगे त्रेतायां यजनं तथा ।
द्वापरे लिंगपूजा च कलौ शंकरकीर्तनम् ॥ शिवपुराण.
पुष्करं तु कृते सेव्यं त्रेतायां नैमिषं तथा ।
द्वापरे तु कुरुक्षेत्रं कलौ गंगां समाश्रयेत् ॥ विष्णुधर्मोत्तर पुराण.
ध्यायन्कृते यजन्यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन् ।
यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम् ॥ व्यास.
कलौ कलिमलध्वंसं सर्वपापहरं हरिम् ।
येऽर्चयंति नरा नित्यं तेऽपि वंद्या यथा हरिः ॥ अग्निपुराण.
कलिं सभाजयन्त्यार्या गुणज्ञाः सारभागिनः ।
यत्र संकीर्तनेनैव सर्वः स्वार्थोऽपि लभ्यते ॥ श्रीभागवत.

या सर्व श्लोकांचा भावार्थ असा कीं, कलीमध्यें दान, शंकरकीर्तन, गंगास्नान, केशवस्मरण, ईश्वरपूजा, इत्यादि करावीं. इतर युगापेक्षां या युगाचें महत्त्व असें आहे कीं, येथें नामस्मरणानें कार्यसिद्धि होते. 'मुखीं नाम हातीं मोक्ष' 'साधन नामचि सार' 'नामापरतें कांहीं नाहीं म्हणून नाम घ्यावें व स्वस्थ असावें.' दक्षिण महाराष्ट्रामध्यें श्रीगुरुचरित्र वाचण्याचा संप्रदाय आहे. त्यांत विषयोपन्यासानंतर कलिमहात्म्यच आलेलें आहे. तेथें कलीचें अगदीं किळसवाणें चित्र रेखाटलें असून त्याच तऱ्हेचीं माणसें तो सांप्रत करणार असें म्हटलेलें आहे. नळाच्या आंगांत कली शिरला, धर्माच्या बुद्धींत कलीनें प्रवेश केला, अमक्याची बुद्धि कलीनें हरण केली, तमक्यावर कलीनें असा प्रभाव गाजवला, इत्यादि गोष्टी निरनिराळ्या आख्यानांत व उपाख्यानांत गोवलेल्या आहेत.

पौराणिक व्रतावैकल्यांचें समर्थन कलिकल्पनेवरच झालेलें आहे. कलियुगांतील घोराचारवान् समाज पाहून पातकांत बुडालेल्या या लोकांच्या उद्धाराकरितां अनेक व्रतेंवैकल्यें मुनींनीं उत्पन्न केलीं. कलियुगांत पाप फार,

आयुष्य कमी, बुद्धि कमी, साधनें दुर्मिळ; मग झटपट मोक्षाचा मार्ग पाहिजे म्हणून सत्यनारायण, सत्याविनायक यांसारखीं शेकडों व्रतें व " रामकृष्णहरी " यासारखे मोक्ष देणारे मार्ग पुढें सरसावले, अशा प्रकारचें विवेचन ठिकठिकाणीं आढळतें. पौराणिक कल्पनेचा अनुवाद साधुसंतांनीं प्राकृत भाषेमध्येंहि रेलचेल केलेला आहे; नामदेव, एकनाथ, तुकाराम यांच्या अभंगांच्या बाडांत कलिमहात्म्य म्हणून एक प्रकरण आहे आणि त्यांत समाजाची अत्यंत अवनत स्थिति वर्णन केलेली आहे, ती इतकी कीं, ती वाचून या जगांत जगण्यापेक्षां मरण बरें असेंच सहृदय वाचकाला वाटेल. पुराणांतील संस्कृत वर्णन आणि साधुसंतांचें मराठींतील चटकदार विवेचन पाहिलें, तर सर्वांचा सारांश थोडक्यांत असा देतां येईलः—

सर्व वर्ण शूद्रप्राय होतील. ब्राह्मण क्रियाभ्रष्ट होतील. गाई दूध देणार नाहींत. पतिव्रता कृत्या होतील. जानवें ही द्विजत्वाची खूण राहील. साधु ढोंगी होतील. पाऊस वेळेवर पडणार नाहीं. धर्म सांगणारे पाखंडी होतील. राजा प्रजेला पिळून काढील. पुत्र बापाचें ऐकणार नाहींत. पतिपत्नींचे कलह होतील. मुलगा आईला बायकोचीं लुगडीं धुवावयास लावील. विषयसुखावर जन आसक्त होतील. अर्थ हाच एक पुरुषार्थ राहील. मोक्षाचा विचार कोणीच करणार नाहीं. भावाभावांत प्रेम राहणार नाहीं. भावाबहिणींचें जमणार नाहीं. जावा आणि नणंदा कलह करतील. अतिवृष्टि, अनावृष्टि व रोग यांनीं लोक त्रस्त होऊन जातील. अग्नी आणि वीज यांचे उत्पात होतील. संन्याशांना कोणी विचारणार नाहीं. देवब्राम्हणांची अवहेलना होईल. लोक पापाचरण निःशंकपणें करतील. पंडित उदरंभरी होतील. कुकर्माचरणाला महत्त्व येईल. सदाचारवानाचा अपमान होईल. सारांश, जग उत्सन्न होण्यासारखे प्रकार कलियुगांत घडून शेवटीं प्रलय होईल. त्रेतायुगांतील माणसें अत्यंत नीतिसंपन्न, सुशील, धिप्पाड अशीं होतीं. रामचंद्राची सीता सात ताडांइतकी उंच होती. तेव्हांपासून माणसें दुर्बल व खुरटीं होऊं लागलीं आहेत. दिवसानुदिवस माणसें अशींच खुरटीं होणार. तीं इतकीं कीं, केव्हां तरी यांना हरभऱ्याच्या झाडाला शिडी लावून घाटे तोडण्याचा प्रयत्न करावा लागणार ! आणि इतकी दुर्बलता आल्यावर कलीचें पूर्ण राज्य होणार ! ! !

स्मृतिकारांपैकीं मनु आणि याज्ञवल्क्य हे दोघे तेवढे कलीला फारशी भीक

घालीत नाहींत. बाकीचे सर्व कलिप्रयुक्त अनर्थ डोळ्यांपुढें ठेवून प्रायश्चित्तधर्म सांगण्याला पुढें सरसावलेले आहेत. ' कलौ पाराशरास्मृता: ' अशी परिभाषा असून कलियुगांत पराशरस्मृति मान्य अशी महानिबंधकारांनीं मांडणी केली आहे. अर्थात् पराशरस्मृतीपासून सर्व स्मृति कलीची भीति मनांत बाळगून, वर्णसंकरानें भयचकित होऊन व जगत्क्षयानें व्यामोहित होऊन आसन्नमरण रोग्याला वैद्यलोक जसा एकादा मात्रेचा वळसा देतात तसें समाजाला फक्त प्रायश्चित्ताचे वळसे देत देत त्या समाप्त झाल्या आहेत. मुख्य धर्मापेक्षां प्रायश्चित्तधर्म दसपटीनें वाढलेले दिसतात त्याचें कारण केवळ कलि ! कलीचा प्रभाव आणि तज्जन्य दुराचार हीच कल्पना ! ! ! स्मृतिकार ज्याला पाहून भयभीत झाले, पौराणिकांनीं ज्याला पाहून त्याचें गुणवर्णन केलें आणि साधुसंतांनीं ज्याचें ईश्वरापेक्षां अधिक स्तोम माजविलें, असा हा कली हिंदुसमाजाच्या मनावर ईश्वरापेक्षां अधिक प्रभाव गाजवीत आहे यांत नवल तें काय ?

लोकसमाजाची प्रवृत्ति कर्तव्यविन्मुख करण्याला आणि दुराचरणसन्मुख होण्याला ही कलिकल्पना फारच उपयुक्त आहे. कलियुगांत अनर्थ होणार, जग बुडणार, धर्म लोपणार, नीति नष्ट होणार, आचार बुडणार म्हणून कांहीं करावयाचें कारण नाहीं. जरी यदाकदाचित् कोणी बरें करूं लागला तर जगांत कलीचें वर्चस्व इतकें आहे कीं, तो कोणाचीहि मात्रा चालूं देणार नाहीं. एवंच अवघ्या पांच हजार वर्षांत जर कलीनें इतकी चुणूक दाखविली तर राहिलेल्या ४ लक्ष २७ हजार वर्षांत काय होईल याची कल्पनाहि करवत नाहीं. अर्थात् मनुष्यानें कांहीं न करितां " बा कले, तुला नमस्कार असो, हे कले, तुझा प्रताप मोठा आहे. हे कलिराजा, तुला मी शरण आलों आहें " असें म्हणत कलिप्रयुक्त योग्य आचार ( दुराचार ) करीत राहावें यावांचून तरणोपाय नाहीं. अशा कल्पना हिंदुसमाजांत अहर्निश ऐकावयाला मिळतात.

जुन्या संस्कारांचीं माणसें तर इंग्रजी राज्यांतील नवीन नवीन गोष्टी पाहून ' कलि ' ' कलि ' म्हणून सदैव हळहळत असतात. एकाद्या युवतीच्या मस्तकावर केशालंकार पाहिला कीं, पहा हा कलीचा प्रताप ! एखादी तरुणी पोलकें किंवा जोडा घालून चाललेली आढळली कीं, पाहा कलीचें माहात्म्य ! कलीवरचें एक गाणें स्त्रियांच्या तोंडीं आढळतें. त्यांत आज नवीन दिसणारी प्रत्येक वस्तु व सुधारणा ही कलीमुळें आली अशी कल्पना आहे. " **कलीची करणी झालीं**

धोतराचीं उपरणीं" असा त्याचा प्रारंभ आहे. एखाद्या शास्त्र्याच्या मनगटांत घड्याळ पाहिलें कीं, पाहा हा कलीचा धर्म ! कुठें कपबशांचा खडखडाट ऐकिला कीं, पाहा हा कलीचा पराक्रम ! शाळेंत जातांना मुलामुलींचा घोळका पाहिला कीं, पाहा ही कलीची मजा, असें म्हणून कपाळाला हात लावीत बिचारे काळ कंठीत असतात. पूर्वकालापेक्षां ह्या कालांत ज्या नव्या गोष्टी दिसतात त्या सर्व कलीनेंच आणल्या आहेत अशीच या बिचाऱ्यांची समजूत ! ! नवीन राज्य, नवीन सोयी, नवीन संस्था हा जर सर्व कलीचा प्रताप समजून बोटें मोडावयाचीं तर या समाजांना काय चांगलें दिसणार ? कशावर ते संतुष्ट राहणार, आणि कशानें त्यांचें समाधान होणार, हें कळतच नाहीं. फार काय, पण कित्येक माणसें अशीं आहेत कीं, हे भलभलते प्रकार पहाण्यापेक्षां मरण बरें, लवकर एकदां डोळे मिटावेत असें म्हणून मृत्यूची वाट पहात बसतात. शकुन, दैववाद, वेदान्त, अवतारवेड या कारणांनीं दुर्बळ झालेल्या हिंदुसमाजाला कली किती निष्क्रिय करीत आहे याची कल्पना सुज्ञांच्या लक्षांत समाजाचें ढोबळ निरीक्षण केलें तरी सुद्धां येणार आहे. वरील कारणें समाजाला दुर्बल व प्रतिकारशून्य करितात; पण कलिकल्पना ही भलत्या आचाराला उत्तेजन देते, इतकेंच नव्हे तर तसेंच केलें पाहिजे असा संस्कार करिते ! ! काय हा अनर्थ आणि काय हें समाजदौर्बल्य ! ! तोंडांत गोमांस घातलें, स्त्री भ्रष्ट केली, अपमान केला, देवधर्माची निंदा केली, फार काय पण पाहिजे तें केलें तरी 'कलि' 'कलि' म्हणून स्वस्थ बसण्याची ही प्रवृत्ति समाजाला कधींहि जिवंत ठेवणार नाहीं.

हिंदुसमाजाला डोकें वर करण्याची आशाच नाहीं काय ? कारण भुतेंखेतें, अवतार, नशीब आणि शेवटीं हा कलि हीं सर्व हिंदुसमाजाच्या डोक्यावर बसलीं आहेत आणि सर्वांच्या भाराखालीं समाज दडपला जात आहे. हिंदुसमाजाला जर इतर समाजांप्रमाणें जिवंत राहावयाचें असेल, तर त्यानें ह्या आचरट कल्पना टाकावयास नको काय ? चार लक्ष बत्तीस हजार वर्षें कलीला घाणेरडा प्रताप चालवूं देणारा समाज जगामध्यें राहाण्याला योग्य आहे असें कोणीहि म्हणणार नाहीं.

प्रश्न असा येतो कीं, चार लक्ष बत्तीस हजार वर्षें हा एवढा दीर्घकाल कोणत्याहि समाजाला इतक्या हीन स्थितींत सतत ठेवूं शकेल काय ? वर्षाच्या बारा महिन्यांत निसर्गाच्या तीन तऱ्हा होतात. चोवीस तासांच्या अवधींत

गंभीर माणसाच्या स्वभावाचेहि चमत्कार पाहावयाला मिळतात. शंभर वर्षांच्या आयुष्यांत शरिराच्या विविध दशा आढळतात. असें असतां कलीचा मात्र दीर्घ कालपर्यंत सारखा एकच प्रकारचा प्रभाव दिसतो, हें म्हणणें अत्यंत अयुक्तिक आहे. बाल्य, तारुण्य, वार्धक्य ह्या शरिराच्या अवस्था; उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा हे एका संवत्सराचे नैसर्गिक स्वभाव, सत्त्व, रज, तम हे प्रकृतिचे गुण आढळत असतां कलीच्या या दीर्घ कालाचें वर्णन कुठेंहि एकच सांपडावें हें आश्चर्य नव्हे काय? कलियुगोक्त वर्णन केलेली लोकस्थिति ही एवढा दीर्घ काल कुठें तरी पहावयास मिळेल काय? कारण मनुष्यांचाच समाज बनतो. मनुष्याच्या स्वभावाच्या लहरींप्रमाणें समाजाच्याहि स्वभावलहरी असतात. एकच गोष्ट समाजाला लाखों वर्षें सारखी मानवते असें म्हणणें अत्यंत चुकीचें आहे. वृक्ष, काष्ठ, पाषाण, फार काय पण अगदीं माती घेतली तर तिच्यामध्यें रूपांतरें होतील आणि जातील, पण हिंदुसमाज मात्र चार लक्ष वर्षें अधोगतीच्या गर्तेंत जसाचा तसा राहणार हें म्हणणें किती असत्य आहे याचा वाचकांनींच विचार करावा.

शिवाय या कलीचा प्रभाव हिंदुस्थानांतच कां? इतर देशांत हा कली कां जात नाहीं? कां याच्या अंगीं खैबरखिंड ओलांडण्याचें सामर्थ्य नाहीं? कां महासागर उल्लंघण्याचें धैर्य नाहीं? कीं त्या देशांत या कलीला कोणी विचारीत नाहीं? आहे तरी काय? हिंदुस्थानालगत जपान देश असून त्यानें कलीचा विचार न करितां सुवर्णयुग करून ठेविलें नाहीं काय? तुर्की राष्ट्र हिंदुस्थानाशेजारीं असून त्यानें उत्कर्ष करून घेतला नाहीं काय? इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स या देशांवर कलीची स्वारी कधीं होत नाहीं काय? कां तेथील लोकांना व विमानांना कली भिऊन पळतो? युद्धांत बेव्हल झालेला जर्मनी हां हां म्हणतां व्यापारी रणक्षेत्रांत पुन्हां उतरला असून त्याजवर कलीची मात्रा मुळींच चालत नाहीं काय? कां हा कली फक्त दुर्बळांच्याच बोकांडीं बसतो? खरेंच! सबळ समाज, बलवान् राष्ट्रें आणि सामर्थ्यसंपन्न देश यांजवर जर कलीची मात्रा कांहींच चालत नाहीं, तर हिंदुसमाज समर्थ झाला म्हणजे कलीची हकालपट्टी आपोआप होईल असेंच म्हणावयाचें काय? अर्थात् हिंदुसमाजानें या कलिकल्पनेला गचांडी देण्याच्या उद्योगासच लागलें पाहिजे.

कलिकल्पना ही हिंदुधर्मांत कां आली? इतर धर्मांत कां आली नाहीं?

इतर धर्मांत इतका दीर्घ काळ कलिप्रभाव सांगितला असता तर बौद्धधर्मी जपान, मुसलमानधर्मी तुर्कस्थान व इजिप्त, तसेंच ख्रिस्तधर्मी इंग्लंड व अमेरिका हीं राष्ट्रें उदयास आलीं असतीं काय ? त्यांच्या धर्मांत चार लक्ष वर्षांची आचरट कलिकल्पना असती तर त्यांचा उत्कर्ष कधींच झाला नसता. एकंदरींत विचार करतां परधर्मांत ही कल्पना नाहीं किंवा असली तरी लोकांच्या मनावर तिचा परिणाम झालेला नाहीं, किंवा परिणाम होतो असें पाहतांच त्या राष्ट्रांतील तज्ज्ञांनीं त्या कल्पनेचें उच्चाटण केलें आहे, असें कांहीं तरी मानलेंच पाहिजे. हिंदुस्थानाला जर इतर राष्ट्रांप्रमाणें वर्धिष्णु व जयिष्णु व्हावयाचें असेल तर त्यानेंहि या दीर्घकाल प्रचालित असलेल्या कलिकल्पनेला हिमालयांत पाठविलेंच पाहिजे. हिंदुसमाजाच्या मुळावर जन्मलेला हा कली नाहींसा केल्यावांचून हिंदुसमाजाला शांतिसुख कधींहि प्राप्त होणार नाहीं, हें त्रिवार सांगितलें पाहिजे.

आम्हीं कलिभक्ताला असें विचारतों कीं, आगगाडया व मोटारींनें जें कलियुग येतें तें बैलगाडयांनीं जातें काय ? तरुणतरुणींचे घोळके शिक्षणाकरितां एकत्र जमले कीं, जो कली येतो तो मुलांना व मुलींना शिक्षणाविना ठेवलें कीं, तात्काल जातो व कृतयुगास प्रारंभ होतो काय ? वैदिकांना चहाच्या ऐवजीं तुळशीचा काढा दिला, शास्त्र्यांच्या मनगटांवरचीं घडयाळें काढून त्यांच्या गळ्यांत गंघाळें बांधलीं, तरुणांच्या डोक्यावरील केशालंकार काढून जटा ठेवल्या, पोलक्यांच्या जागीं चोळ्या, उपरण्यांच्या जागीं दुहेरी धोतरें, कपबशांच्या जागीं ताम्हनें व पंचपात्र्या आणल्या म्हणजे हा कली जाणार कीं काय ? तसें असेल तर एकेका गांवामध्यें एकेका ठिकाणीं कृतयुगांतील वरील चिन्हांच्या वस्तू सहज ठेवतां येतील. याला उत्तर कलिभक्त काय देईल ? वाचकहो, त्या कलिभक्ताला आणखी असें विचारतां येईल कीं, गाईनीं दूध न देणें, वेळेवर पाऊस न पडणें, माणसें खुजीं होणें इत्यादि गोष्टी कृतयुगांत नव्हत्या काय ? कलिपूर्व युगांमध्यें असत्य, अन्याय, पाप, दैन्य वगैरे बिलकुल नव्हतें काय ? जर या गोष्टी मुळींच नव्हत्या तर एकदम कलींतच त्या कशा आल्या ? जें मुळींच नव्हतें तें एकदम कसें आलें ? जुना कलिभक्त शेवटीं रागानें असें म्हणेल कीं साधुसंत, पौराणिक व स्मृतिकार यांच्यापेक्षां तुम्ही ज्ञाते आहांत काय ? मोठे आलां आहांत आम्हाला सांगायला ! हेंच त्याचें शेवटचें शस्त्र, पण तें शस्त्र कसें बोथट आहे हें आतां दाखवितों.

वेदांग ज्योतिषामध्यें पंचसंवत्सरमय युग मानलें असून त्या पांच वर्षांचीं नांवें संवत्सर, परिवत्सर, इदावत्सर, अनुवत्सर व इद्वत्सर अशीं सांगितलीं आहेत. वेदांगज्योतिषाचा काल ख्रिस्तपूर्व ११८१ वर्षें हा आहे. बौधायन, गर्ग व वेदांग ज्योतिषकार हे समकालीनच होत असें दिसतें. वेदांच्या सहा प्रसिद्ध अंगांपैकीं ज्योतिष हें एक अंग असून वेदांग ज्योतिषग्रंथाला युगकल्पनेच्या संख्येच्या दृष्टीनें पुराणांपेक्षां अधिक प्रामाण्य आहे. वेदांग ज्योतिषाप्रमाणें इतरत्रहि असेच उल्लेख आहेत.

**युगस्य पंचवर्षस्य कालज्ञानं प्रचक्षते**—वेदांग ज्योतिष.

**युगमाहुः पंचाब्दं रविशशिनोः संहितांगकारायें**—ब्रह्मसिद्धांत अ. ११

**रविशशिनोः पंचयुगं वर्षाणि पितामहोपदिष्टानि**—वराहमिहिर.

या सर्व आधारांवरून पंचसंवत्सरमय युग असें गणित त्या काळीं होतें असें दिसतें. पुराणनिरीक्षणकर्ते काळे असें म्हणतात कीं, ही वैदिक कालगणनापद्धति नाभानेदिष्टानें सुरू केली असावी. व्यासांच्या वेळचें युगाचें कोष्टक असें होतें:—

४ वर्षें = १ युग, ७२ युगें = १ मन्वंतर = २८८ वर्षें, १४ मन्वंतरें = १ कल्प = ४०३२ वर्षें. या संख्येचा विचार केला म्हणजे चार लक्ष बत्तीस हजार वर्षांचें हें कुठलें खूळ कुणीं आणलें याबद्दल आश्चर्य वाटतें !

चार वर्षांचीं चतुर्युगें होतीं हें ठरविण्याला महाभारतांत एक प्रबळ पुरावा सांपडतो. पांडवांचा वनवास अवघा बारा वर्षांचा होता हें सर्वश्रुत आहे. पण त्यांत तीन ठिकाणीं युगसंधीचा विचार आला आहे.

**संधिरेष नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च**–वनपर्व १२१–१९

**संधिर्द्वयोर्नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च ॥**–वनपर्व १२५–१४

**एतत्कालियुगं नाम अचिराद्यत्प्रवर्तते**–वनपर्व १४९–३७

वनपर्वांतील सर्व वाक्यांवरून बारा वर्षांच्या अवधींत एकदां त्रेताद्वापरांचा संधी होता आणि एकदां द्वापरकलींचा संधी होता असें दिसत आहे. अर्थात् हीं युगें एकेक वर्षाचीं मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. गदापर्वांत 'प्राप्तं कलियुगं विद्धि' असेंहि वाक्य आहे. महाभारतांतील इतर पर्वांत अशीं पुष्कळ

वाक्यें आहेत कीं, त्यांची संगति कली हा १०००।१२०० वर्षांचा होता या कल्पनेनें मुळींच लागत नाहीं.

श्रुतींमध्यें कलिकल्पना एका निराळ्या तऱ्हेनें सांगितली आहे. पुराणांपेक्षां श्रुतिवाक्याला अधिक महत्त्व आहे हें शास्त्रसिद्ध आहे. ऐतरेय ब्राह्मणांत कलियुगाची पुढीलप्रमाणें कल्पना आहे—

**कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः ।**
**उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ॥** ऐतरेय ब्राम्हण

याचाच अनुवाद मनुस्मृती अ. ९ मध्यें पुढीलप्रमाणें आहे—

**कृतं त्रेतायुगं चैव द्वापरं कलिरेव च ।**
**राज्ञो वृत्तानि सर्वाणि राजा हि युगमुच्यते ॥ ३०१ ॥**
**कलिः प्रसुप्तो भवति स जाग्रद्द्वापरं युगम् ।**
**कर्मस्वभ्युद्यतस्त्रेता विचरंस्तु कृतं युगम् ॥ ३०२ ॥**

महाभारतांत चतुर्युगाबद्दल पुढील विचार आहेत-

**राजा कृतयुगस्रष्टा त्रेताया द्वापरस्य च ।**
**युगस्य च चतुर्थस्य राजा भवति कारणम् ॥** १२।६९।९८
**राज्ञः प्रमाददोषेण दस्युभिः परिमुष्यताम् ।**
**अशरण्यः प्रजानां यः स राजा कलिरुच्यते ॥** १२।१२।२६
**राजैव युगमुच्यते** १२।९१।६
**दंडनीत्यां यदा राजा सम्यक्कात्स्न्येन वर्तते ।**
**तदा कृतयुगं नाम कालसृष्टं प्रवर्तते ॥** १२।६९।८०
**कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।**
**इति ते संशयं मा भूत् राजा कालस्य कारणम् ॥**१२।६९।७९

अर्थ—झोंपी गेले कीं कलियुग लागतें, ( आळस सोडून ) जागे झाले कीं, द्वापरयुगास प्रारंभ होतो. उठून बसणें हें त्रेतायुगाचें लक्षण होय व उद्योग म्हणजेच कृतयुग होय. यासाठीं मनुष्यानें उद्योगच केला पाहिजे.

कृत, त्रेता, द्वापार व कली हीं सर्व राजाच्या वागणुकीवर असतात म्हणून राजा हाच युग होय. राजा निजला कीं कली, जागृत झाला कीं द्वापर, कर्तव्य करण्यास उद्युक्त झाला कीं त्रेता व साक्षात् तें करूं लागला कीं कृतयुग सुरू होतें.

कृत, त्रेता, द्वापरयुगाचा स्रष्टा व कलियुग निर्माताहि राजाच होय. राजा हाच सर्व युगांचें कारण आहे. राजाच्या चुकीमुळें चोरांकडून प्रजा लुटली जाते व प्रजांचें रक्षण करण्यास जो राजा असमर्थ असतो त्याला कलि असें म्हणावें. राजा जेव्हां उत्तम प्रकारें दंडनीतीचें धारण करितो तेव्हां कृतयुग नांवाचें कालचक्र चालू होतें. काल हें राजाचें कारण कां राजा हें कालाचें कारण असा संशय न आणतां **"राजा कालस्य कारणं"** असें समजावें. हल्लीं सर्व जगांत प्रजासत्ता आहे आणि यापुढें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा प्रसार होत आहे. एका व्यक्तीच्या हातांतील सत्ता जाऊन ती एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेनें पूर्ण भरलेल्या बहुजनसमुदायांत हळुहळु संक्रांत होणार आहे. अशा वेळीं राजाचा राजेपणा प्रजेच्या हातांत जाणार आहे. म्हणून **'प्रजाहि युगमुच्यते'** असें आतां लवकरच म्हणावें लागेल. राजा अज्ञानांधकारांत घोरत पडला असतां कलियुगास प्रारंभ होतो. तो जागा झाला म्हणजे द्वापरयुग चालू होतें असें जें म्हटलें आहे, तेंच जनता अज्ञानांधकारांतून जागृत झाली म्हणजे द्वापरयुग सुरू झालें असेंहि म्हणतां येईल. अर्थातच जनता–जनार्दन जागा झाल्यापासून कलियुगाचा लोप होऊन द्वापरयुगास प्रारंभ झाला असें यापुढें कां म्हणूं नये ? असा कलीच्या अभिमान्यांना आमचा प्रश्न आहे.

हिंदुसमाज जिवंत ठेवावा असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं कृपा करून चार लक्ष बत्तीस हजारांची कलिकल्पना अजिबात सोडून द्यावी आणि श्रुति-स्मृतींतील वरील वास्तविक कल्पना लोकांना समजावून देऊन त्यांचें दौर्बल्य घालवावें. **'कलिः शयानो भवति'** ही कलिकल्पना समाजाला शिकवावी किंवा **'राजाहि युगमुच्यते'** ही मनुस्मृतींतील व भारतांतील कल्पना लोकांना सांगावी; परंतु कलि हा चार लक्ष बत्तीस हजार वर्षें राहणार आहे व दुष्कर्में करविणार आहे, हें गणित साफ चुकीचें आहे असें लक्षांत ठेवावें.

वेदांग ज्योतिषांतील पंचसंवत्सरमय युगाची कल्पना ही समाजाला शिकवून पांच पांच वर्षांनीं युग बदलण्याचें सामर्थ्य कर्तृत्वानें आपल्या अंगीं येतें असा आत्मविश्वास समाजांत उत्पन्न केला पाहिजे. ही पांच वर्षांची युगकल्पना कोणाला अव्याप्त वाटली तर त्यांनीं चार लक्ष बत्तीस हजार वर्षें ही अति-व्याप्तीची कल्पना सोडून मधल्या हजार बाराशें वर्षांची युगकल्पना फार तर स्वीकारावी. पुराणमतवाद्यांना त्यांच्या भिडेस्तव आम्ही एवढीच सवलत देतों.

पण त्यांना विनंति अशी आहे कीं, मुसलमानांचा प्रवेश जेव्हां हिंदुस्थानांत झाला तेव्हांच हिंदुस्थानांत कली आला ! त्यानें हजार बाराशें वर्षें हिंदुस्थानांत म्लेंछराज्य करून आपली कारकीर्द संपविली. आठव्या शतकांत प्रविष्ट झालेला कलि विसाव्या शतकांत म्हणजे बरोबर बाराशें वर्षांनीं नष्ट झालेला असून आतां कृतयुगाचा अरुणोदय होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत, अशा वेळीं हिंदुसमाजानें खडबडून जागें झालें पाहिजे व त्याला शाहाण्यांनीं जागें केलें पाहिजे. याप्रमाणें फक्त हजार बाराशें वर्षांचें कलियुग होतें या विधानाला श्री. ज. स. करंदीकर, सह-संपादक, केसरी, यांचें पुष्टिकारक मत चित्रमयजगत् जानेवारी १९२२ मध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. त्यांचें व विद्वद्रत्न रा. दप्तरी यांचेंहि मत येथें नमूद करितों.

१. " कलियुगारंभ इ. स. पू. ३१०१ सालीं झाला असें आर्यभट्टादि ज्योतिषांनीं आपल्या वेळीं गणितानें ठरविलें; पण त्या वेळीं युगांची वर्ष संख्या ३६० नें गुणिल्यामुळें भलतीच वाढून बसली होती ! ऋग्वेदकालीं युगांचें कालमान अगदीं कमींत कमी चार वर्षांचें होतें. तैत्तिरीय संहितेंत तें पांच वर्षांचें झालेलें दिसतें. ही किमान मर्यादा झाली. पण युगांची कमाल मर्यादा कोठें शंभर तर कोठें १०००, तर कोठें १०,००० पर्यंतहि जात असे. पण सामान्यतः एक हजार वर्षांचें युगचक्र ( चतुर्युग किंवा महायुग ) सर्वमान्य दिसतें. पुढें या युगकालाची रोजच्या दिवसाशीं साम्यता कल्पिल्यानें त्याला संधिकालाची जोड मिळून संधिकालासह बाराशें वर्षांचें युगचक्र ठरलें. "

२, "—युग म्हणजे तीच गोष्ट पुनः पुनः होण्याचा काळ. अशीं अनेक युगें तेव्हां माहीत असावीं. वर्ष हें एक युगच आहे. कारण वर्षानें पुनः तीच ऋतु परतून येतो. चार वर्षें हेंहि युगच आहे. कारण तेव्हांच्या कालगणनापद्धतीप्रमाणें चौथ्या वर्षीं विषुवान् येत असे. पांच वर्षें हेंहि युगच आहे. कारण वेदांगज्योतिषांत पांच वर्षांचें युग मानलें असून तैत्तिरीय ब्राह्मणांत ( १-४-१० ) पहिलीं चार वर्षें व त्यांचे स्वामी सांगितले आहेत.......

सर्व पुराणांच्या मतें कलियुगाच्या दुप्पट द्वापर, तिप्पट त्रेता व चौपट कृत आहे. या शब्दांचे जे दुसरे अर्थ आहेत त्यांवरून हेंच सिद्ध होतें. यावरून कलि १००, त्रेता २००, द्वापर ३०० व कृत ४००. चार युगांचीं मिळून १००० वर्षें होतात. हजार वर्षें हें एक महत्त्वाचें कालमान होतें व त्या कल्पाच्या शेवटीं द्वादशवार्षिक यज्ञ करीत असा सिद्धान्त निघतो." (दप्तरांकित-वे. का. ग. प.)

अलीकडील धर्मनिबंधग्रंथांमध्यें " कलिवर्ज्यानि " असें एक प्रकरणच दिलेलें आहे. निर्णयसिंधु, स्मृतिकौस्तुभ, मदनपारिजात, इत्यादि ग्रंथांमध्यें कलिवर्ज्यांचें विस्तृत विवेचन आहे. कलिवर्ज्यांत अनेक गोष्टि आहेत. त्यांत अग्निहोत्र, संन्यास, परदेशगमन इत्यादि वर्ज्य आहेत असें म्हटलें आहे फक्त परदेशगमनाचा विचार करून हें प्रकरण संपवितों.

आज सगळ्या जगांत नाविकशास्त्र फार पुढें गेलेलें आहे. जमिनीवरचीं युद्धें थांबून आतां समुद्रांत युद्धें होऊं लागलेलीं आहेत. ज्याच्या हातीं सर्व समुद्रावरची सत्ता त्याच्या हातीं जगाची सत्ता असें आजचें तत्त्व आहे. परंतु हिंदुसमाजाची समजूत अशी कीं, कलियुगांत परदेशगमन निषिद्ध आहे. शास्त्र असें म्हणतें—

**द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्याप्यसंग्रहः ।**

समुद्रांतून नौकेनें गमन करणाऱ्या द्विजाला प्रायश्चित्त देऊनही जातींत घेतां येत नाहीं. तसेंच धर्मतत्त्व या ग्रंथांत पुढील वाक्य आहे.

**अब्ध्याजीवी न संग्राह्यो निष्कृत्यापि कलौ युगे ॥**

समुद्रावर उपजीविका करणारा प्रायश्चित्तें देऊन देखील संग्राह्य होत नाहीं. या वाक्याचा वर सांगितलेल्या वाक्याशीं समन्वय केल्यास नावाड्याचा धंदा करणारा द्विज ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ) असंग्राह्य असा अर्थ निघतो. पण असा अर्थ करून परदेशाला त्रैवर्णिकांनीं जाणें व नाविकाचा धंदा करणें चुकीचें असें ठरवावयाचें कीं काय ? प्रायश्चित्त म्हणजे शिक्षा आहे. चुकीला प्रायश्चित्त यावें. विद्यार्जन, देशपर्यटण, उद्योगधंदे यांकरतां सर्व जग आज आक्रमिलें पाहिजे. जगांतल्या सर्व समाजांत व राष्ट्रांत केवढ्या हालचाली चालल्या आहेत बरें ? हिंदुसमाजानें अशा हालचाली करणें हें चुकीचें आहे काय ? परदेशगमन ही चुकी व तीकरतां प्रायश्चित्त ही कल्पना हिंदुसमाजानें नष्ट करावी. अकबरानें राजा मानसिंगास अटकेपार स्वारी करण्यास पाठविलें. मानसिंग हा हिंदु असल्यामुळें अटकेपलीकडे जाण्यास त्याचें मन धजावेना. त्यानें अटकेचें उल्लंघन कसें करूं असें अकबराला पत्रद्वारें विचारलें. अकबरानें जो दोहा लिहून पाठविला तो असा—

**ये सब भूमी श्रीकृष्णको इसमे अटक कहां ?**
**जिसके मनमे अटक है उसको अटक रहा ।**

बा हिंदुसमाजा, इतर सर्व राष्ट्रांत आणि इतर समाजांत कृतयुगाचें आगमन होत असतां व आगमनसूचक चंडोल पक्षी सुस्वर गात असतां तूं ' कलि कलि ' म्हणून असाच झोंपी जाणार काय ? ज्या कलीचा प्रताप दुसऱ्या देशांवर, धर्मांवर व राष्ट्रांवर होत नाहीं त्या कलीला यापुढें हद्दपार नाहीं कां करणार ? दैववाद, नैराश्यवाद, संन्यासवाद यांच्या जोडीला कलीला बसवून, बा हिंदु-समाजा, तूं आपली हानी नाहीं कां करून घेतलीस ? हिंदुबंधूनो, तुम्ही कलीला भिणार कां ईश्वराला भिणार ? ईश्वराला भीत असाल तर मनांतून कलिकल्पनेची व समाजांतून कलिपुरुषाची हकालपट्टी जितकी लवकर करतां येईल तितकी करा. झोंपी गेलेल्या समाजाला डोळे चोळत चोळत जागा होण्याला फार तर चारपांच वर्षें म्हणजे एक कलियुग लागेल. तेंहि आतां संपलें आहे असें समजून कर्तव्यतत्पर व्हा, समाजबल वाढवा आणि समाज दुर्बल बनण्याला कलीसारखीं जीं आचरट कारणें झालीं असतील, तीं समूळ नष्ट करा, तरच तुम्ही या जगांत वांचाल. कलीला ठेवावयाचेंच असेल तर दगड, झाड यांप्रमाणें ठेवा. तुमच्या कर्तृत्वाच्या आड तो येत असेल तर त्याला नाहींसा करा व तुमचें मनोबल वाढवा.

---

# प्रकरण पांचवें

## मनोबल विचार

### दैववाद किंवा नशीब

हिंदुसमाजाच्या मानसिक दौर्बल्याचा विचार करितांना दैववाद किंवा नशीब हा एक प्राणि अकस्मात् पुढें येऊन उभा राहतो. हिंदुसमाजावर या दैववादाचें इतकें अनिरुद्ध व स्वैर साम्राज्य चालत आलें आहे कीं, त्याचा पराभव कितीहि उद्योगी मनुष्याला करणें कठीणच जाईल. सर्व कांहीं दैवानें होतें. दैव, नशीब, सद्दी, प्रारब्ध, ग्रहदशा हे सर्व शब्द समानार्थी योजण्यांत येतात. दैवांत असेल तरच बायको मिळते, संपत्ति मिळते, राज्य मिळतें व आरोग्य मिळतें; एक

दैव अनुकूल असलें म्हणजे झालें. दैवानें मुलें होतात, सुखहि मिळतें. सारांश, दैवाची लीला अगाध आहे. दैव हें नपुसकलिंगी आहे. त्यांत कर्तृत्व, उत्साह व तेज हीं नाहींत. दैवाचें स्वरूप असें असल्यामुळें त्याचे उपासकहि त्याच स्वरूपाचे झाल्यास नवल काय? हिंदुसमाजाची खच्ची या दैववादानें बरीच केली आहे. दैववादाला साह्य करणारा वेदांत भेटला व वेदांताला मदत करणारा कलि भेटला! असे हे त्रिदोष एकत्र जमून कुपित झाल्यावर मग हिंदुसमाजाच्या चिंधड्यान् चिंधड्या कां न व्हाव्यात? कर्माची गति गहन आहे. कर्म हें भोगल्याशिवाय सुटत नाहीं. करावें तसें भरावें। तुका म्हणे उगी राहावें। जें जें होईल तें तें पाहावें. प्रारब्ध हें अटळ आहे. त्याचें दुःख कमी व्हावें म्हणून पाहिजे तर अनिष्ट ग्रहांना दानें द्यावींत. साडेसाती आली आहे असें समजून जपजाप्य करावें, इत्यादि कल्पना हिंदुसमाजाच्या हाडींमासीं खिळल्या आहेत. कर्म करावें, कर्तव्य करावें, तीव्रतर क्रियमाण करावें, जोराचा व नेटाचा उद्योग करावा, कांहीं अद्भूत करून मरावें असा विचार एखाद्या तरुणाच्या डोक्यांत डोकावूं लागला कीं, दैववाद येतो व त्याचा नाश करितो! शाळेंतील तरुणांना विचारलें कीं, "अरे तुम्ही १०० वर्षे जगून देश, धर्म व समाजकार्य करणार काय?" तर तरुण म्हणतात, "जगणें मरणें दैवाधीन आहे. शेवटीं दैव काय करील तें खरें!" विद्वान् व वृद्धहि दैववादाला मान देतात असें हें विचित्र दैव आहे.

दैव श्रेष्ठ कीं उद्योग श्रेष्ठ, मनुष्यप्रयत्न सबळ कीं प्रारब्ध सबळ, मनुष्य करितो कीं ईश्वर करवितो इत्यादि प्रश्न या विषयांत संभवतात. ठिकठिकाणीं या सर्व प्रश्नांच्या चर्चा झाल्या आहेत. सिद्धान्तपक्ष म्हणून जे सिद्धान्त या चर्चेच्या उपसंहारांत दिलेले आहेत तेवढेच लक्षांत ठेविले पाहिजेत. योगवासिष्ठांत दैव श्रेष्ठ कीं उद्योग श्रेष्ठ असा प्रश्न घेऊन त्याची सुंदर चर्चा केली आहे आणि शेवटीं उद्योग श्रेष्ठ असा निकाल दिलेला आहे. वसिष्ठांनीं श्रीरामचंद्राला जो दैवोद्योगाचा पाठ दिलेला आहे त्यांतील सिद्धान्तभूत वाक्यांचा पुढीलप्रमाणें निष्कर्ष आहे. "हे रामचंद्रा, जगांत सर्व कांहीं यत्नानेंच मिळतें. मात्र तो यत्न सम्यक्प्रयुक्त पाहिजे. अचुक यत्न पाहिजे, कार्यकारणसंबंध लक्षांत घेऊन तो यत्न पाहिजे. उद्योगानेंच कोणीहि सामान्य मनुष्य इंद्रपदाची प्राप्ति करून घेतो. उद्योगानेंच त्रैलोक्याचें ऐश्वर्य उपभोगितां येतें. दैव हा पदार्थ मूर्खांनीं व आळशांनीं आणलेला आहे. दैवाचें अस्तित्व

प्रयत्नांतच आहे. कर्म जर नसेल तर प्रारब्ध येणार कुठलें ? रामा, पूर्व-कर्माला प्रारब्ध म्हणतात. पण तें प्रारब्धहि पूर्वप्रयत्नांचेंच फळ असतें. पूर्व-कर्म व उद्योग हे दोन एडके आहेत. त्यांत पूर्वकर्मरूपी एडक्याला उद्योगानें व तीव्रतर क्रियमाणानें हटवितां येतें. उद्योग हें प्रत्यक्ष प्रमाण व दैव हें अनुमान प्रमाण होय. अनुमानापेक्षां प्रत्यक्षाची किंमत केव्हांहि अधिक आहे. दांत ओंठ खाऊन, धैर्य धरून उद्योग केला पाहिजे, व प्रारब्धाची कल्पना यत्नानें पायाखालीं तुडविली पाहिजे. जगांतील राज्यें उद्योगीच मिळवितात. जगांतील उलाढाली कर्ते लोकच करितात. परंतु षंढ मात्र नशीब नशीब म्हणून हाका मारीत बसतात. एखाद्या भिक्षुकावर एकदम राज्याभिषेक झाला, आणि एकाद्या गरीब मुलीला एकदम राजानें पट्ट-महिषी केली तर या ठिकाणींसुद्धां दैवाचा थोडाच संभव आहे, पण पूर्व-प्रयत्न जोरदार आहे. सर्व कांहीं दैव करितें अशी कल्पना असेल, तर दैवानेंच दाह होईल म्हणून अग्नींत उडी टाकावी. दैवानेंच मृत्यु येईल म्हणून कड्यावरून घालून घ्यावें. दैवानेंच मुलगा पंडित होईल म्हणून त्याला शाळेमध्यें न घालतां अगदीं निरक्षर ठेवावें. दैवांत असेल तर जगेन म्हणून विष प्यावें. दैवांत आरोग्य असेल तर स्नान, कपडे धुणें, घर स्वच्छ ठेवणें यांची बिलकुल जरूर नाहीं म्हणून घाणेरडें असावें. रामा, दैवपर माणसें क्षीण झालीं आहेत आणि मेलीं आहेत. जे शूर, वीर, पराक्रमी, प्राज्ञ, अतिप्राज्ञ झाले ते पौरुषप्रयत्नानेंच उत्तम पदाप्रत गेले आहेत. अनुद्योगाच्या मागें लागून मनुष्यानें पुरुषगर्दभ होऊं नये. या संसारकुहरांतून जर सुटावयाचें असेल तर शास्त्रनियंत्रित उद्योग करून मनुष्यानें मुक्त झालें पाहिजे. रामा, आळशांनीं आणि षंढांनीं दैव पुढें आणलें आहे. तें कार्यकारणविवर्जित आहे. त्याचें स्तोम माजवूं नकोस. दैव हें रड्या लोकांनीं पुढें आणिलें आहे. परंतु कर्त्या पुरुषांनीं त्या दैवाला लाथ मारिली आहे. जगांत जर आळस नसेल तर दैवाची भाषा पुढें येणार नाहीं आणि लोक दरिद्रीहि दिसणार नाहींत. नरपशूंनीं भरलेलें, आळशांनीं थाटलेलें जें जग दिसतें त्याचें कारण दैव-वादाचा पुरस्कार हें होय. ”

महाभारत, रामायण व इतर पुराणें यांमध्यें दैववादाचा ऊहापोह पुष्कळ स्थळीं

आलेला आहे. त्या सर्व ऊहापोहामध्यें अति प्रयत्न ते केले अचुक केले. व कोणत्याहि प्रकारचें न्यून न ठेवतां तीव्रतर यत्न करून जेव्हां सिद्धि मिळत नाहीं तेव्हां दृश्य प्रयत्नापलीकडे अदृष्ट अशी एक शक्ति आहे व ती दैव असावी असा सिद्धान्त ठरविला आहे. मानवी प्रयत्नांची शिकस्त करावी पण ती करूनहि यश न आलें तर मन:समाधानार्थ दैव म्हणून कांहीं अदृष्ट शक्ति आहे असें समजावें. भारतांत दैववादाचा उपदेशहि दु:खप्रसंगींच केलेला आहे. आर्त, दु:खित, पीडित, व्याधिग्रस्त माणसाला त्याशिवाय समाधान नाहीं. भगवान् व्यासांनीं भारतांत आपलें मत सांगितलें तें पुढीलप्रमाणें आहे.

मानुष यत्न न करितां जो दैवाच्या मागें लागतो तो क्लीब पतीशीं गांठ पडलेल्या स्त्रीप्रमाणें कष्टी होतो. दैववादी मनुष्य नि:संशय सुशीघ्रनाश पावतो. नपुंसक दैवाची आराधना करितो पण मर्द सारखा सदुद्योग करितो. राजालासुद्धां उद्योगाशिवाय अर्थसिद्धि होत नाहीं. सतत यत्न करावा, त्याला दैवाची जोड मिळतांच यश मिळतें. हे महाबाहो, सुविचार, सुमंत्र, सुकृत व सुविक्रम यांनीं कार्यसिद्धि होतें. दैव हें या चतुष्ट्याभोंवतीं प्रदक्षणा करीत असतें. शब्दशूरापेक्षां कर्तृत्वशूराचें वजन अधिक असतें. यत्नानेंच देवांना अमृतप्राप्ति झाली. यत्नानेंच असुरांचा नाश झाला आणि यत्नाच्या जोरावरच महेंद्रानें स्वर्गांत श्रेष्ठपद मिळविलें. विद्या, तप व लौकिक यांपैकीं, कांहींहि पाहिजे असेल तर सपाटून यत्नच केला पाहिजे.

वेदान्तशास्त्रदृष्ट्या मनुष्याच्या कर्मांचे तीन विभाग पडतात. प्रारब्ध, संचित व क्रियमाण, हे ते तीन विभाग होत. त्यांतील क्रियमाण हेंच मुख्य असतें. क्रियमाण म्हणजे मनुष्य नेहमीं जें करीत असतो तें कर्म. तेंच पुढें संचितांत व प्रारब्धांत जमा होतें. लोकमान्य टिळकांनीं कर्मांचे याच परिभाषेवरून प्रारब्ध व अनारब्ध असे दोन प्रकार मानले आहेत. ज्या कर्माचा उपभोग चालू आहे तें प्रारब्ध व ज्याचा उपभोग चालू नाहीं तें अनारब्ध. अनारब्ध कर्मांत संचितहि येतें. तीव्रतर क्रियमाणानें प्रारब्धहि हटवितां येतें. क्रियमाणाचें स्वातंत्र्य मनुष्याला आहे. मनुष्य हा मायापाशांत जरी गुरफटलेला असला तरी त्याला कर्तृत्व आहे. तो कांहीं नदींतून वाहून जाणाऱ्या लांकडाच्या ओंडक्यासारखा नाहीं. जीवाला म्हणजे मनुष्याला स्वातंत्र्य आहे. इच्छाशक्ति आहे, क्रियाशक्ति आहे. ती स्वतंत्र आहे म्हणूनच जीव हा पाणिनीच्या सूत्राप्रमाणें " स्वतंत्र: कर्ता "

असा आहे. किंवा भगवान् बादरायणाच्या सूत्राप्रमाणें जीव स्वतंत्र आहे. मनुष्याचें स्वतंत्र कर्तृत्व आहे म्हणून शास्त्राला अर्थवत्व आहे. " कर्ता शास्त्रार्थवत्वात् " असें सूत्र आहे. " सत्यं वद, धर्मं चर, अहरहः संध्यामुपासीत " इत्यादि वाक्यें मनुष्याला स्वातंत्र्य आहे म्हणूनच खरीं ठरतात. एवंच जीव हा स्वतंत्र आहे. त्याचें कर्तत्व स्वतंत्र आहे. त्याला इच्छास्वातंत्र्य आहे. तो कांहीं परेच्छेनें चालणारा पशु नाहीं. असा शास्त्रसिद्धान्त लक्ष्यांत ठेविला तर दैववाद किती पुळपुळीत आहे याचें प्रत्यंतर येतें. दैववाद हा बराचशा दृष्टीनें आळशांना सोयीस्कर आहे असें वरील विवेचनावरून सिद्ध करितां येईल.

श्रीमद्भगवद्गीतेंत कोणत्याही कार्यसिद्धीची सामग्री सांगितली आहे. अधिष्ठान, कर्ता, साधनें, उद्योग व पांचवें दैव असें तेथें म्हटलें आहे. " **अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधं । विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम्** ॥ अ० १८ ॥ ह्याप्रमाणें दैव हें एक मानलें तरी तें अगदीं शेवटचें आहे. तथापि गीतेंतील या दैव शब्दाचा अर्थहि इंद्रियाधिष्ठित देवता असाच आहे. दैव म्हणा किंवा देव म्हणा, पण तो देव प्रयत्नांतीं परमेश्वराच्या स्वरूपांत आहे. प्रयत्न केला, उद्योग केला, कष्ट केले कीं, त्या श्रमाचें फळ ईश्वराला देणें भाग पडतें. उद्योगाशिवाय ईश्वर कधींही कृपा करीत नाहीं. नुसता ईश्वराचा नामघोष करणाऱ्यावर ईश्वराची कृपा होत नाहीं. तर सतत उद्योग करणाऱ्यांनाच ईश्वर साह्य करीत असतो.* " **न ऋते श्रांतस्य सख्याय देवाः** " देव श्रांतांच्याच मैत्रीची इच्छा करितात. देव जसा उद्योगाच्या शेवटीं बसलेला आहे तशीच दैवाची स्थिति आहे. आधीं दैव नसून आधीं उद्योग आहे, कर्तृत्व आहे. नंतर फळ देण्याचे वेळीं दैव आहे. दैव हें स्वतंत्र नाहीं. त्याची तरी परीक्षा उद्योगच करीत असतो. दैवांत विद्या आहे कीं नाहीं हें शाळेंत जाऊन अभ्यास केल्यावांचून समजत नाहीं. दैवांत पैसा आहे कीं नाहीं हें तरी कांहीं न करितां कसें ठरविणार ? सारांश, दैव हें निर्जीव व पंगू असून उद्योग हा सजीव व स्वावलंबी आहे. अनेक कवींनीं, वेदांत्यांनीं, सत्पुरुषांनीं, सुभाषितकारांनीं जरी दैवाचीं एकांतिक वर्णनें केलीं असलीं तथापि त्याची संगति उद्योगमहतीवांचुन स्वातंत्र्यानें लागत नाहीं. **उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः । दैवेन देयमिति**

*God helps those who help themselves या इंग्रजी म्हणीचें येथें स्मरण होतें.

**कापुरुषा वदन्ति दैवं निहत्य कुरु पौरुषमात्मशक्त्या । यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ॥**

या सुप्रसिद्ध सुभाषितांत यत्न करून सिध्दी पाहावी. ती न मिळाल्यास आपणाकडे दोष नाहीं. असें म्हटलें आहे. यत्नानेंच सिद्धि मिळते, नुसत्या दैवानें मिळत नाहीं, विवाह न करितां नुसत्या नवसानें मुलें कधींहि होत नाहींत. **नवसें कन्यापुत्र होती । तरी कां करणें लागे पति ॥** तुकाराम ॥ शिवाय यत्न करून सिद्धी कां बरें मिळू नये ? जर फळ दिसत नसलें तर प्रयत्नांत कांहीं तरी चुकलें आहे असें कां म्हणूं नये ? कारण समर्थ म्हणतात "**अचुक यत्न करवेना ।**" योगवासिष्ठांत '**सम्यक्प्रयुक्त पौरुष**' असें म्हटलें आहे. कार्यकारणसंबंध बरोबर जुळेल अशा यत्न झाला नसला पाहिजे. म्हणून '**यदि न सिध्यति कोऽत्र दोषः**' असें नुसतें हात उडवून न म्हणतां '**अत्र को दोषः इति द्रष्टव्यः**' असें म्हटलें पाहिजे. म्हणजे यत्न करून जर सिद्धि मिळत नसेल तर प्रयत्नांत काय चूक झाली आहे हें नीट पाहिलें पाहिजे. दैवाचा किंवा देवाचा भाग प्रयत्नांत फार फार तर $\frac{1}{८}$ इतकाच आहे. प्रयत्न $\frac{3}{४}$ + दैव $\frac{1}{४}$ अशी स्थिति नाहीं. प्रयत्न $\frac{७}{८}$, दैव $\frac{1}{८}$ किंवा देव $\frac{1}{८}$ अशी स्थित चिकित्सक दृष्टीनें पाहिलें तरी दिसते. गणिताच्या भाषेंतील वरील दृष्टान्त आहे. दैवाची इतकी स्थिति हीन असतां व दैव इतकें पंगू झालें असतां हिंदुसमाजानें उद्योगाला बाजूला ठेवून दैवाला पुढें आणिलें आहे यांतच त्याचा अधःपात आहे. मालकाचें नांव गण्या व चाकराचें नाव रुद्रोजीपत अशी स्थिति झाली आहे.

बसणाऱ्याचें नशीब बसतें, उभें राहणाऱ्याचें ताठ उभे राहतें, निजणाऱ्याचें नशीब त्याचे बरोबरच झोंपी जातें, पण उद्योग्याबरोबर त्याचें नशीबहि चालूं लागतें, अशी स्पष्ट वेदाज्ञा आहे. महाराष्ट्राला समर्थ करणारे रामदास म्हणतात कीं, प्रत्येकाला बरें खावें, बरें जेवावें असें वाटतें; परंतु अचुक यत्न मात्र कोणी करीत नाहीं. अचुक यत्नानें विधिलिखितमुद्रा बदलतें असें त्यांचें मत आहे. **रेखा तितुकी पुसोनि जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येते ॥ डोळे झाकणी करावी ते । काय निमित्य ।** सर्व साधुसंतांमध्यें यत्नाचा पुरस्कार करणारे संतशिरोमणी श्रीसमर्थ रामदासस्वामी म्हणतात—**वन्हा तो चेतवावा रे**

**चेतवीताच चेतवो ॥ विवेक जाणेजे तैसा वाढवीतांच वाढतो ॥ संग तो साक्षेपी याचा धरितां साक्षेपु घडे ॥.........केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ॥ येत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ अचुक यत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे ॥**
अग्नी जसा चेतवावा तसा तो भडकतो, विवेक जसा वाढवावा तसा वाढतो. उद्योग्याची संगति धरली तर उद्योग करावासा वाटतो. जगांत पाहिजे तें उद्योगानेंच अर्थात् कर्तृत्वानें होतें म्हणून आधीं उद्योग केला पाहिजे. जगांत जर खरा देव असेल तर यत्न हाच देव आहे. यत्नाला देव म्हणणारे समर्थ किती उद्योगशील होते, हें त्यांच्या चरित्रावरून लक्ष्यांत येईलच. बाकीचे देव दगा देतील, नवसास पावणार नाहींत. भक्ति केली तरी दुसऱ्या भक्तांच्या तडाख्यांत देव सांपडेल. परंतु यत्न हा देव असा रोखठोक आहे कीं तो दगा कधींहि देणार नाहीं. **म्हणून यत्नदेवाची उपासना यापुढें हिंदुसमाजानें केली पाहिजे**. कष्टल्यावांचून फळ नाहीं, कीर्ति नाहीं, मान्यता नाहीं असें समर्थांनीं जागजागीं सांगितलें आहे. तीव्रतर क्रियमाणानें कपाळावरची सटवीनें लिहिलेली ' रेखा तितकी पुसोनि जाते ' असें समर्थ म्हणतात. श्रीसमर्थांनीं यत्नदेवाचा पुरस्कार ३०० वर्षांपूर्वी करून दैवाचा तिरस्कार व धिःकार केला. समाजांतील दैववाद मारून उद्योगवाद पुढें आणिला म्हणूनच अविंधमय झालेली पृथ्वी पुन्हां हिंदुस्थानमय झाली. आनंदवनांतील जीं क्षेत्रें मोडिलीं होतीं तीं मांडिलीं गेलीं, आणि जिकडे तिकडे आनंदीआनंद होऊन स्वराज्याच्या रणदुंदुभी दुमदुमूं लागल्या.

हिंदुबंधूंनो, तुम्ही शास्त्रसिद्धांत मानणार नाहीं काय ? समर्थांचा उपदेश तुम्ही ऐकणार नाहीं काय ? तुम्हाला जगावें, उद्योग करून जगावें असें वाटत नाहीं काय ? छे ! छे ! मरावें असें कधींच वाटणार नाहीं. कारण तुमची परंपरा, संस्कृति आणि धर्म हीं अत्यंत उज्ज्वल आहेत. जर जगावें व यत्नानें मारीत न मरतां जगावें असें वाटत असेल तर समर्थांचा उपदेश तुमच्या नसानसामध्यें भिनून जावो. आज परके समाज आमच्या दैववादाचा फायदा घेऊन ते स्वतः उद्योगानें आम्हांला नष्ट करीत आहेत हें ध्यानांत घ्या. ख्रिश्चन मिशनऱ्यांचे प्रयत्न, त्यांचे उद्योग, त्यांचा पैसा, त्यांच्या शाळा, त्यांचे दवाखाने, त्यांचें अस्पृश्यतानिवारण हीं कांहीं देवाची लीला नव्हे किंवा सद्दैवाची चेष्टा नव्हे, तर

हा सर्व त्यांच्या उद्योगाचा प्रभाव आहे. तुम्ही देव व दैव म्हणून कपाळाला हात लावून एकाद्या विधवेप्रमाणें बसता तर ते उद्योग व यत्न म्हणून एकाद्या सिंहाप्रमाणें परकीय समाजावर आपल्या पंजांचा आघात करीत आहेत. मुसलमानहि दैव व देव म्हणून स्वस्थ नाहींत, तर देवाची आज्ञा म्हणून काफरांचें जीवित व वित्त हीं हरण करण्याचा विचार धर्माज्ञेच्या नांवाखालीं करीत आहेत. बांधवहो, उठा. प्रतिकारक्षम बना, कंबरा बांधा, दैवाच्या मस्तकीं शेंदूर भरून उद्योगशक्तिचासुंडेपुढें त्याला बळी द्या. जर जगावयाचें असेल तर उद्योगाचें महत्त्व वाढवा व तो करा. मरावयाचें असेल तर विधवेप्रमाणें खुशाल कुंकवाची म्हणजे दैवाची उठाठेव करा. वाचकहो, दैवाची कुरघोडी विनाकारण होत आहे. ती यापुढें मुळींच सहन करूं नका. एका यत्नदेवाची उपासना करा. देवभक्ति करतांना दैत्य विघ्नें करितात. त्याप्रमाणें यत्नदेवाच्या भजनमार्गांत हे शकुन, ज्योतिष, कलि व दैववाद हे मारेकरी तुम्हांला विघ्नें करतील. तुम्ही यांना मुळींच न डरतां आपला मार्ग आक्रमण करा. प्रिय वाचकहो वेद, भारत व योगवासिष्ठ यांमधील उत्कृष्ट असे उद्योग प्रशंसेचे उतारे देऊन प्रकरण पुरें करितों.

लोकांमध्यें ज्या दैववादाच्या कल्पना आहेत त्या **वेदाला सोडून आहेत.** वेदांमध्यें ज्या उत्साहवर्धक, स्फूर्तिदायक, बलदायक, प्रार्थना आहेत व आज्ञा आहेत, त्यांवरून दैवाचा पत्ताही येथें नव्हता असें पुढील कांहीं मंत्रांवरून दिसून येईल.

**नानाश्रांताय श्रीरस्ति । पापो नृषद्वरो जन ।**
**इंद्र इच्चरितः सखा । चरैवेति चरैवेति ॥ १ ॥** ऐ. ब्रा.

श्रमाविना श्रीची प्राप्ती नाहीं. आळशी मनुष्य पापी समजावा. पुरुषार्थी मनुष्याचा मित्र ईश्वर आहे, म्हणून यत्न करावा, पुरुषार्थ संपादन करावा.

**पुष्पिण्यौ चरतो जंघे । भूष्णुरात्मा फलग्रहिः ।**
**शेरे अस्य सर्वे पाप्मानः श्रमेण प्रपथे हताः**
**चरैवेति चरैवेति ॥ २ ॥**

जो चालतो ( व्यायाम घेतो ) त्याच्या मांड्या पुष्ट होतात. फलप्राप्तिपर्यंत यत्न करणारा प्रभावशाली होतो. त्याच्या मार्गांत येणारे पापभाव ( विघ्नें ) नष्ट होतात. यासाठीं यत्न करा, कष्ट करा.

**आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः। शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः । चरैवेति चरैवेति ॥३॥**

जो घरीं बसतो त्याचें नशीबहि बसतें, जो उभा राहातो त्याचें नशीबहि उभें रहातें, जो निजतो त्याचें दैवहि निजून राहातें, त्याचप्रमाणें जो चालूं लागतो त्याचें दैवहि त्याच्या मागोमाग येऊं लागतें. म्हणून प्रयत्न केला पाहिजे, साक्षेपी झालें पाहिजे.

**चरन्वै मधु विन्दति चरन्स्वादुमुदुंबरं सूर्यस्य पश्य श्रेमाणं योन तंद्रयते चरन् । चरैवेति चरैवेति ॥**

मधमाशी भ्रमण करूनच मध मिळवते. पक्षीहि संचार करूनच मधुर फळें प्राप्त करून घेतात. सूर्याचें तेज व त्याची शोभा हीं त्याच्या सतत व निरलस भ्रमणाचीं फळें होत. यासाठीं प्रयत्न करा, परिश्रम करा. ऐतरेय ब्राह्मण

महाभारत ( या श्लोकांचें भाषांतर मागें पान ४३ वर पहा ).

**अकृत्वा मानुषं कर्म यो दैवमनुवर्तते । १३।६।२०**
**वृथाश्राम्यति संप्राप्य पतिं क्लीबमिवांगनाः ॥ ३ ॥**
**असंशयं दैवपरः क्षिप्रमेव विनश्यति ॥१२।१०५।२२**
**उदाराणां तु सत्कर्म दैवं क्लीबा उपासते ।१२।१३९।८२**
**नह्युत्थानमृते दैवं राज्ञामर्थं प्रसाधयेत् ॥१२।५६।१४**
**यत्नो हि सततं कार्यस्ततो दैवेन सिध्यति ॥१२।१६३।५०**
**सुमंत्रिते सुविक्रांते सुकृते सुविचारिते ।**
**सिध्यन्त्यर्था महाबाहो दैवं चात्र प्रदक्षिणम् ॥३।३६।७**
**उत्थानवीर पुरुषो वाग्वीरानधितिष्ठति ॥१२।५८।१५**
**उत्थानेनामृतं लब्धं उत्थानेनासुरा हताः ॥**
**उत्थानेन महेन्द्रेण श्रेष्ठ्यं प्राप्तं दिवीह च ॥१२।५८।१४**
**विद्या तपो वा विपुलं धनं वा ॥**
**सर्वं ह्येतद्व्यवसायेन शक्यम् १२।१२०।४५**

योगवासिष्ठ ( या श्लोकांचा भावार्थ मागें पान ४१।४२ वर पहा ).

**परं पौरुषमाश्रित्य दंतैर्दतान् विचूर्णयन् ।**
**शुभेनाशुभमुद्युक्तं प्राक्तनं पौरुषं जयेत् ॥**
**यत्नवाद्भिः दृढाभ्यासैः प्रज्ञोत्साहसमन्वितैः ।**

मेरवोऽपि निगीर्यन्ते कैव प्राक् पौरुषे कथा ॥
दैवं संप्रेरयति मां इति दग्धाधियां मुखं ।
अदृष्टश्रेष्ठदृष्टीनां दृष्ट्वा लक्ष्मीर्निवर्तते ॥
मूढानुमानसंसिद्धं दैवं यस्यास्ति दुर्मतेः ।
दैवाद्दाहोऽस्ति नैवेति गंतव्यं तेन पावके ॥
दैवमेवेहचेत् कर्तृ पुंसः किमिव चेष्टया ।
स्नानदानासनोच्चारान् दैवमेव करिष्यति ॥
कालवद्भिर्विनिर्णीतं पाण्डित्यं यस्य राघव ।
अनध्यापित एवासौ तज्ञश्चेद्दैवमुत्तमम् ॥
मूढै प्रकल्पितं दैवं तत्परास्ते क्षयं गताः ।
प्राज्ञास्तु पौरुषार्थेन पदमुत्तमतां गताः ॥
ये शूरा येच विक्रांता ये प्राज्ञा येच पंडिताः ।
तैस्तैः किमिव लोकेऽस्मिन् वद दैवं प्रतीक्ष्यते ॥
भोक्ता तृप्यति नाभोक्ता गन्ता गच्छति नागतिः ।
वक्ता वक्ति नचावक्ता पौरुषं सफलं नृणाम् ॥

---

# प्रकरण सहावें



## मनोबल विचार

### शास्त्र आणि शास्त्रकार यांचें अपौरुषेयत्व

हिंदुसमाजांत शास्त्रें व शास्त्रकर्ते यांच्याबद्दल चमत्कारिक कल्पना आहेत. हिंदुधर्माचे प्रमाण ग्रंथ श्रुति, स्मृति व पुराणें हे आहेत. हे ग्रंथ अनादि व अपौरुषेय असे समजण्यांत येतात. वेद ग्रंथांना अनादि म्हणणें शोभेल. कारण हे ग्रंथ केव्हां उत्पन्न झाले हें समजत नाहीं. परंतु या सर्व ग्रंथांना अपौरुषेय मानणें चुकीचें आहे. पुराणें व्यासांनीं लिहिलीं, स्मृतिग्रंथ निरनिराळ्या स्मृतिकारांनीं लिहिले, वेदांच्या ऋचा अनेक ऋषींनीं रचिल्या; अशी वस्तुस्थिति असतां ती सोडून देऊन त्या ग्रंथांच्या ठिकाणीं अपौरुषेयत्व आणण्यांत काय हेतु असेल

आहे ? अद्‌भुतपणा, चमत्कार, आश्चर्य हीं सर्व समाजाच्या बाल्यावस्थेंत असतात व शोभतात. परंतु समाजाच्या प्रौढ स्थितींत बाळपणाच्या अप्रौढ पण आश्चर्योत्पादक कल्पना चालू ठेवणें म्हणजे लहानपणचें आंगडें प्रौढपणीं आंगांत घालून स्वतःला हास्यास्पद करून घेण्यासारखें नाहीं काय ? वरील ग्रंथ हे माणसांनीं केले, पूज्य माणसांनीं केले, थोरथोर मनुष्यांनीं लिहिले रागद्वेषशून्य, विद्वान्, त्यागी, निस्वार्थी अशा माणसांनीं समाज व धर्म यांना उपयुक्त ग्रंथ लिहिले असें म्हटल्यानें धर्माबद्दलची श्रद्धा कमी होते असें कांहीं म्हणतात. परंतु उलट असेंहि म्हणतां येईल कीं, अद्‌भुतपणा व आश्चर्य यांनीं उत्पन्न केलेली श्रद्धा ही भीति दाखवून उत्पन्न केलेली अंध-श्रद्धा नव्हे काय ?

या आंधळ्या श्रद्धेमुळें वेद वाचणें, त्यांचे अर्थ करणें, चिकित्सा करणें हें पाप आहे अशा समजुती हिंदुसमाजांत आहेत. हे सर्व धर्मग्रंथ अद्‌भुत. अपौरुषेय, आश्चर्यांनीं भरलेले म्हणून ते सोवळ्यांत गुंडाळून ठेवावेत, त्यांना नमस्कार करावा फार तर नैवेद्य दाखवावा अशी समजूत होते व तशी हिंदुसमाजांत आहे याची काय वाट ? ईश्वरानें केलेले ग्रंथ मनुष्यपामरांनीं पाहूं नयेत, वाचूं नयेत, फक्त ते ऋषींनीं व साधूंनीं पाहावेत. कारण ते ग्रंथ पाहण्याचा त्यांचाच अधिकार आहे. अशा समजुतींमुळें हिंदुधर्मांत वास्तव भागापेक्षां अवास्तव भाग खंडीभर शिरला आहे. आंगापेक्षां बोंगा मोठा म्हणतात त्या म्हणीप्रमाणें वरील समजुतीमुळेंच हिंदु-धर्मांत अवडंबर शिरलेलें आहे. ग्रंथ करणाऱ्यांनीं ते सोवळ्यांत गुंडाळून ठेवण्या-करितां खास केलेले नाहींत व पूजेकरितांहि केलेले नाहींत. जर ते ग्रंथ चांगले असतील तर सर्व जगानें पाहावेत, वाचावेत, ऐकावेत व त्याप्रमाणें वागण्याचा यत्न करावा हीच केव्हांहि व कुठेंहि ग्रंथकाराची इच्छा असणार. हिंदुस्थानांतील धर्मग्रंथ कांहीं जगावेगळे नाहींत कीं, ज्या ग्रंथांना फक्त पूजनच आवडतें ! एका सुभाषितांत वर्णन केल्याप्रमाणें सुवर्णाला घर्षण, ताप, छेदन, ताडन यांचा कंटाळा येत नाहीं, तर गुंजा घालून कुणी तोलूं लागलें कीं, सुवर्णाला राग येतो. तशीच स्थिति ग्रंथांची आहे. ग्रंथांना वाचणें, ऊहापोह करणें, चर्चा करणें याचा वीट येत नाहीं तर मूर्खांच्या घरीं जाऊन त्यांच्या देव्हाऱ्यांत बसण्याचा त्यांना वीट येतो. बाप मुलीचें कन्यादान तिचा संसार व्हावा म्हणून करितो. तिला जांवयानें पुजून जपून ठेवावें म्हणून करीत नाहीं. मोरोपंत कवि म्हणत कीं,

आमची वाग्वधू काशीस्थ पंडितांच्या गळ्यांत जेव्हां माळ घालील तेव्हां आम्हाला बरें वाटेल. धर्मग्रंथ मनुष्यकर्तृक नाहींत, ते ईश्वरानें केले आहेत, अपौरुषेय आहेत, असें म्हटल्यानें विनाकारण अंधश्रद्धा वाढून त्याप्रमाणें वागण्याचा विचारहि मनांत येत नाहींत. कारण ग्रंथांतील सर्व गोष्टी देवाच्या लीला आहेत. त्या देवानें केल्या आहेत व लिहिल्या आहेत म्हणून आपण त्या करण्याच्या तर भानगडीस पडूंच नये. पण त्यांपासून ' **न देवचरितं चरेत्** ' असें म्हणून जितकें लांब राहतां येईल तितकें रहावें, असाच समज सर्व हिंदुसमाजांत आहे.

धर्माचीं प्रमाणें श्रुति, स्मृति, पुराणें हीं अपौरुषेय या प्रमाणांनीं ज्या स्वर्गमोक्षांचा विचार करावयाचा त्याहि जगांत न दिसणाऱ्या वस्तु अतएव अपौरुषेय. ज्या पद्धतीनें विचार करावयाचा ती मीमांसा परिपाठी म्हणजे विचार करण्याची पद्धति तीहि अपौरुषेय आहे, असें प्रतिपादन जुने शास्त्री पंडित अत्यंत अट्टहासानें करीत असतात. मीमांसा शास्त्र हें अर्वाचीन काळीं जैमिनि व शाबर यांनीं केलेलें असतांना त्या पद्धतीला अपौरुषेय म्हणणें म्हणजे दुराग्रहाचा कळस होय ! मीमांसाशास्त्र म्हणजे भाषाशास्त्र होय. परंतु अनेकविध निबंधग्रंथांत, व्यवहारांत आणि धर्मशास्त्रविषयक नाजूक प्रश्नांत हाच आग्रह--नव्हे दुराग्रह--दृष्टीस पडत आहे. म्हणजे धर्माच्या क्षेत्रांत कांहींएक विचार करण्याचें शिल्लक नाहीं. सर्व विचार झालेला आहे. श्रुति, स्मृति व पुराणें यांत सर्व आहे. त्यांचा विचार मीमांसेनें केला आहे. तेव्हां मनुष्यानें आतां फक्त त्याप्रमाणें वागावें असा त्या सर्व विचारसरणीचा झोंक आहे. या विचारसरणीमुळें मनुष्यांचें बुद्धिस्वातंत्र्य नष्ट होतें, बुद्धि संकुचित होते व आत्मस्वातंत्र्याच्या सिद्धांताला बाध येतो, याचा विचार कुणीच करीत नाहीं. मनुष्यांना देव बनविण्याकरितां धर्मग्रंथ पाहिजेत, त्यांना गुलाम करण्याकरितां नकोत. मनुष्याच्या बुद्धीच्या विकासाला शास्त्रांची आवश्यकता आहे, परंतु संकुचितपणा व मनोदौर्बल्य आणण्याला शास्त्रांची जरुरी नाहीं. शास्त्रग्रंथांबद्दल व धर्माबद्दल अशा कल्पना झाल्यामुळेंच हिंदुसमाज परंपराभक्त झाला आहे. इतर समाजांतील या अडाणी कल्पना जाऊन ते समाज विचारशील होत आहेत. मुसलमान लोक एवढे धर्मवेडे पण त्यांनीं आपल्या हातांनीं आपल्या खिलापतीची खिरापत करून टाकली ! सारांश विचार, तर्क व आचार यांना धरून शास्त्रें पाहिजेत आणि तशीं तीं असतात, हें ज्ञान समाजास पाहिजे.

शास्त्र ह्मणजे वेद, शास्त्र म्हणजे आप्तवाक्य किंवा वेदवाक्य आणि शास्त्रकार म्हणजे देव, अशा समजुती हिंदुसमाजांत आहेत. परंतु इतक्या संकुचित कल्पना ठेवून भावी काळांत हिंदुसमाजाला जगतां येणार नाहीं. विचार व अनुभव, निरीक्षण आणि परीक्षण यांनीं सिद्ध केलेल्या गोष्टी शास्त्रसिद्धान्तांत मोडतात, आणि हे सिद्धान्त जे बुद्धिमान् लोक शोधून काढतात, त्याना शास्त्रकार अशी संज्ञा मिळते. पाणिनीनें भाषाशास्त्रांतील अनेक सिद्धांत सांगितले म्हणून तो व्याकरणाचा शास्त्रकार झाला. आर्यभट्टानें गणितांतील अनेक सूक्ष्म तत्त्वें सांगितलीं म्हणून तो गणितशास्त्रज्ञ झाला. मनु, याज्ञवल्क्य, पराशरादि ऋषींनीं आपल्या पुढच्या समाजाच्या त्या काळच्या समजुतींप्रमाणें विचार करून धर्माच्या आचारविचारांचे सिद्धान्त सांगितले म्हणूनच ते स्मृतिकार बनले. विचार, अनुभव, निरीक्षण व परीक्षण यांनींच जगांत शास्त्रें निर्माण होतात व तीं अत्यंत बुद्धिमान् व शुद्ध बुद्धीच्या माणसांकडून निर्माण होतात. ग्यालिलिओनें विद्युत् शक्तीचा शोध लाविला. न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा नियम लोकांपुढें मांडला. हीं सर्व माणसें होतीं. याच चांगल्या माणसांनीं हे शोध जगापुढें ठेवून ईश्वराच्या कृपेमुळें हें सर्व आम्हांला स्फुरलें असे उद्गार काढले. परंतु या उद्गारांवरून त्या माणसांची नम्रताच सिद्ध होते. कारण ईश्वरानें हीं शास्त्रें स्वतः येऊन केलीं असें सिद्ध होत नाहीं. वस्तुतः ईश्वर हा निर्गुण आहे. जगांतील उत्कृष्ट वाङ्मयावर व शास्त्रसिद्धान्तांवर जगाचा हक्क आहे. वेद, स्मृति, सूक्तें हीं हिंदूंनीं पाहिलीं पाहिजेत व वाचलीं पाहिजेत. हे ग्रंथ वाचण्याचा अधिकार सर्व जगाला आहे. कारण या ग्रंथांत जगत्कल्याणाचा विचार आहे. जगांतील चांगले ग्रंथ वाचून जर दुर्गति मिळेल तर वाईट ग्रंथ वाचल्यानें सद्गति मिळेल काय ? मॅक्स मुलर साहेबांना दुर्गति मिळाली काय ? फ्रेंच आणि जर्मन पंडितांना संस्कृत भाषेच्या व्यासंगानें दुर्गति कशावरून मिळणार ? त्याला प्रमाण काय ?

बरें, ईश्वर तरी निर्गुण निराकार असतांना तो स्वतः अशा गोष्टी करणार तरी कशा ? ईश्वराला जगांत कांहीं करावयाचें असतें तेव्हां तो मनुष्य होऊन येतो. ईश्वर मनुष्यरूपानें आपणाला इच्छित असें करतो असें म्हणावें किंवा ईश्वर आपल्याला इष्ट गोष्टी माणसांना निमित्त करून करवितो म्हणावें. कांहीं म्हटलें तरी फारसा वाद नाहीं. ईश्वराचें अस्तित्व, कर्तृत्व, सत्ता, सर्वज्ञत्व या सर्व गोष्टी अक्षरशः कबूल करून शास्त्रें हीं माणसांनींच

केलेलीं आहेत व शास्त्रकार हे मनुष्य होते असें म्हटल्यानें कांहींहि धर्महानि होत नाहीं.

हिंदुधर्माचे सर्व धर्मग्रंथ संस्कृतमध्यें आहेत, म्हणून ते बहुजनसमाजाला कळत नाहींत. त्यामुळें ते बहुजनसमाजाला न कळण्यांतच* त्या ग्रंथांची पूज्यता आहे असेंहि कित्येक शास्त्रीपंडित म्हणतात. संस्कृत भाषा ही देवांची आहे, अर्थात् हे धर्मग्रंथ देवरूपी मनुष्यांनीं केले असेंहि भासविण्याचा प्रयत्न होत असतो. समाजामध्यें अनेक भाषा असतात. ग्रंथकार त्याला जी उत्तम भाषा येत असेल त्या भाषेंतच ग्रंथ लिहितो वरील धर्मग्रंथ जेव्हां झाले तेव्हां संस्कृत भाषा प्रचारांत होती, विद्वन्मान्य होती, म्हणून ग्रंथ संस्कृतमध्यें लिहिले गेले. ते बहुजनांना समजूं नयेत किंवा ती भाषा देवाची म्हणून ते ग्रंथ संस्कृतमध्यें झाले, असें समजणें चुकीचें होईल. जर्मन लोक, इंग्रज लोक आणि अमेरिकेंतील विद्वान् लोक इकडील वेदविद्या व शास्त्रविद्या शिकत असून ते त्यांमध्यें शोधहि लावीत आहेत. परंतु आम्ही मात्र हे ग्रंथ अमक्यानें वाचावेत, तमक्याला अधिकार नाहीं, गीता ही स्त्रियांनीं वाचूं नये, वेद शूद्रांनीं ऐकूं नयेत, असें म्हणत बसलों आहोंत. ग्रंथ वाचणें, विचार करणें या आचरणाच्या पहिल्या पायऱ्या आहेत. विचार आधीं, उच्चार नंतर आणि आचार शेवटीं अशी स्थिति असतांना केवळ कर्मठपणाचा आचार हाच खरा आचार असें समजून विचाराकडे दुर्लक्ष्य करणें अत्यंत चुकीचें होय. हिंदुसमाज हा धार्मिक असला, धर्मश्रद्धावान् असला तरी तो चुकीच्या मार्गानें अंधश्रद्धावान् व धर्मनिष्ठ बनत आहे.

शास्त्रें व शास्त्रकार यांना अपौरुषेय म्हटल्यानें त्यांची रमणीयता व आकर्षकता कमी होते. दिपविणारी वस्तु प्रेम उत्पन्न करीत नाहीं, तर कुतूहल उत्पन्न करिते. पण रमविणारी वस्तु आकर्षिते व प्रेम उत्पन्न करिते. जो पुढारी लोकांना नुसतें दिपवितो त्याचें अनुकरण लोक करीत नाहींत. तर जो पुढारी लोकांत मिळून मिसळून वागतो व लोकांच्या अंतःकरणांतील बोलतो तोच जनतेला आपलासा वाटतो. शास्त्र व शास्त्रकार यांची गोष्ट अशीच आहे. हिंदुसमाजाला हीं शास्त्रें व शास्त्रकार नुसतीं दिपवितात इतकेंच नव्हे तर

* हें न कळण्याचें लोण शेवटीं ज्ञानेश्वरी—दासबोधापर्यंत येतें. जुन्या भाषेमुळें हे ग्रंथहि कांहीं स्थळीं दुर्बोध आहेत परंतु तेवढयानें ते “ ग्यानभाची मेख ” म्हणून अपौरुषेय मानतात हें कांहीं ठीक नव्हे.

र्ती पढणारे व सांगणारे शास्त्री पंडितहि समाजाला दिपवीतच असतात. विषय समजण्यासारखा नसणं, तो लोकभाषेंत नसणें, तो सोपा असल्यास शास्त्रीय परिभाषेनें अधिक अवघड करणें आणि सांगण्याचा प्रसंग आल्यास अत्यंत निरस भाषेंत सांगणें या प्रकारामुळें शास्त्री व त्यांचें शास्त्रप्रवचन म्हटलें कीं, लोक दूर पळतात व म्हणतात कीं, हें कांहीं तरी गौडबंगाल आहे. शास्त्र्याला पाहिलें–विशेषत: मोठ्या शालजोडीशास्त्र्याला पाहिलें–कीं, धोक्याची ध्वजा म्हणून दार लावणारीं माणसें आम्ही पाहिलीं आहेत ! हिंदुस्थानांतील सृष्टिसौंदर्य असें थक्क करून सोडतें कीं, मनुष्याला घरदार सोडून तासचे तास तेथेंच बसावें असें वाटतें. सृष्टिसौंदर्यांत आकर्षकता असली तर तेथें जाऊन नुसतें पाहाण्यापेक्षां विचार करून त्या सृष्टीचा जनतेला फायदा देण्याची बुद्धि उत्पन्न होते. परंतु सृष्टि दिपविणारी, शास्त्रें दिपविणारी, शास्त्रकर्ते दिपविणारे झाल्यामुळें व सर्वत्र अपौरुषेयत्वाचें खूळ आणल्यामुळें पौरुषाला म्हणजे मानवयत्नाला कुठेंच जागा नाहीं अशी स्थिति झाली आहे. सर्व कांहीं देवानें केलें आहे, ग्रंथांत सांगितलें आहे, शास्त्रें उत्पन्न केलीं आहेत, शोध झाले आहेत, मनुष्यानें फक्त अहाहा ! म्हणून तें पाहून आश्चर्यानें तोंडांत बोट घालण्याचेंच कार्य उरलें आहे ! या समजुतीनें हिंदुस्थानांत नवे नवे शोध, नव नव शास्त्रें, नव नव कला या मध्यकालांत वाढल्या नाहींत. व होत्या त्याहि परकीयांच्या सत्तेच्या सोट्यांत ठार झाल्या ! ! वैदिक धर्मांत जी रमणीयता व आकर्षकता नव्हती, ती गौतमबुद्धानें लोकभाषेंत नीतितत्त्वें सांगून आणिली. परंतु संन्यास व अहिंसा यांवर त्याचा भर असल्यामुळें इष्ट असा परिणाम हिंदुसमाजावर झाला नाहीं. यापुढें हिंदुसमाजाला ज्या सामाजिक, राष्ट्रीय व जागतिक स्पर्धेंत पडावयाचें आहे, त्याकरितां त्यानें या मिथ्या कल्पना टाकल्या पाहिजेत. समाजांतील सुज्ञांनीं शास्त्रें, शास्त्रकार, शास्त्रसिद्धांत यांत रमणीयता व आकर्षकता आणून तीं देशीकारलेण्यांनीं सजवून प्रतारणा न करतां सर्वांना दिलीं पाहिजेत. शास्त्रें हीं विचार व अनुभव यांनींच बनतात. तीं मनुष्येंच करितात. मनुष्यामध्यें ज्ञानाजिज्ञासा ईश्वरानें ठेविलेली आहे. तिचा प्रभाव जगांत दिसत असतो. वसिष्ठ, विश्वामित्र हे वेद रचणारे ऋषिसुद्धां मनुष्यच होते. जगांत सृष्टिशिवाय सर्व कांहीं पौरुषेय आहे. पंचमहाभूतें मात्र अपौरुषेय आहेत. बाकी सर्व मनुष्यकृत आहे असें हिंदुसमाजाला शिकविलें पाहिजे.

---

# प्रकरण सातवें



## मनोबल विचार

### अवतार-वेड

हिंदुसमाजाच्या मनाचा अभ्यास करूं लागलें असतां असें आढळतें कीं, हिंदुसमाज हा अवतारप्रिय आहे. कोणतीहि गोष्ट अवतारी पुरुषच करतो, परमेश्वरी आवताराशिवाय अन्यायाचा प्रतिकार, दुर्जनदंडण, पोटजातींचें एकीकरण, अस्पृश्यतानिवारण या गोष्टी होतच नाहींत. मनुष्यानें अवताराची वाट पाहात, ईश्वराचें चिंतन करीत स्वस्थ राहावें; अशा प्रकारची विचारसरणी ठिकठिकाणीं आढळते. कलिप्रभाव, दैववाद आणि जिज्ञासामारक वेदांत इत्यादींनीं जसा हिंदुसमाज क्रियाशून्य केला आहे तसाच अवतारवेडानेंहि हिंदुसमाज दुर्बल झाला आहे. त्याचा थोडासा विचार या प्रकरणांत करूं.

" **ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ॥** " प्रत्येक मनुष्य हा ईश्वराचा अंश आहे आणि या गीतावचनाप्रमाणें प्रत्येक ईश्वर-अंशाला करणी करून नराचा नारायण होण्याचा अधिकार आहे. मनुष्यानें आपल्या कर्तृत्वानें ईश्वरभाव अथवा स्वामिभाव प्राप्त करून घ्यावा अशी शास्त्राज्ञा आहे. कोणताहि प्राणी विशेष यत्नानें इंद्रत्वाप्रत जातो असें योगवासिष्ठांत स्वच्छ म्हटलें आहे. श्रीसमर्थ तर जगांत दुसरा तिसरा देव कोणी नसून " अचूक यत्न तो देवो " असें स्पष्ट सांगतात. सारांश, दीर्घ प्रयत्नानें मनुष्य ईश्वर होतो, कारण तो मूळचाच ईश्वराचा अंश आहे, हा शास्त्रसिद्धांत हिंदुसमाज आज विसरला असून त्याला कर्तव्यापेक्षां स्वकर्म सोडून नामस्मरण करण्यांतच धन्यता वाटत आहे. कोणी कर्ता पुरुष निघाला कीं, त्याला अवतारकोटींत ढकलून त्याच्या जयंत्या कराव्या, मिष्टान्नभोजन करावें आणि जयजयकार करून टाळ्या वाजवाव्या म्हणजे झालें ! कर्ता पुरुष, साधु, महात्मा सांगतो काय व आपण करतों काय, याचा विचार करण्याची जबाबदारी हिंदुसमाज आपल्यावर घेत नाहीं. व्यास, वाल्मिकी, ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास फार काय पण टिळक, गांधी या सर्वांना अवतारकोटींत ढकलून कर्तव्यशून्य होऊन जयजयकारयुक्त टाळ्या वाजवीत बसण्याची हिंदुसमाजाची तयारी आहे.

मोठा मनुष्य तप आणि विद्या यांच्या प्रभावानें पुढें आला कीं, त्याला देव म्हणून त्याच्यासारखें कर्तृत्व करणें अशक्य असें हिंदुसमाजाला वाटतें. तुळशीदासांनीं रामायण लिहिलें तर ते म्हणे वाल्मीकीचे अवतार ! नामदेवांनीं अभंगरचना केली तर तेहि म्हणे उद्धवाचे अवतार ! मोरोपंतांनीं आर्या चांगल्या केल्या, कारण काय तर ते म्हणे गणेशाचे अवतार ! तुकाराम, रामदास हे सुद्धां ईश्वराचे अवतार ! फार काय पण निष्क्रिय वेदांत सांगून ज्ञानजिज्ञासा मारणारे अलीकडील संतांळेसुद्धां ईश्वराचे अवतारच ! अवताराचें बंड हिंदुस्थानांत इतकें माजलें आहे कीं, अवताराशिवाय त्यांना कर्तृत्व दिसत नाहीं व चैन पडत नाहीं.

मनुष्याला अवतार मानणें हें गुलामगिरीचें द्योतक आहे. हिंदुसमाज गुलामगिरीच्या गर्तेंत पडलेलाच आहे. कर्त्या मनुष्याला अवतार म्हणून स्वतः कांहींच न करणें यासारखी दुसरी गुलामगिरी नाहीं. हरिदास व पुराणिक रामायण–भारतांतल्या गोष्टी सांगतात. त्या ऐकण्यांत पुण्य आहे हीच कल्पना असते. वागण्याकडे कोणीहि लक्ष देत नाहीं. सूर्य हा देव आहे असें म्हटलें कीं, तेथें उपास्यउपासकभाव हें नातें येतें. तसेंच तो तेजोगोल आहे असें म्हटलें कीं, शोध्यशोधक भावाचें नातें उत्पन्न होतें, हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे. जिकडे तिकडे देवतांची कल्पना आली कीं, दैववाद व कर्तृत्वाचा अभाव दृष्टीस पडतो. पाश्चात्यांच्या शोधांकडे पाहिलें तर पुष्कळ देवतांना त्यांनीं माणसांची सेवा करावयास लाविलें आहे असें दिसतें. पृथ्वी ही देवता मानली कीं तिची उपासना चांगली नांगरण्यानें व कुदळ खणण्यानें होते. हें तत्त्व पाश्चात्यांना जसें माहीत आहे, तसें हिंदूंना माहीत नाहीं. म्हणून ते देवता मानली कीं, टाळया वाजवून भजन करीत सुटतात. कर्त्या माणसांना देव म्हणून त्यांच्या दर्शनामध्यें पुण्य आहे अशी कल्पना सुशिक्षित हिंदूंमध्येंहि आढळते. टिळक–गांधींना पाहाण्यांत, त्यांच्या नांवांचा जयजयकार करण्यांत आणि त्यांना अवतार मानण्यांत लोक जितका उत्साह दाखवितात, तितका जर टिळक–गांधींनीं सांगितलेलें कार्य करण्यांत त्यांनीं दाखविला तर अतिशय उपयोग होणार आहे. हिंदुसमाजाचें दौर्बल्य घालविण्याकरितां लोकांच्या डोक्यांतून अवतारवेड घालविलें पाहिजे. म्हणजेच कर्त्या माणसाला देव मानून बौद्धिक गुलामगिरी दाखविण्याची जी संवय लागली आहे ती नाहींशी होईल.

प्रभावशाली मनुष्यांना देव म्हणून त्यांच्या दर्शनांत पुण्य आहे अशी कल्पना सुशिक्षित व अशिक्षित हिंदूंमध्येंहि आहे. बेझंटबाईचे शिष्य त्यांना देवीचा अवतार समजतात तर टिळकगांधींचे अनुयायी त्यांना सर्वज्ञ ईश्वर समजतात. बुवा महाराजांचे शिष्य महाराजांना स्थितप्रज्ञ समजतात तर संस्थानांतील लोक आपल्या संस्थानाधिपतीला विष्णूचा अंश समजून नमस्कार करतात. याचा परिणाम काय होत आहे याचा, वाचकहो, क्षणभर विचार करा.

कर्ता पुरुष कांहीं सांगूं लागला व त्याप्रमाणें वागण्याची आपणावर पाळी आली म्हणजे पंचाईत पडेल म्हणून हिंदुसमाजानें त्याला अवतार कोटींत ढकलण्याची ही युक्ति काढली आहे. हिंदुसमाज हा स्थाणु पुरुष आहे. त्यानें आजवर हजारों क्रांत्या पाहिल्या आहेत. कुणाला वंदनाची तर कुणाला स्तुतीची लांच देऊन हा असें म्हणतो कीं "महाराज, आपण फार मोठे आहांत, अवतारी आहांत, नमस्कार असो आपणाला! आम्ही आपल्या तुमच्या जयंत्या व पुण्यतिथ्या करितों आणि जेवतों. यापेक्षां आह्माला दुसरें कांहीं सांगूं नका."

आतां शास्त्रांमध्यें अवताराबद्दल काय म्हटलें आहे हें पाहूं. वेदान्तशास्त्रांत शुद्धसत्त्वप्रधान माया ही ईश्वराची उपाधी मानली आहे. आणि मलिनसत्त्वप्रधान अविद्या ही जीवाची उपाधी मानली आहे. जीव हा अविद्येच्या स्वाधीन राहतो, पण ईश्वर हा मायेला आपली बटीक बनवितो. जीव हा अज्ञ, अल्पशक्तिमान् तर ईश्वर हा सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् असतो. पूर्वजन्मार्जित पापपुण्याप्रमाणें जीवाला पंचमहाभूतात्मक शरीर प्राप्त होत असतें, पापपुण्य व धर्माधर्म यांचीं फळें जीवाला भोगावीं लागतात. परंतु ईश्वराला पापपुण्य व धर्माधर्म हीं नसल्यामुळें त्याला पांचभौतिक शरीर प्राप्त होत नाहीं. ईश्वराचें शरीर हें मायामय असतें. तें त्याला त्याला स्वेच्छेप्रमाणें धरतां व सोडतां येतें. भागवतांतील दशम स्कंदांत ब्रह्मदेवानें ईश्वराचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे.

**अस्यापि देव वपुषो मदनुग्रहस्य स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य कोऽपि ।**

या श्लोकांतील 'स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य' हीं पदें फार महत्त्वाचीं आहेत. त्यावरून परमेश्वराचें शरीर कसें असतें हें सिद्ध होतें. राम, कृष्ण हे परमेश्वराचे अवतार असें म्हटलें आहे, अर्थात् त्यांचें शरीरहि मायामय होतें म्हणून त्या शरिरांकडून अद्भुत बाललीला झाल्या आहेत. मानवी शरीरें हीं पापपुण्या-

नुरूप होतात. पण ईश्वरशरीर हें साधुअसाधूंच्या पापपुण्यानुरूप असतें, असा शास्त्रसिद्धांत आहे.

समानसत्तेमध्यें साधक बाधक व्यवहार होतो. अर्थात् भक्ताभक्त ज्या व्यावहारिक सत्तेमध्यें असतात, त्या सत्तेमध्यें व्यवहार करण्याकरितां ईश्वर मायामय शरीर धारण करतो. त्यालाच सगुणविग्रह म्हणतात. ईश्वरी सगुणविग्रह भक्ताभक्तांना त्यांच्या पापपुण्याचीं फळें देण्याकरितां निर्माण झालेला असतो. आणि तें कार्य झालें कीं, ईश्वर सगुणविग्रहाचा उपसंहार करतो. अशी शास्त्रांतील सामान्य अवतारकल्पना आहे. या दृष्टीनें ईश्वराचे रामकृष्णादिक हेच खरे अवतार. अशा अवतारांच्या जयंत्या कराव्यात. ईश्वरी अवताराची जयंति करावी व माणसांची श्राद्धतिथि अथवा संन्यासी असल्यास पुण्यतिथि करावी.

अलीकडे जयंत्यांचा व पुण्यातिथ्यांचा पुष्कळ सुळसुळाट झाला आहे. टिळकजयंती, गांधीजयंती, गोखलेजयंती, शिवजयंती असे उत्सव होत असतात. या माणसांना अवतार करण्याचे दृष्टीनें हे उत्सव चांगले आहेत. परंतु हिंदुसमाजाचें मन निवृत्तिपर करण्यासहि हे उत्सव उत्तम आहेत ! टिळक, गांधी, गोखले, रानडे, शिवाजी, अहिल्याबाई यांना अवतार म्हणून नमस्कार करणें हें हिंदुसमाजाला पाहिजेच आहे. परंतु हिंदुसमाजाचें मनोदौर्बल्य नाहींसें व्हावें, असें ज्यांना वाटतें त्यांनीं कृपा करून यापुढें माणसांच्या जयंत्या करूं नयेत, असें अत्याग्रहानें आणि अति नम्रपणें सांगावेंसें वाटतें. याचा अर्थ विपरीतपणें कोणी घेऊं नये कीं, वरील माणसें हीं आम्हांला मान्य नाहींत. आम्ही असें स्वच्छ सांगतों कीं, विद्वान्, थोर, राजकारणी, कर्तृत्वशाली, पराक्रमी अशा सर्वांबद्दल आमचा अत्यंत आदर आहे, आणि पूज्यभावहि आहे. परंतु आम्ही या माणसांना देव किंवा अवतार मानण्यास तयार नाहीं. फारफार मोठीं अशीं हीं माणसें झालीं, तीं आपल्या कर्तृत्वानें झालीं, तुम्हीहि तसेच व्हा. तुम्ही ईश्वराचे अंश आहांत असा स्फूर्तिदायक संदेश हिंदुसमाजाला सांगावयास पाहिजे.

निवृत्तिपरायण असलेल्या हिंदुसमाजाला प्रवृत्तिपरायण करण्याकरितां जें जें करतां येईल तें तें केलें पाहिजे. अवतारकल्पनेनें दौर्बल्य कसें वाढतें हें वरील विवेचनावरून लक्षांत येईल. कोणी म्हणतील कीं अशा या थोर विभूतींना अवतार म्हटलें तर तुमचें काय बिघडतें ? त्यास उत्तर इतकेंच कीं, आमचें कांहींच नुकसान नाहीं. परंतु हिंदुसमाजाचें मात्र नुकसान होतें. कारण विभूति

म्हणजे अवतार नव्हेत. गीतेच्या दहाव्या अध्यायांत सर्व विभूति सांगितल्या आहेत. त्यांपैकीं चंद्र, सूर्य, सामवेद, समुद्र, अग्नि, पिंपळ, सिंह, मगर, गंगा, धैर्य, क्षमा, मार्गशीर्ष महिना, द्यूत, अशा आज आम्हांला साक्षात् दिसणाऱ्या पुष्कळ विभूति सांगितल्या आहेत. या सर्व विभूतींना जर आम्ही देव किंवा ईश्वराचे अवतार समजूं लागलों तर कायद्यानें द्यूत ऊर्फ जुगार बंद करतां येणार नाहीं, सिंहाला सर्कसीमध्यें आणतां येणार नाहीं, आणि पिंपळाच्या झाडाचीं मुळें जर एखाद्या घराचे खालीं जाऊन घर पाडूं लागलीं तर आम्हाला पिंपळ तोडतां येणार नाहीं. कारण हे सर्व ईश्वराचे अवतार ! दहाव्या अध्यायाचा बारकाईनें विचार केला तर त्या कालांतील प्रत्येक विषय, वस्तु, विशेष गोष्ट मी आहें, असें भगवंतांना सांगावयाचें होतें, हें सिद्ध होतें. शेवटच्या उपसंहारांत भगवंतांनीं "**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं**" असा उपसंहार केला आहे. सत्त्वजात जें जें वस्तुजात विशेष गुणांनीं युक्त असेल तें तें सर्व विभूतींत ढकललें आहे. यावरून अवतार व विभूति यांमध्यें अंतर काय आहे, हें लक्षांत येईल. प्रत्येक मनुष्य हा ईश्वराचा अंश आहे. प्रत्येक विशेष मनुष्य आणि प्रत्येक विशेष गोष्ट ही ईश्वराची विभूति आहे, हें लक्षांत ठेवून प्रत्येक मनुष्यानें विभूति होण्याचा यत्न उत्साहानें केला तर त्यांतच हिंदुसमाजाचा तरणोपाय आहे. विभूतिविस्तारयोगांत "रामः शस्त्रभृतामहं । वृष्णीनां वासुदेवोऽस्मि" हीं वाक्यें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. त्यावरून अवतारकल्पनेचें वेड कां घालविलें पाहिजे हेंहि चाणाक्ष वाचकांच्या ध्यानांत सहजच येईल.

पुराणांमध्यें ईश्वराचे अंश, कला व आवेश असे अवतार मानले आहेत. पण त्याचाहि चिकित्सक बुद्धीनें विचार केला तर प्रत्येक मनुष्य हा ईश्वर अवतारांत मोडतो असें म्हणावें लागतें. कारण प्रत्येक मनुष्यांत ईश्वराचा अंश आहे. प्रत्येक मनुष्यांत ईश्वराची कलाहि आहे आणि सत्, चित् व आनंद या गुणांचा आवेशहि प्रत्येक वस्तुजातांत आहे, म्हणून प्रत्येक वस्तुजात अवतार आहे आणि तें 'सर्वं जगदिदं ब्रह्म' या तत्त्वज्ञानानें बरोबर आहे.

संस्कृत वाङ्मयामध्यें अवतारकल्पना पहिल्यानें कोठें सांपडतें, हें पाहूं लागल्यास उपनिषदांमध्यें तिचा थांग लागत नाहीं. औपनिषद् वाङ्मयामध्यें बराचसा ज्ञानविचार आहे. त्या ज्ञानाला अवताराचें सहाय्य नको आहे. अवताराची सुस्पष्ट कल्पना गीतेमध्येंच आहे. गीतेंतील चौथ्या अध्यायांत

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

या श्लोकांमध्यें धर्मसंस्थापना, साधुपरित्राण व दुष्टदंडण यांकरितां मी वेळोवेळीं अवतीर्ण होतों असं भगवतांनीं म्हटलें आहे. अवतार कशाकरितां आहे व अवतारकार्य काय असतें याचेंहि विवेचन गीतेंत स्पष्ट आहे. तें भोळयाभाबडया लोकांनीं लक्षांत ठेविल्यास त्यांना पाहिजे त्या कर्त्या माणसांना अवतार म्हणण्याची बुद्धि होणार नाहीं

हिंदु लोकांमध्यें दशावताराची कल्पना आहे दशावतारांपैकीं हल्लींचा बौद्धावतार हा नववा अवतार चालू आहे असें समजतात. गौतम बुद्धाचा जन्म इ० स० पूर्वीं पांचव्या शतकांत झाला. तेव्हांपासून आतांपर्यंत म्हणजे जवळ जवळ अडीच हजार वर्षें हें बौद्धयुगच चालत आलें आहे काय ? हें बुद्धियुग आहे हें खरें, पण संकल्पामध्यें "**बौद्धावतारे भरतवर्षे भरतखंडे**" असें म्हणतात तें म्हणण्याचें प्रयोजन काय ? बौद्धावतारानतर म्लेंच्छसंहारक कलंकी अवतार होणार अशी समजूत* अद्यापि पुष्कळ लोकांची आहे. कलंकी अवताराचें चित्र पाहिलें आणि त्यांतील घोडा व तलवार हीं साधनें पाहिलीं म्हणजे हा कल्की अवतार शिवाजीमहाराजांच्या रूपानें ३०० वर्षांपूर्वीं होऊन गेला असें म्हणावयास काय हरकत आहे ? भाला, बरची, तलवार, घोडा या साधनांनीं छत्रपति शिवाजी महाराजांनीं म्लेंच्छसंहार केला नाहीं काय ? अशा म्लेंच्छसंहारक शिवाजी महाराजांना दहावा अवतार कल्पून '**शिवावतारे भरतवर्षे भरतखंडे**" असा संकल्प सुरू करावा. दशावतारांपैकीं शेवटचा अवतार श्रीशिवाजीमहाराज असें समजावें. आतां यापुढें अवतार संपले, अशा समजुतीनें लोकांनीं आपापल्या उद्योगास लागावें. हिंदुस्थानांत देवानें दहा वेळां येऊन जें कांहीं करावयाचें तें केलें. आतां माणसांनींच

---

*मुसलमान पुढारी आगाखान हे कल्की अवतार आहेत असें म्हणून त्यांचे अनुयायी भोळयाभाबडया हिंदूंना फसवितात व बाटवितात. हिंदूंच्या या अवतारकल्पनेवर लुच्चे लोक चैन करितात हें ठीक काय ? मूर्खांचा पैसा तो लुच्चाचा खुराक हेंच खरें !

कर्तव्यतत्पर झालें पाहिजे. ईश्वर येणार व तोच सर्व कांहीं करणार अशी भ्रामक समजूत सोडून देऊन आपल्या कर्तृत्वानेंच आपला उद्धार होतो, ही जाणीव ठेवली पाहिजे. जगांत परमेश्वर आहे. तो कर्माचें फळ देतो, थोडें जरी सत्कर्म घडलें तरी "**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्**" या गीताशास्त्रांतील सिद्धांताप्रमाणें तें तारक होतें असें समजावें व दीर्घोद्योग करावा.

ईश्वर भक्तावर कृपा करतो, प्रयत्न करणाऱ्यांना तो यश देतो म्हणजे तरी काय ? भगवान् गीतेंत स्वच्छ सांगतात कीं, मी भक्ताचें रक्षण करितों म्हणजे त्याच्या बुद्धीचें संरक्षण करितों '**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ।**' यावरून ईश्वर भक्ताच्या बुद्धीला जपतो, त्याची सद्बुद्धि कायम ठेवतो असें दिसतें. महाभारतांतहि एके ठिकाणीं देव कांहीं गवळ्यांप्रमाणें हातांत काठी घेऊन 'हक, हैक' करीत भक्ताचें संरक्षण करीत नाहींत, तर ज्याचें रक्षण करावें असें देवांना वाटतें त्याला ते चांगली बुद्धि देतात व ज्याचा नाश करावा असें त्यांना वाटतें त्याची बुद्धी ते भ्रष्ट करितात असें म्हटलें आहे.

**न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत् ।**
**यं तु रक्षितुमिच्छन्ति बुध्या संविभजन्ति तम् ॥**

यावरून देव देतात काय, करतात काय आणि करवितात काय याचाहि खुलासा सर्वत्र होत आहे, तो लक्षांत ठेवून 'कुरु कर्मैव तस्मात्त्वं' हें तत्त्व हृदयांत ठसवून उद्योगास लागावें. आता रामकृष्णादि जे ईश्वराचे मायामाय शरीरधारी अवतार झाले, त्यांचीं रामायण आणि भागवत यांतील वर्णनें वाचिलीं म्हणजे जें तत्त्व निघतें तें सांगून हा विषय संपवितों.

पृथ्वीला त्रास झाला, ऋषींना पीडा झाली, देवांचा छळ झाला, त्यावेळीं ब्रह्मदेव ईश्वराकडे शिष्टाईला गेले आणि पृथ्वीचें व देवांचें रक्षण करा असें म्हणाले. ईश्वरानें सांगितलें कीं, 'मी तुमच्या मदतीला येतों. पण तुम्ही रामावतारीं वानर होऊन मला मदत केली पाहिजे, व कृष्णावतारीं गोपाळ होऊन साह्य केलें पाहिजे. तुम्ही जर याप्रमाणें कर्तव्य कराल तरच मी अवतार घेईन आणि दुष्टदंडण करून पृथ्वीचा भार हलका करीन, आणि सत्पुरुषांना व देवांना सुख देईन." आजपर्यंत जे जे अवतार झाले ते ते सर्व मनुष्याच्या कर्तृत्वानें झाले, प्रयत्नानें झाले. फार काय पण निर्गुण परमेश्वराला सगुण

करण्याचें सामर्थ्यहि मनुष्यांत आहे हें विसरूं नये. देवाचें अस्तित्व माणसांनीं सिद्ध केलें. देवाचें वैभव माणसांनींच वाढविलें, देवाचें देवत्व, मनुष्य कवींनींच गाइलें. फार काय पण देवाला अवतार घ्यावयालाहि माणसांनींच भाग पाडलें, अशी वस्तुस्थिति आहे. '**देवा हातीं रूप धरवूं आकार। नेदूं निराकार होऊं त्यासी**'॥ या तुकोबारायांच्या उक्तींमध्यें माणसाच्या कर्तृत्वाचें केवढें प्रतिबिंब पडलें आहे, त्याची कल्पना येते.

हिंदूंनो, तुम्ही मनुष्य आहांत, जगांत मनुष्याच्या कर्तृत्वालाच ईश्वर साहाय्य करितो. मानवी कर्तृत्वाशिवाय जगाला शोभा आलेली नाहीं. ईश्वर अवतार घेऊन येणार आणि आपल्या स्त्रियांचें, देवांचें व धर्माचें संरक्षण करणार ही मिथ्या कल्पना सोडून द्या आणि स्वतः स्वसंरक्षण करण्यास तयार व्हा. ईश्वर यापुढें हिंदुस्थानांतील माणसांकडूनच सर्व गोष्टी घडवून आणणार आहे, असा दृढ विश्वास बाळगा आणि उद्योग करा. धर्म, समाज, सत्य, स्त्रियांची अब्रू यांकरितां मारण्यास व मरण्यास तयार व्हा; म्हणजे ईश्वर धांवून येईल, अशीच तुम्हांला शेवटीं प्रार्थना आहे.

---

# प्रकरण ८ वें

## मनोबल–विचार

### जिज्ञासा मारणारा वेदान्त

हिंदुसमाजाच्या मनाचा अभ्यास करूं लागलें असतां जिज्ञासा मारणारा वेदान्त हिंदुसमाजाच्या हाडींमासीं खिळला आहे, असें प्रत्ययास येतें. हिन्दु समाजाचा वेदान्त हा प्रयत्नवाद बुडविणारा आहे. व दैववाद वाढविणारा आहे. सर्व कांहीं प्रभुसत्तेनें चालतें, मानवी प्रयत्न दुर्बल आहे, कशाला करा द्रव्यसंग्रह ? कशाला करा बायकापोरांची काळजी ? कुणाची बायको आणि कुणाचीं मुलें ? काय करावयाचा आहे तो देश ? व कशाला पाहिजे तें स्वराज्य. **औट हात तुझा जागा। येर शिणसी वाउगा॥ एक शेर अन्ना चाड। येर वाउगी बडबड॥** अशा प्रकारची पौरुषशून्य विचार-सरणी हिंदुसमाजांत ओतप्रोत भरलेली आढळते. हिन्दुसमाजाला निवृत्तिपर

वेदान्ताचें अजीर्ण झाल्याचा तर हा परिणाम नव्हे ! मिसरूड न फुटलेल्या पोरापासून तो अगदीं म्हाताऱ्या कोताऱ्या विधवा आजीबाईपर्यंत अनुस्यूत जी एकच प्रकारची दुर्बल विचारसरणी आढळते तिचा नायनाट झाल्यावांचून गत्यंतर नाहीं. हिंदुसमाजांत ही विचारसरणी इतकी कां बोकाळली आहे ह्याचा तपास करणें अगत्याचें आहे. हिन्दुसमाजाचा स्वभाव कोणत्या प्रकारचा आहे, तो तसा बनण्याला कोणतीं कारणें झालीं, हिंदुस्थानांत उपनिषत्कालापासून जी निवृत्ति दिसते तिचें कारण काय असावें, ह्यांचा थोडासा विचार प्रथमतः करून मग जिज्ञासा मारणाऱ्या वेदान्ताकडे वळूं.

उपनिषदांमध्यें तत्त्वविचार आलेला आहे, परंतु तेथें स्मार्तधर्माप्रमाणें तारतम्यानें विचार केला असून तीन ऋणें फेडणाऱ्याला त्याचा अधिकार आहे असें दर्शविलें आहे. देव, ऋषी व पितर यांच्या ऋणांतून मुक्त झाल्यावर पूर्ण मुमुक्षु होऊन मग संन्यास घ्यावा असा दंडक वैदिक धर्मांत आहे; परंतु भगवान् बुद्धानें जी क्रांति केली तीमुळें भिक्षु होण्याचा अधिकार सर्वांना मिळाला व निवृत्तिपर तत्त्वज्ञान समाजाच्या हाडींमासीं खिळून बसलें. बौद्धधर्माचें खंडण कुमारिल भट्टांनीं व श्रीमत् आद्य शंकराचार्य प्रभृतींनीं केलें, परंतु समाजाच्या मनावर बौद्ध तत्त्वज्ञान, वृत्ति, भावना व कल्पना यांचा जो संस्कार झाला होता तो कोणालाहि नष्ट करितां आला नाहीं, आणि निवृत्तिपरता घालवितां आली नाहीं. श्रीशंकराचार्यांच्या पश्चात् मध्व, रामानुज, वल्लभ हे संन्यासी आचार्य झाले व त्यानंतर बाराव्या शतकापासून ज्ञानेश्वरादि साधुसंत महाराष्ट्र क्षितिजावर चमकले. संतांनीं विश्वबंधुत्व व विठोबाची भक्ति यांचा अतिरिक्त उपदेश केला. तात्पर्य गेल्या दोन हजार वर्षांचा धार्मिक व सामाजिक इतिहास पाहिला तर हिंदुसमाजांत निवृत्तिपर तत्त्वज्ञानच वर्धमान झालेलें आहे असें ठरतें.* हें तत्त्वज्ञान जिज्ञासा मारतें. जगाकडे तुच्छतेनें पाहण्याची वृत्ति उत्पन्न करितें. निवृत्तीचें अजीर्ण या समाजाला अतिशय झालें आहे म्हणून आतां प्रवृत्तीचें औषध दिल्यावांचून गत्यंतर नाहीं.

जगांत ज्ञान हें अत्यंत पवित्र गणलें आहे. ज्ञान ही मोठी शक्ति, ज्ञान हें जगताचें जीवन आहे. ज्ञानच जगावर राज्य करतें. अज्ञानाला ज्ञानाची गुलामगिरी

*निवृत्तिपर वेदांताच्या इतिहासाचें विस्तृत व मार्मिक विवेचन ' आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष पूर्वार्ध ' प्रकरण ५।६ यांत वाचकांनीं अवश्य अवश्य पाहावें.

पत्करावी लागते. असा ज्ञानमहिमा असतांना हिन्दुसमाजांत ज्ञानजिज्ञासा औत्क्रयानें दिसत नाहीं, याचें कारण ज्ञानाचें महत्त्व तरी पटलें नसावें, किंवा ज्ञानजिज्ञासेला प्रतिबंधक अशी एखादी गोष्ट असावी. आम्हाला पहिल्यापेक्षां दुसरें कारणच खरें वाटतें. ज्ञानाचें महत्त्व हिन्दुस्थाननें ओळखलें आहे. पण जगाच्या विविधज्ञानशाखांत जी हिन्दुसमाजाची प्रगति दिसत नाहीं त्याचें कारण जिज्ञासा मारणारा वेदान्त हें होय.

सर्व जगांत ब्रम्हज्ञान हें श्रेष्ठ, त्या ज्ञानापुढें इतर सर्व ज्ञानें तुच्छ, अशा समजुतीनें वेदान्तज्ञानाशिवाय दुसरीकडे न पाहण्याची प्रवृत्ति हिन्दुसमाजाची बनली आहे. नाना विद्या, नाना कला, नाना प्रकारचे शास्त्रीय शोध यांचें बाहुल्य हिन्दुस्थानांत एका काळीं होतें, यांत शंका नाहीं. परन्तु मध्यंतरीं असा एक अवदशेचा काळ आला, कीं त्या वेळीं विद्या नको, शास्त्र नको, व्युत्पत्ती नको, कांहींहि नको, अशी विचारसरणी सुरू झाली, आणि त्याबरोबर ईश्वरप्राप्तीला विद्या, कला, शास्त्र, शोध यांची आवश्यकता नाहीं असें प्रतिपादन सुरू झालें. मनुष्य प्राण्याचें ध्येय ईश्वरप्राप्ति. ईश्वरप्राप्तीचें साधन भक्तिभाव. एका भक्तिभावानें जर ईश्वरप्राप्ति होते तर मग इतका खटाटोप कशाला, असें वाटणें स्वाभाविक आहे.

या विचारसरणीला पंडित आणि संत अंशतः जबाबदार आहेत असें वाटतें. मध्ययुगांत पंडितांनीं ज्ञान हें शास्त्रीय परिभाषेनें व टीकाग्रंथांनीं इतकें अवघड करून ठेविलें कीं, पंडितांचाहि त्यांत प्रवेश होणें मुष्किलीचें झालें. सर्व ज्ञान संस्कृतांत आणि तें पांडित्याच्या चक्रव्यूहांत. इतक्या अभेद्य किल्ल्यांत ज्ञान जाऊन बसल्यावर तें मिळत नाहीं असें पाहून त्याची हेटाळणी सुरू केली, पंडितांनीं* जनतेला ज्ञानद्राक्षें ‘टुकटुक’ माकडा म्हणून दाखविलीं, अर्थात् द्राक्षें आंबट आहेत म्हणून तीं नकोत अशी प्रतिक्रिया सुरू झाली. पंडितांनो, ठेवा तुमचें ज्ञान तुमच्याजवळ; अहंतागुणानें ब्रह्मराक्षस करणाऱ्या तुमच्या ज्ञानापेक्षां शुद्ध भावानें होणारें ईश्वरप्राप्तीचें ज्ञान फार चांगलें, अशी घोषणा संतांनीं सुरू केली.

ज्ञान हें जसें संस्कृत भाषेच्या कड्याकुलुपांत व अवच्छेदकावच्छिन्नाच्या

---

* पंडितांनीं परिस्थितीचा विचार न करितां कसे ग्रंथ लिहिले हें ‘आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष’ पूर्वार्ध, प्रकरण ७ यांत पाहा.

भुयारांत कोंडलें होतें, तसेंच तें कर्मठ आचाराच्या कांटेरी कुंपणांत बसविलेंहि होतें. मध्यकालीन निबंधग्रंथांमध्यें सगळीकडे प्रायश्चित्तधर्मच सांगितला आहे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत सर्व धर्मकर्में बांधलेलीं ! जरा इकडे का तिकडे करावयास फुरसत नाहीं. वर्षांचे जितके दिवस त्याच्या दुप्पट व्रतें आणि वैकल्यें ! हेमाद्रीचा चतुर्वर्ग चिंतामणी म्हणजे व्रतवैकल्यांचा आचार कोशच होय. जरा कांहीं चुकलें कीं, लागलीच प्रायश्चित्त. त्या प्रायश्चित्तांतून वर येऊन जगाच्या ज्ञानाकडे पाहाण्याला वावच नाहीं. अशा स्थितींत ज्ञानजिज्ञासा मारली गेली. '**यः क्रियावान् स पंडितः**' 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' अशा वाक्यांचे अर्थ कर्मठ मनुष्य असे होऊं लागले. जो करून दाखवितो तोच शहाणा, कर्ता पुरुष हाच खरा शहाणा, हा तात्त्विक अर्थ जाऊन सारा दिवस तेल्याच्या घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणें एकसारखा जो चालतो तो क्रियावान् अशी मिथ्या कल्पना आली. धर्मसिंधुकारांची एक आख्यायिका सांगतात कीं, तो ग्रंथ वाचून एक गृहस्थ ग्रंथकाराचें धर्माचरण पाहावयास गेला; त्या वेळीं ग्रंथकार सकाळीं उठून शेकोटी पेटवून शेकत होते. तें पाहून आपल्या वर्तनाचा व ग्रंथाचा मेळ कसा घालावयाचा असें त्या पृच्छकानें विचारिलें. ग्रंथकारानें ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें "मी जर कर्मठपणांत बसलों तर ग्रंथ लिहावयास वेळ कोठें आहे ?" असें उत्तर दिलें. यावरून कर्मठपणानें कशी छाप ठेविली होती हें समजतें.

कर्मठपणाच्या कांटेरी सांपळ्यांत अडकलेलें आणि संस्कृत परिभाषेच्या गुहेंत दडलेलें ज्ञान बाहेर काढण्याची मोहीम सुरू झाली. संतांनीं आपल्या वाक्प्रहारानें कर्मठपणाचें कुंपण मोडून टाकिलें आणि संस्कृत भाषेंत दडलेल्या ज्ञानाच्या विविध शास्त्रांपैकीं एक तत्त्वज्ञान उचलून तें मराठींत सांगण्याकरितां ग्रंथसंपत्ति निर्माण केली. देशी भाषेंतून सर्व लोकांना ज्ञान देण्याच्या दृष्टीनें ज्ञानेश्वरादि संतांच्या प्रयत्नांत इतकी सूत्रबद्धता कीं, वेदान्ताशिवाय दुसरा एकहि ज्ञानविषय संस्कृतांतून मराठींत आणला गेला नाहीं. न्यायमूर्ति रानडे संतांबद्दल म्हणतात, 'संतांनीं भटाभिक्षुकांचें बंड कमी केलें आणि देव व मनुष्य यांतील मध्यस्थाची कल्पना समूळ नाहींशी केली.'

न्यायमूर्तींचें हें विधान वस्तुस्थितीचा विचार करितां अतिशय साहसाचें आहे असें म्हणावें लागतें. कर्मठ भटांची भिक्षुकी संतांनीं बुडविली असेल, पण

**संतांच्या मध्यस्थीचें बंड** तेव्हांपासूनच बोकाळलें. देव व मनुष्य यांमध्यें संत असतो. तो संत ईश्वर भेटवितो. अभिमान सोडून संताला शरण गेलें पाहिजे. अशा विचारसरणीमुळें संतांच्या मागें बहुजन समाज लागला. देवाची भेट घेण्याकरितां मनुष्यजन्म आणि ती भेट घालून देणारा मध्यस्थ संत असा साध्य-साधनसंबंध जुळल्याबरोबर गुरूपदेशाची, भोंदू गुरूंची इतकी सांथ आली कीं त्या सांथीच्या तडाख्यांतून हिंदुसमाज अद्यापहि सुटला नाहीं व तो त्वरित सुटेल अशी आशाहि वाटत नाहीं.*

आधुनिक विद्वानांनासुद्धां गुरूपदेश व साधु यांचें इतकें वेड आहे कीं, साधूंच्या आशीर्वादानें मुलें होतात आणि कृपेनें बढती मिळते अशीच या विचाऱ्यांची समजूत असते. सारांश, संतांनीं आपलेंच स्तोम वाढविलें. देवभेटीच्या कल्पनेवर समाजाला आपणांकडे आकर्षून घेतलें आणि जगन्मिथ्यात्वाचा वेदान्त सांगसांगून आणि ब्रह्मनिरूपणें करकरून समाजाची इतकी जिज्ञासा मारली कीं, जगांतील व्यवहाराकडे ह्मणजे धर्मशास्त्रप्रोक्त अभ्युदयाकडे पाहाण्याची समाजांतील प्रवृत्तीहि नाहींशी केली.

हिंदुसमाजामध्यें बुवा, संत व महाराज ह्यांचें फार प्रस्थ आहे. कांहीं नाहीं तरी हे तीनचार लाख फुकटखाऊ साधु हिंदुस्थानांत चरत आहेत. महाराज होण्याला विद्या नको, कर्तृत्व नको, व फारसा आचारहि नको. असा हा बिन-भांडवली धंदा आहे. कारण " नको शास्त्र अभ्यास व्युत्पत्ति खोटी " " येथ व्युत्पत्ति अवघी विसरिजे " असें यांचें तत्त्वज्ञान आहे. जगाची निंदा करीत, विषय हे त्याज्य आहेत असें सांगत, अत्यंत बेजबाबदारपणानें राहाणारा असा

*टीप — संताळ्यांमध्यें पुष्कळ संताळे ब्राह्मणेतर आहेत. त्यांनीं ब्रह्मज्ञान सांगून समाजावर फुकट जगण्याचा उद्योग चालवला आहे. पण सत्यशोधकांची दृष्टि फक्त भटजीवर ! भटजी हा कांहींतरी काम करून तरी जगतो परंतु संत हे अगदीं ऐदखाऊ व फुकटखाऊच असतात. त्यांजकडे सत्यशोधकांची संक्रांत वळेल तो शुभदिन समजावा. सर्वच संताळे लुच्चे असतात असें नाहीं. एकादा अपवादहि आढळतो. आमच्या पाहाण्यांत ह. भ. प. संतोजीमहाराज कुकुरमुंडेकर हे एक चांगले ब्राह्मण संत आहेत. त्यांनीं प्रामाणिकपणें धर्मकार्यार्थ अहर्निश यत्न चालविलेला आहे. काशीकर पंडितांना कार्यप्रवण करण्याचें श्रेय त्यांनाच आहे.

ह्या साधूंचा वर्ग आहे. यांची प्रसिद्धी कशाकरितां तर चमत्काराकरितां व अद्भुतपणाकरितां !

ह्या साधूंच्या भजनीं हजारों चेले लागलेले असतात. त्यांत कांहीं वकील, कांहीं डॉक्टर, कांहीं बॅरिस्टर असे असले कीं, बुवामहाराजांचा जम जमला असें खुशाल समजावें. त्यांच्या अंगाला केशर, डोक्याला अत्तर, जेवायला चमचमीत भोजन, निजायला मऊमऊ गाद्या-गिर्द्या असे सगळे विषयोपभोग असून पुन्हां हे शिष्यांना त्यागाची अशी भुरळ पडतात कीं, सांगून सोय नाहीं. अमके महाराज आंगठ्यांतून गंगा काढतात तर तमके राखेची खडीसाखर करितात. तिसरे महाराज पाणी शिंपडून सहस्रभोजनाचा स्वयंपाक एकदम सिद्ध करून दाखवितात ! अशा यांच्या गोष्टी भोळा शिष्यवर्ग सहर्ष व सकौतुक जिकडे तिकडे सांगत असतो.

या लोकांचे डोक्यांत हें शक्य कसें आहे, असा विचार कधीं येत नाहीं. जो महाराज आंगठ्यांतून पाणी काढतो त्यानें मिरजेसारख्या पाण्याच्या शिमग्यामुळें प्रख्यात झालेल्या गांवांत पाणीच पाणी करून कां दाखवूं नये ? जो महाराज राखेची खडीसाखर करितो त्यानें परदेशी साखर येण्याची बंदी कां न करावी ? देशांत जिकडे तिकडे साखरच साखर यानें करून सोडली पाहिजे. पाणी शिंपडून जो महाराज पाकनिष्पत्ती करितो त्याला देशांतील उपाशी मरणाऱ्या लोकांना वांचविणें अशक्य आहे काय ? पण महाराज हें करीत नाहींत. यांच्यापेक्षां रा. वेलणकर, ओगले, किर्लोस्कर, टिकेकर हे देशी कारखानदारच श्रेष्ठ होत.

मानसिक गुलामगिरीमुळें हे चिकित्सेचे विचार शिष्यवृंदांच्या डोक्यांत कधीं येत नाहींत. अंधश्रद्धाळू शिष्यवृंद इतका अंधळा बनतो कीं, गुरूंना कांहीं विचारूं नये, शंका पुढें टेकूं नये, चिकित्सा करूं नये, तर महाराज जें सांगतील तें ऐकून अगदीं स्वस्थ असावें. महाराजानें आईवरून शिवी दिली तरी मायाबंध तोडावा म्हणून दिली असे अर्थ हे शिष्य लावीत बसतात !

ज्ञान हें जगांत श्रेष्ठ व पवित्र आहे. त्या ज्ञानावरच जग चाललें आहे. सामान्यज्ञान, विशेषज्ञान व तत्त्वज्ञान असे ज्ञानाचे तीन प्रकार मानले तरी सर्वांमध्यें ब्रह्मज्ञान हेंच श्रेष्ठ होय. ब्रह्मज्ञान श्रेष्ठ असलें व त्यानें मोक्षप्राप्ती होत असली तरी तें ज्ञान वैराग्यशील व विवेकी अधिकाऱ्यालाच दिलें पाहिजे. ज्ञानेश्वर म्हणतात--मोक्ष देईल ज्ञान । या बोला कीर नाहीं आन । परि ते

थारे ऐसें मन । होआवे ॥ म्हणजे ज्ञानाला भूमिका चांगली असेल तरच तें मोक्ष देईल. दूध हें उत्तम खरें पण जो मेहनत करून पचवील त्यालाच तें तुष्टि, पुष्टि व हृष्टिकर होईल. दूध पचविण्याचें सामर्थ्य नसतांना तें प्याल्यास दुधाचा नाश व प्रकृतीचा बिघाड हीच फलप्राप्ती होईल. ज्ञानेश्वर म्हणतात 'जें सायासें स्तन्य सेवी ! तें पक्वान्नें केविं जेवीं ।' जें आयासानें स्तनपान करूं शकतें अशा बालकाच्या तोंडांत जिलबी कितीही चांगली असली तरी ती कोंवणें हितप्रद आहे काय ? हिंदुसमाजांतील ज्या माणसांना अद्याप स्वच्छ राहावें, व्यवस्थित वागावें, स्वाभिमान रक्षावा हें सुद्धां जेथें कळत नाहीं, तेथें ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून उपयोग काय ?

शिमग्यामध्यें जसा बीभत्स शब्दांचा सुकाळ तसाच, वाचकहो, हिंदुस्थानांत ब्रह्मज्ञानाच्या भाषेचा सुकाळ झाला आहे, ब्रह्मज्ञानाच्या ढोंगीपणाच्या नवलकथा तुम्ही बऱ्याच ऐकल्या असतील. एक दोन येथें सांगतों. एका ब्रह्मज्ञानी गुरूजवळ एक शिष्य बरेच दिवस होता. माया व मिथ्या हे शब्द ऐकून ऐकून त्याचे कान किटले होते. एकदां शिष्य गुरुसमवेत अरण्यांतून जात असतांना अकस्मात् एक हत्ती धांवून आला. त्यासरशी गुरुमहाराज पळाले व झाडावर चढून बसले. हत्ती निघून गेल्यावर शिष्यानें विचारलें, "गुरुमहाराज, मिथ्या गजाचें आगमन होतांच आपण कां बरें पळून गेलांत ?" गुरूनें उत्तर दिलें 'अरे गजाचें आगमन जसें मिथ्या तसेंच माझें पलायनहि मिथ्याच आहे.'

**गजोऽपि मिथ्या पलायनमपि मिथ्या**

श्राद्धीय ब्राह्मणांना येण्याला उशीर लागला म्हणून घरच्या वेदांती बाईनें तयार झालेली खीर भुरकण्यास प्रारंभ केला. नवऱ्यानें बाहेरून खिरीचे भुर्के ऐकिले व "अहं वैश्वानरोभूत्वा" हें वाक्यहि ऐकिलें. तो स्वयंपाकघरांत चुलीपुढें आला. चुलींतील जळकीं लांकडें घेऊन त्यानें आपल्या स्त्रीला सैडकण्यास प्रारंभ केला. "हां हां असें कां ? असें कां ?" असें ती स्त्री विचारूं लागली तेव्हां नवरा म्हणाला "**नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**" वाचकहो, यांतील स्वारस्य तुमच्या ध्यानीं आलेंच असेल. हा सर्व वेदान्त लक्षांत घेऊन वागण्याचा निश्चय करा म्हणजे झालें.

तत्त्वज्ञानाचा अधिकारी कोण ? त्याची योग्यता काय ? त्याच्या ठिकाणीं बुद्धीची तीव्रता किती असली पाहिजे ? हा सगळा विचार बाजूस राहून त्रिविध

तापानें तापलेला व संसारानें गांजलेला मनुष्य यदृच्छेनें परमार्थाचा अधिकारी ठरूं लागला. ज्ञानानें मोक्ष प्राप्त होतो हा सिद्धान्त. तें ज्ञान अत्यंत शुध्द व कुशाग्र बुध्दीच्या मनुष्याशिवाय होत नाहीं हेंही खरें. असें असतांना त्या ज्ञानाचीहि भानगड नको म्हणून भक्तिभावाचा भक्तिसंप्रदाय निघाला. या संप्रदायाचें वर्चस्व समाजावर गेलीं हजार वर्षें इतकें आहे कीं, त्यांतून वर निघणें कठीणच आहे.

मध्ययुगोत्तर कालांत संसारांत वैताग उत्पन्न होण्याला पुष्कळ अनुकूल स्थिति होती. जिकडे तिकडे अविंधांची जाळपोळ, लूट, हाणमार, दुष्काळ इत्यादि अस्मानी व सुलतानी संकटांनीं समाजाला 'त्राहि भगवन्' करून सोडलें होतें. या सर्व वैतागांत समाधानाकरितां क्रियाशून्य करणारा जो वेदान्त पाहिजे होता तो आला. प्रतिभासंपन्न कुशाग्र बुद्धीलाच ग्राह्य असें तत्त्वज्ञान अचिंत्य म्हणून त्याचा विचार करीत बसूं नये, आणि ज्याचा विचार करितां येतो असे जे जगांतले विषय ते सर्व मिथ्या आहेत ! जग माया आहे या कल्पनेनें अभ्युदयाचा विचार खुंटला, आणि वेदान्त तत्त्वज्ञान फारफार मोठें म्हणून त्यांचेपुढें नुसतीं लोटांगणें घालण्यांत आलीं. तत्त्वज्ञान मोठें म्हणून त्याला नमस्कार करावा व जग मिथ्या म्हणून त्याचा तिरस्कार करावा एवढेंच काम होऊन बसलें !

हिंदुसमाजाला जर यापुढें जिवंत समाज म्हणून जगांत रहावयाचें असेल तर या जिज्ञासामारक वेदान्ताला नमस्कार करून हिमालयांत पाठविलें पाहिजे. नाहींतर एवढा समृद्ध व सुसंपन्न देश मिथ्या म्हणून परक्यांच्या हातीं देऊन आपण शाश्वत सुखाचा (?) मार्ग धरला पाहिजे. हा वेदान्त परक्यांना फायदेशीर आहे, त्यांना तारक आहे व आम्हांला मारक आहे. 'सर्व माया' म्हणून वैतागून सगळे हिंदुस्थानांतले लोक जर जगाबाहेर जातील तर त्यासारखी इतरांना आनंददायक गोष्ट कोणती ? हिंदुसमाजाला जिवंत राहाण्याला आतां रोखठोक वेदान्त पाहिजे आहे, जिकडे तिकडे ब्रम्हमायेचें निरूपण, सर्वत्र ब्रह्ममायेचा गोंधळ, आणि जिकडे तिकडे निवृत्तिमार्गाचे प्रचारक संत, यांनीं इतका काहूर केला आहे कीं, समाजस्वास्थ्य चिंतण्याला फुरसत नाहींशी झाली आहे. हिंदुस्थानांत कित्येक लक्ष निरुद्योगी साधू आहेत म्हणे ! ! हे लाखों साधू पोसणें म्हणजे हिंदुसमाजानें लवकर मरण्याच्या मार्गाला लागणें आहे. साधू करतो काय, खातो

काय, बोलतो काय, इकडे लोकांचें लक्ष साहाजिकच वेधतें. कारण सिद्धाचीं लक्षणें साधकाचे अंगीं बाणलीं पाहिजेत असा सिद्धांत आहे. सिद्ध करतो तसें साधकानें करावें. सिद्ध निवृत्ति सांगतो, निवृत्ति बोलतो, निवृत्त व्हा म्हणतो. असे निवृत्ति-परायण लक्षावधि साधु ज्या समाजाचें ध्येय म्हणून असतात तो समाज आपत्ति-गर्तेतून लवकर वर कसा येणार ? हे लक्षावधि साधू दुर्बल समाजावर उगीच चरत आहेत आणि 'धर्म बुडाला बुडाला' असेंहि म्हणत आहेत. या साधूंच्या 'धर्म बुडाला' या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, पूर्वीसारखी यांना हल्लीं चंदी मिळत नाहीं. पण चंदी न मिळण्याचें कारण समाजाजवळचें अन्न गेलें व समाज दरिद्री झाला ! हें कारण या साधूंच्या लक्षांत येत नाहीं. या लाखों साधूंना अन्न नेणारांची चीड येत नाहीं, अन्यायाचा संताप येत नाहीं, फार काय पण पति-व्रतेवर कोणी हात टाकला तरीसुद्धां हे साधु थंडेच असतात ! ! हिंदुसमाजानें या साधूंना एक शाळा काढून द्याव्या. किंवा रुग्णालयामध्यें रुग्णशुश्रूषकांचें काम द्यावें किंवा त्यांची सैन्यांत भरती करावी.*

साधनचतुष्टयसंपन्न मनुष्य वेदान्ताचा अधिकारी असें वेदान्त शास्त्रांत सांगितलें आहे. अर्वाचीन शास्त्रांतहि तशीच व्याख्या केली पाहिजे. हिंदुस्थानाचा नागरिक, हिंदुसमाजाचा अभिमानी, गृहस्थाश्रमी आणि भौतिक शास्त्रांतील एकदोन शाखांत तज्ज्ञ असा साठ वर्षांवरचा मनुष्य हिंदुसमाजानें यापुढें वेदान्ताचा अधिकारी समजला पाहिजे. तीस वर्षांच्या आंतील पोरें मुलगी मिळत नाहीं म्हणून ब्रह्मचारी, पैसा मिळत नाहीं म्हणून वैराग्यशील आणि कांहींच करितां येत नाहीं म्हणून ब्रह्मज्ञानी, अशीं माणसें साधूंच्या कळपांत जीं जातात तीं बंद झालीं पाहिजेत. 'वैतागानें वेदान्ताचा अधिकारी' हें शास्त्र कांहीं दिवस गुंडाळून देव्हाऱ्यांत ठेवलें पाहिजे. जग खोटें हाही वेदान्त

---

*साधूंना लष्करांत पाठविलें म्हणजे त्यांना मरण्याचा व मारण्याचा वेदान्त कळेल. आज त्यांना ब्रह्मज्ञानावर कातडी बचावण्याचाच वेदान्त माहित आहे. हें आमचें विधान पुण्याचे श्री० विनायक महाराज साखरे यांना चांगलें झोंबलेलें दिसतें. नवयुगधर्मावर अभिप्राय देतां देतां ते म्हणतात—"साधूंची सैन्यांत भरती केली तर तुमची रेल्वेच्या हमालांत भरती कां होऊं नये ?" साधूंचें सैन्य जेव्हां रणांगणावर जावयास निघेल तेव्हां त्याची पाठवणूक आम्हीच हमाली करून करूं हे वरील महाराजांनीं लक्ष्यांत ठेवावें.

पश्चिमेकडे पाठवून जगांत ईश्वर आहे, कर्तव्यकर्मरूपी कुसुमानें ईश्वर संतुष्ट होतो हें तत्त्व लोकांना शिकविलें पाहिजे. ईश्वरप्रातीकरितां अभ्युदय, ईश्वर-प्रातीकरितां प्रवृत्ति, ईश्वरप्रातीकरितां स्वराज्य, ईश्वरप्रातीकरितां प्रजा, घर, दार, धन, दौलत हीं सर्व ईश्वराकरितांच पाहिजेत, अशी प्रवृत्ति हिंदु-समाजाच्या नसानसांत उत्पन्न केली पाहिजे. प्रवृत्तीचा अतिरेक झाला, अर्थात् हिंदुसमाजाला जगावर साम्राज्य करण्याची इच्छा उत्पन्न होऊन ती परिपूर्ण होऊं लागली म्हणजे मग निवृत्तीचा थोडा उपदेश केला तरी चालेल. आजच्या या शास्त्रीय जगांत शास्त्रसंपन्नतेच्या चढाओढींत उत्पन्न झालेलीं जीं जीं शास्त्रीय ज्ञानें तीं तीं आत्मसात् केल्याशिवाय हिंदुसमाज जिवंत राहण्याची आशा नाहीं. मोटारी, आगगाड्या, तारायंत्रें पाहिजेत, आणि इतर सुखसोयी पाहिजेत, तर त्या ज्ञानाची जिज्ञासा तीव्र वाढविली पाहिजे. इच्छेशिवाय मार्ग सुचत नाहीं. ज्ञानाजिज्ञासेशिवाय ज्ञानप्राप्ति नाहीं. ज्ञानाशिवाय अभ्युदय नाहीं. आणि अभ्युदयांतील अन्न खावयास नसलें म्हणजे मग " तया करंट्याला परमार्थ कैंचा " अशी परंपरा आहे

सारांश, दुबळा वेदांत, ज्ञानाजिज्ञासा मारणारा वेदांत, हिंदुसमाजास नको आहे. ज्ञान वाढविणारा वेदांत पाहिजे आहे. आजारांतून उठलेला मनुष्य जसा खाऊं खाऊं करितो तसें हिंदुसमाजाला ज्ञानक्षेत्रांत खाऊं खाऊं झालें पाहिजे. हें ज्ञान नव्हे, तें ज्ञान नव्हे, असें म्हणून ज्या ज्ञानाची निंदा केली आहे, तेंच ज्ञान आजच्या प्रवृत्तीला उपयुक्त म्हणून पुढें आणलें पाहिजे. शिल्पकला, शेती आणि इतर उद्योग शास्त्रीय पद्धतीनें चालविण्याचें ज्ञान हिंदुसमाजानें संपादिलें पाहिजे. लहान लहान पोरांना जे वेदान्ताचे पाठ देण्यांत येतात, उपनिषदें शिक-विलीं जातात, त्याचा उपयोग कांहींतरी होतो काय? होत असेल तर तो उलटच होतो, म्हणून सरळ प्रवृत्तिपरता येईल असें गीताशास्त्राचें शिक्षण अवश्य तेवढें द्यावें. शाळांमध्येंसुद्धां ईश्वरनिष्ठा व पापभीरुत्व हे गुण उत्पन्न होतील इतकाच वेदांत सांगावा. मुलें, स्त्रिया यांना निवृत्तिपर वेदांताचीं गाणीं आणि स्तोत्रें शिकवूं नयेत. उपदेशकांनीं निवृत्ति व जिज्ञासा मारणारा वेदांत सांगूं नये. तीव्रतर यत्न करून सिद्धि मिळविण्याचा वेदान्त समाजास सांगितला पाहिजे. व गीतेंतील राजर्षींची परंपरा वाढविली पाहिजे.

---

# प्रकरण नववें



## मनोबल--विचार

### आजचा रोखठोक वेदांत

हिंदुसमाजाला आज रोकडा वेदांत शिकवून धडाडीनें कार्यप्रवण केलें पाहिजे. आत्मा अमर व देह नश्वर हें तत्त्व हिंदुसमाज विसरला आहे. मी आत्मा आहें. आत्म-तत्त्व अमर आहे. देह हा वरचेवर येणारा व जाणारा आहे. तो कर्तव्याचें साधन आहे तो गोमटा म्हणून त्याचा उपभोग घेऊं नये व बोखटा म्हणून त्याची आबाळ करूं नये. कार्याकरितां त्याला रगडून राबवून घ्यावा. देहाची पर्वा न करितां स्वधर्माकरितां मारण्यास आणि मरण्यास सिद्ध असणें हें आपलें कर्तव्य आहे, असें प्रत्येक हिंदूला वाटावयास पाहिजे. देहावर शस्त्राचे आघात होतील पण आत्म्यावर ते होत नाहींत. देहाला अग्नी जाळूं शकतो पण आत्म्याला तो जाळूं शकत नाहीं. पाणी, वायु यांच्या शक्ति देहावर चालतात परंतु त्या आत्म्यावर मुळींच चालूं शकत नाहींत म्हणून देहाची पर्वा न करितां स्त्रियांचें पातिव्रत्य, समाजाचे न्याय्य अधिकार, स्वधर्म व स्वसमाज यांकरितां मारण्याची व मरण्याची वृत्ति आज हिंदुसमाजांत कां बरें दिसत नाहीं, याचा विचार व्हावयास पाहिजे.

पुनर्जन्माची ग्वाही देणारा जगांत हा एकटा धर्म आहे. ज्या धर्मांत पुनर्जन्माचा पत्ता नाहीं, तीं माणसें बेफिकीरपणें आत्मबलिदान करण्यास तयार होतात, व हिंदुसमाज जेथें तेथें कुचराईनें माघार घेतो व मार खाऊन कातडी बचावण्याचा यत्न करितो, याचें कारण काय ? याचें कारण हेंच कीं, पुनर्जन्माचें रहस्य या समाजाला कळलेलें नाहीं. आत्म्याचें अमरत्व पटलेलें नाहीं. व आत्मस्वरूपाची ओळख नाहीं. सनातन वैदिकधर्माचीं महत् तत्त्वें ज्याला कळलीं आहेत, असा मनुष्य जगांत नांव गाजवल्यावांचून राहणार नाहीं. भगवान् मनूनें **" धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः । धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥** हा जो दशलक्षणी धर्म सांगितला आहे, त्यांत धैर्य हें पहिलें लक्षण आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं मोक्षेच्छु साधकाला जी दैवी संपत्ति प्राप्त व्हावी असें म्हटलें आहे तिचें पहिलें लक्षण "अभयं सत्वसंशुद्धिः,"

म्हणजे निर्भयता हें आहे. धैर्य, निर्भयता व आत्म्याचें अमरत्व पुनर्जन्म हीं त्रयी ज्या धर्मांत सांगितलीं आहेत तो धर्म जगांत श्रेष्ठ होय.

धैर्य, उत्साह, धडाडी आणि जयिष्णु वृत्ति, हीं लक्षणें सात्विक कर्त्याचीं आहेत. धैर्याशिवाय निर्भयता येत नाहीं. हे दोन्ही गुण परस्परपोषक आहेत. महात्मा गांधी म्हणतात Hindoo is a coward अर्थात् हा भ्याडपणा हिंदुधर्माला कलंक नाहीं काय? जगांत जिकडे तिकडे एक तत्व आहे, तें मी आहे, अशा निर्भय वृत्तीनें सिंहासारखे संचार करणारे तरुण हिंदुसमाजांत उत्पन्न झाले पाहिजेत. धैर्य व निर्भयता या गुणांशिवाय व्यवहार नाहीं, माणुसकी नाहीं, फार काय पण कोणतेंही कार्य नाहीं. समर्थ सांगतात परमेश्वर मनुष्याजवळच असतो पण धैर्याची कसोटी पाहात असतो. "**सदा सर्वदा देव संनीध आहे। कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे॥**" मराठ्यांनीं अटकेपार झेंडे लावले ते उगाच नाहीं लावले. "**हिंमत मर्दा मदत खुदा । मारतां मारतां मरावें,**" अशा आशयाचें ब्रीदवाक्य त्या वेळच्या प्रत्येक मराठ्याच्या हृदयांत होतें. मर्दानें हिंमत धरली कीं, खुदा मदत करितो, असें तें तत्त्व आहे. हिंदूंनो, हें तत्त्व विसरलां काय?

आत्म्याचें अमरत्व, निर्भयता, पुनर्जन्म आणि धैर्य यांनीं युक्त असा कोहिनूर हिऱ्यासारखा आपला वेदांत असतांना त्याची किंमत वाळवंटांतील गारगोटी-सारखी कोणीं केली? तरवारीच्या धारेसारखा तिखट, अग्निसारखा प्रखर, सूर्यासारखा तेजस्वी, चिंतामणीसारखा चिंतित फळ देणारा, व कामधेनूसारखा इष्टकामधुक असा आपला वेदांत असतांना त्याला निस्तेज कोणीं केला? ज्या वेदांतांत देहाच्या चोजल्यांना बिलकुल अवसर नाहीं, ते तेथें कसे आले? कर्ता वेदांत षंढ कोणीं बनवला? धडाडीच्या वेदांताला पंगू कोणीं केलें? जयिष्णु वेदांताला सहिष्णु कोणीं बनविलें? याचा, वाचकहो, विचार करा. दूरदृष्टीनें विचार केल्यास वेदांताच्या उपदेशकांनीं हा वेदांत बिघडविला असें नाहीं का तुम्हाला वाटत? वडिलांचें अनुकरण मुलें, गुरूचें अनुकरण शिष्य, वक्त्याचें अनुकरण श्रोते करितात, असा सामान्य नियम आहे. तदनुसार भिक्षु, संन्यासी, साधु, हरिदास व पुराणिक हे जे वेदांत उपदेशक आहेत, त्यांनीं वेदांत हा आपल्यासारखा दुबळा केला, आणि त्यांचें अनुकरण समाज आज करीत आहे.

धैर्य, निर्भयता व आत्म्याचें अमरत्व इत्यादींची जाणीव हिंदुसमाजाला

नाहीं. कल्पतरूखालीं बसून भिकेचे डोहाळे हिंदु-समाजाला सुचत आहेत ! " अरे तूं मोठा आहेस. तूं ईश्वर आहेस. तूं ब्रम्ह आहेस. हें सर्व विश्व तुझें आहे. जगावर पाहिजे तिकडे आक्रमण कर. जगाला हिंदू कर, म्हणजे तुझें तत्त्वज्ञान शिकव, असें हिंदुधर्म सांगत असतांना वीतभर पोटासाठीं कशाला करा उठाठेव ? साडेतीन हात देहासाठीं कशाला करा खटाटोप? पिंडाएवढें अन्न मिळालें कीं बस्स ! कुठेंही हरिहरि म्हणत बसावें, असली मेंगी मनोवृत्ति जी उत्पन्न झाली आहे, ती अवैदिक व अधार्मिक आहे. शेंकडों वर्षे जगावें, राज्यें करावीं, उपभोग घ्यावा, चांगलें ऐकावें,चांगलें पहावें,सत्कर्में करावीं, अचुक यत्न करावा, भगवान् श्रीकृष्ण, जनक, याज्ञवल्क्य अशा राजर्षींच्या परंपरेंत आपण असावें, समाजाला व राष्टाला ( तस्मात् यया कयाच विधया बव्हन्नं प्राप्नुयात् ) खूप अन्न मिळवून द्यावें, हें तत्त्वज्ञान या समाजांत यावयास पाहिजे.

हल्लीं वेदान्ताचे उपदेशक भिक्षु, संन्यासी, बैरागी, हरिदास, पुराणिक आणि संताळे हे होत. हे सर्व उपदेशक पोटाचा धंदा म्हणून वेदान्तोपदेश करित असतात. म्हणजे यांचा वेदान्त पोट बचावण्याचा अर्थात् भरण्याचा आहे. हा पोटभरू वेदान्त राष्ट्र कसें जगवील ? ब्रह्म सत्य व जग मिथ्या म्हणून दर रोज तींच तींच ठरलेलीं वाक्यें व भाषणें उच्चारणें व लोकांनीं बहार केली म्हटल्यावर पैशाकडे पाहून धन्य समजून घेणें अशा लोकांकडून मारण्याचा आणि मरण्याचा वेदान्त हिंदुसमाजाला कधींहि पटणार नाहीं. कीर्तन खुलावें, बिदागी चांगली मिळावी, स्वतः बिदागीचा उच्चार करावयाचा नसेल तर दलालाकडून करवावा, लौकिक व्हावा, पुराणीकबुवा चांगले आहेत असें लोकांनीं म्हणावें म्हणून वेदान्त शिकला जातो व शिकविला जातो. वेदान्ताचे अधिकारी कोण ? तर हरिदास, पुराणीक व प्रवचनकार. कारण त्यांना बडबडीला तेज आणण्याकरितां तो लागत असतो. वेदान्ताचें मर्म, रहस्य, देहनश्वरत्व या गोष्टी त्यांना कितीशा पटलेल्या असतात हें त्यांच्या वृत्तीवरूनच दिसतें. देवाची निंदा केली, यांना राग येत नाहीं, स्त्री भ्रष्टविली, यांचें डोकें तापत नाहीं, देवाची पालखी अडवली, सत्याग्रहाची तयारी होत नाहीं, मुसलमानांनीं भजनी दिंडी अडविली तरी मारामारी करावीसें वाटत नाहीं. कारण सर्वच परब्रम्ह ! ! ' सर्वं खल्विदं ब्रम्ह ' मग आपपरभाव कशाला ? **वंदे मातरम् कशाला ? राष्ट्र कशाला** ? मुसलमानांचा द्वेष कशाला ? असें म्हणणारे पंक्तिपठाण साधु

आम्ही कितीतरी पाहिले आहेत. यांच्यामागें समाज आहे, व त्याच्यामागें दुबळा वेदांत आहे.

कांहीं माणसांना निवृत्ति, संन्यास हे शब्द व हीं ध्येयें मोठीं पसंत वाटतात. कांहीं न करण्याची असहकारिता ही खरोखर सर्वांत सोपी होय. शास्त्र, अभ्यास व व्युत्पत्ति हीं खोटीं म्हणून कांहींच न शिकणें हें फार सोपें. शास्त्रांतील सूक्ष्म शास्त्रीय चर्चेनें ब्रह्मज्ञान होत नाहीं म्हणून विद्येचा गंधही न घेणें हेंही सोपें. या दृष्टीनें निवृत्ति व संन्यास यांत मजा आहे खरी ! परंतु असल्या बेजबाबदार लोकांपेक्षां उत्तरदायी गृहस्थच बरे. गृहस्थाला जगत्‌चक्र चालविण्याचें कार्य करावें लागतें, पण हा संन्यासी व साधु नुसत्या ब्रह्ममायेच्या घोंटाळ्यावरच लोकांवर जगतो. भोगाशिवाय त्याग नाहीं, पांडित्य संपादन केल्याशिवाय त्याचा निर्वेद म्हणजे अरुचि नाहीं, थोरपणा मिळविल्याशिवाय लीनता नाहीं व शिकल्याशिवाय विसरतांही येत नाहीं. साधु, संन्यासी, बैरागी, यांच्या आयुष्यांत यांतील कांहीं नसतें. कर्तत्व, धडाडी, कष्ट, दुःख, अपमानाचे प्रसंग इत्यादि त्यांच्या आयुष्यांत औषधासहि सांपडत नाहींत. म्हणून हिंदुसमाजानें यांचें अनुकरण करूं नये. वेदांत तेजस्वी, जोरकस, धडाडीचा, उत्साही व पौरुषयुक्त असतांना, तो आज निस्तेज, कमजोर, नैराश्यवादी व षंढ असा या पोटभरू उपदेशकांनींच केलेला आहे. म्हणून जिज्ञासा मारणारा, पौरुषाची खच्ची करणारा, सर्व ब्रह्म म्हणून समाजसेवेच्या व देशसेवेच्या आड येणारा, विश्वबंधुत्वाच्या नांवाखालीं दुसऱ्या समाजाची स्वसमाजावर पाहिजे तशी कुरघोडी करून घेणारा हा वेदांत—हा समाजमारक वेदांत—व त्याचे एकनिष्ठ उपदेशक या दोघांना कांहीं दिवस हिमालयाची हवा खाण्यास पाठविलेंच पाहिजे तरच हिंदुसमाज जगेल. या दुबळ्या वेदांती वृत्तीमुळें गुंडानें बायको पळवून नेली तर " ती तशीच होती हो; मी दुसरी करीन " असें उत्तर येतें. मुसलमानांनीं मिरवणुकीवर आक्रमण केलें, तर " ते लोक महामूर्ख आहेत, म्हणून मिरवणुकीच काढणें नको, " असें कांहीं बहाद्दर बोलतात. आगगाडींत कितीही माणसें कोंबलीं, मोटरवाल्यानें नियमबाह्य कांहींही वर्तन केलें, तरी ' जाऊं द्या हो, आपल्याला घटकाभर बसायचें आहे,' असले विचार जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं दिसतात. हा त्या दुबळ्या वेदांताचाच परिणाम होय.

वेदांत मनुष्याला ईश्वर करतो पण आजचा वेदांत हा ठिकठिकाणीं हिंदुसमाज

जाची माणुसकी घालवीत आहे. गांवांत, रस्त्यांत, सभेंत, रेल्वेंत, मोटारींत, जेथें तेथें मी मनुष्य आहें, मला स्वाभिमान आहे, त्याचें रक्षण हिंदु व हिंदी या नात्यानें जेथें तेथें करावयाचें आहे, या तत्त्वाचा ध्यास हिंदुसमाजाला शयनीं पानीं भोजनीं आसनीं लागला पाहिजे. मेलेल्या वेदांतानें हें कार्य होणार नाहीं. जिवंत वेदांतच हें कार्य करूं शकेल. बा हिंदुसमाजा, तूं जिवंत वेदांत अंगीकारून जिवंत होणार ना ? हो, तसाच तूं हो. देव, मुनि, गंधर्व, किन्नर, ऋषि, हे तुला तोच शुभाशीर्वाद देत आहेत.

हिंदुसमाजानें यापुढें कर्त्या व जिवंत वेदांत्याचें अनुकरण केलें पाहिजे. हे बुवा, बैरागी, गोसावी, संत आणि महंत कांहीं सक्रिय व साचार वेदांत सांगत नाहींत; व हे खरे वेदान्ती नव्हेत. देहाची पर्वा न करितां निर्भयपणें मारण्यास व मरण्यास तयार झालेला तानाजी मालुसरा हाच खरा वेदांती होय. त्या शत्रुंजयानें शिवाजीमहाराजांचें निमंत्रण येतांच येकुलत्या एक पोराचें ठरलेलें लग्न लाथाडून आधीं महाराजांकडे प्रयाण केलें. एकुलता एक मुलगा, त्याचें लग्न, वऱ्हाड आलेलें, स्त्रीचा आग्रह या सर्वांचे पाश ताडकन् तोडून जो स्वतःचें लग्न सिंहगडाशीं लावण्याकरितां गेला व ज्यानें आत्मदान करून गड काबीज केला, तोच खरा वेदांती ! हिंदुसमाजाला आत्मनिवेदन करून कार्याचे गड काबीज करणारे आज वेदांती पाहिजेत. रौलेट ॲक्टाचे वेळीं सरकारच्या दडपशाहीला भीक न घालतां ज्यानें सभा भरवल्या व लष्करी शिपायांनीं बंदुका रोखून संगिनींचीं टोंकें गळ्याशीं लावून " शिरछेद लेएंगे " असें म्हणून दरडावण्याचा प्रयत्न केला, तरी ज्या संन्याशानें " मैं खडा हूं गोली चलाव " असें दणदणीत उत्तर दिलें तोच खरा वेदांती होय. श्रद्धा व आनंद यांत रमणाऱ्या श्रद्धानंदाला प्राणाची पर्वा कशी असणार ? त्यानें देह नश्वर म्हणून एकदां जी कर्तव्ययज्ञांत आपली आहुति टाकली ती टाकलीच. हिंदुसमाजानें असल्या संन्याशांचें अनुकरण केलें पाहिजे. लो. टिळकांनीं सरकारशीं भांडतांना केवढे धैर्याचे प्रसंग दाखवले. १९०८ सालीं सरकारनें काळ्या पाण्याची शिक्षा जाहीर केल्यावर त्यांनीं जे धीरोदात्त उद्गार काढले ते खरा वेदांतीच काढूं शकेल. महात्मा गांधी हे हिंदुस्थानांतील युरोपिअन सरकारला आपल्या धैर्यानेंच वठणीवर आणतील. संभाजीनें जिवंतपणीं क्रूरपणाच्या निस्सीम यमयातना भोगल्या व धर्माकरितां देहत्याग केला. अशीं एक

ना दोन कितीतरी उदाहरणें अनुकरणीय आहेत. हिंदुसमाजानें असलीं जिवंत वेदांत्यांचीं उदाहरणें डोळ्यांपुढें ठेवावीं आणि " **स्वधर्माकरितां मरावें। मरोनि अवघ्यास मारावें। मारतां मारतां करावें। धर्मसंरक्षण॥** हें श्रीसमर्थ–वाक्य केव्हांहि विसरूं नये.

जगन्मिथ्यात्वाचा वेदान्त आतां हिंदुस्थानांत तरी पुरे झाला. जग सत्य आहे, तो परब्रम्हाचा विकास आहे, चैतन्याचा विकास आहे असें समजून जगद्धितार्थ अनेक उलाढाली करणारे पुरुष राष्ट्रांत उत्पन्न झाले पाहिजेत. जग मिथ्या,* देश मिथ्या, बायको मिथ्या, द्रव्य मिथ्या असें म्हणून म्हणून तीं दुसऱ्यांना उपभोग्य करण्याची प्रक्रिया या सिध्दांतानुसार आज कित्येक वर्षे चालली आहे, ती यापुढें बंद करावयास जग हेंच परब्रह्म " सर्वं जगदिदं ब्रह्म " हें तत्त्व शिकविलें पाहिजे. वास्तविक जगाला सोडून ईश्वराला हुडकणें कसें चुकीचें आहे हें खालील विवेचनावरून लक्ष्यांत येईल.

श्रीसमर्थ म्हणतात:—" जिकडे जग तिकडे जगन्नायक ॥" जगन्नायक जगांतच सांपडणार. ' तसेंच ओस मुलुखीं काय पहावें। लोकावेगळें कोठें राहावें ॥ असेंहि श्रीसमर्थ म्हणतात. जगांत ज्याला कांहीं कर्तृत्व दाखवावयाचें असेल त्याला जग पाहिजे. रजोगुणी जगाच्या वेगळी कर्तृत्व दाखविण्याला दुसरी जागाच नाहीं. फार काय पण ईश्वराला आपली साक्षसुद्धां या जगाच्या द्वारांच पटवितां येते. जगांतील अनेक चमत्कार दाखवून ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करितां येतें. जगांतील नामरूपावरून ईश्वराचें लीलाकैवल्य भासमान होतें. म्हणून जगाव्यतिरिक्त अर्थात् जगाशिवाय ईश्वराचें अस्तित्वहि भासणें अशक्य आहे. गुळांत जशी सर्वत्र गोडी आहे, कापरांत जसा सर्वत्र वास आहे, कारल्यांत जसा सर्वत्र कडूपणा आहे, त्याप्रमाणें या विश्वांत जे द्रुम, नग, नगर, आराम, चैत्य, वनें, उपवनें इत्यादि शेंकडों पदार्थ आहेत ते सर्व चैतन्याच्या विकासरूपानें परिणत झाले आहेत यांत शंका नाहीं. " गोडपणें जैसा गूळ । तैसा देव झाला सकळ ॥" असें श्रीतुकाराम महाराज सांगतात. या सर्व उदाहरणांवरून जग हेंच ईश्वराचें दृश्य व सगुण स्वरूप असें म्हणावें लागतें. ज्ञानेश्वरांनीं अनेक दृष्टांतांनीं ही कल्पना फारच चांगली मांडिली आहे. तिचें रूपांतर व सारांश पुढीलप्रमाणें आहे.

---

*देश मिथ्या तर तो मजकडे ठेवा असें इंग्रज म्हणतो! व बायको मिथ्या तर ती मला द्या असें मुसलमान म्हणतो!

जगाचा बाप मी व आई माया. शरीराला जसे अनेक अवयव, वृक्षाला जशा अनेक फांद्या, त्याप्रमाणें जगांत वैविध्य दिसलें तरी तें सर्व मद्रूप आहे. मातीचा मुलगा घट, सुताचा मुलगा पट, कल्लोळपरंपरा ही जशी सागराची संतति, तशी चराचर विश्व ही परमेश्वराची संतति होय. ( जग हें माझें असलें, मजहून निराळें असलें, तरी तें मद्रूप आहे. जग व मी यांमध्यें अभेद आहे. )—वन्हि व ज्वाला, रत्न व तेज, कमळ व पाकळ्या, सोनें व अलंकार, यांचा संबंध नुसता भाषेंत जसा आहे तसाच जगाचा व माझा संबंध आहे. द्रवपणा म्हणजेच पाणी, तेज म्हणजेच रत्न, गोडी म्हणजेच साखर, ज्वाळा म्हणजेच अग्नि, पाकळ्या म्हणजेच फूल, फळें व डाहाळ्या म्हणजेच वृक्ष, अलंकार म्हणजेच सोनें, मुरलेलें दूध म्हणजेच दही, घट म्हणजेच मृत्तिका, पट म्हणजेच सूत. **तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि पै आघवें ॥** म्हणजे विश्व या नांवानें जें कांहीं आहे तें सर्व मीच आहें, असें ज्ञानेश्वरमहाराज चौदाव्या अध्यायांत सांगत आहेत. ईश्वरांत व जगांत जो भेद मानतो तो व्यभिचारी भक्त व अभेद मानतो तो अव्यभिचारी भक्त असें ज्ञानेश्वरांचें मत आहे. सोन्याचे अलंकार झाले तरी सोनेपणा जसा नाहींसा होत नाहीं, कमल फुललें तरी कमलत्व नष्ट होत नाहीं, तसें चैतन्य विश्वरूपानें नटलें तरी त्याला कांहीं कमीपणा येत नाहीं. जगत् जर ईश्वराला झांकत असेल तर ज्वाळा अग्नीला, तेज रत्नाला आणि अलंकार सुवर्णाला झांकणार नाहींत काय ? परंतु व्यवहार तसा होत नाहीं. म्हणून शेवटचा सिद्धांत असा—**म्हणोनी जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नोहे, उखितें । आघवें मीचि ॥** कीं, जगाला बाजूला सारून मी ईश्वर विद्यमान नाहींच तेव्हां दिसणार तरी कसा ? सारांश, जगत्–स्वरूपानेंच ईश्वराचें ग्रहण केलें पाहिजे.

तुकाराममहाराज अनेक ठिकाणीं विष्णुमय जग, वैष्णवांचा धर्म असें म्हणतात. " **विश्वीं विश्वंभर** " हेंच वेदांताचें सार आहे. " **जगीं जगदीश**," असाच शास्त्रांचा घोष आहे, " **व्यापिलें नारायणें**, " असाच पुराणांचा डिंडिमा आहे. असें असतां " जगन्मिथ्या " ही घातक व मारक कल्पना यापुढें सोडावयास नको काय ? जग हा चैतन्याचा विकास, जग हेंच ईश्वराचें स्वरूप कसें आहे, हा विषय जिज्ञासूंनीं ज्ञानेश्वरीच्या चौदाव्या अध्यायांत अवश्य पाहावा, अशी जातां जातां सूचना करावीशी वाटते.

हिंदुसमाजाला जगत् परब्रह्म आहे असें शिकवून पहिल्यानें देशाची सेवा करावयास शिकविलें पाहिजे. देह आणि देव यांच्यामध्यें देश आहे आणि समाज आहे हें सांगून स्वसमाजाला उपकारक अशी सेवा करावयास लाविली पाहिजे. हिंदुसमाज ईश्वर ईश्वर म्हणून जगाकडे, देशाकडे, समाजाकडे, दुर्लक्ष करितो ही मोठी चुकी आहे. स्वसमाजसेवा आणि देशसेवा हीच रोखठोक वेदान्ताची पहिली पायरी आहे. स्वार्थांतून परार्थांत जाणें हें वेदान्ताचें पहिलें दालन आहे या कल्पना हिंदुसमाजाला शिकविल्या पाहिजेत.

हिंदुस्थानांतील वेदान्त्यांनो, तुम्ही हिंदुसमाजाला यापुढें दुबळा वेदान्त सांगूं नका. जग हेंच परब्रम्ह असें सांगा. भूतांचें पालन हीच देवपूजा, रुग्णसेवा हेंच ईश्वरभजन, निरक्षरांना साक्षर करणें, साक्षरांना सुविचारी बनविणें, अस्पृश्यांना स्पृश्य करणें, धर्मभ्रष्टांना शुद्ध करून घेणें, हिंदूंना द्विज करणें, पुरुषांना मर्द बनविणें, अनाथ विधवा व मुलें यांना आश्रय देणें या साक्षात् ईशसेवेच्या गोष्टी आहेत. त्यांकडे हिंदुसमाजानें दुर्लक्ष्य करूं नये, असेंच यापुढें लोकांना सांगा. तारक वेदान्ताचा उपदेश करा. मारक वेदान्त सांगूं नका. पोकळ वेदान्त सांगूं नका. ईशसेवेचा—जनसेवेचा-वेदान्त सांगा. एषणात्रयीच्या पलीकडे जाणारा कोटींसंख्येंत एकादाच सांपडेल. त्याला तुमच्या उपदेशाची जरूर नाहीं. परंतु ज्यांना विषयसेवनाचीहि अक्कल नाहीं अशांना भलतें वैराग्य सांगूं नका. मी मी म्हणणारे चकतात, मोहांत अडकतात, मोठेपणाच्या जाळ्यांत सांपडून जिव्हालौल्य, स्त्रिया, पैका, प्रतिष्ठा या खड्ड्यांत पडून मरतात. ब्रह्मचाऱ्यांनो, चांगले गृहस्थ व्हा, नागरिक व्हा; मातांनो, वीरमाता, सुमाता बना असें सांगा. निवृत्ति, संन्यास या ध्येयाचा उपदेश पुरे झाला, वीट आला—नव्हे या उपदेशाच्या अजीर्णाची घाण हिंदुसमाजांत सर्वत्र दिसत आहे. ती नाहींशी करण्याकरितां प्रवृत्तिवंत, धडाडीचे, कर्ते, चढाईचे वीरपुरुष राष्ट्रांत उत्पन्न झाले पाहिजेत. संतांनो, तुम्ही समाजाला हीच शिकवण द्या. हिंदुसमाज मरत आहे, तो मारक वेदान्तानें मरत आहे. त्याला जगविण्याकरितां तारक वेदान्ताचा पुरस्कार करा, हेंच शेवटीं सांगावयाचें आहे.

पूर्वार्ध समाप्त

# हिंदुसमाज समर्थ कसा होईल?

## उत्तरार्ध

## प्रकरण पहिलें

## समाजबलविचार

### शरीरबल

हिंदुसमाज मनानें, शरिरानें, समाजबलानें व संपत्तीनें कसा समर्थ होईल या प्रश्नाच्या विचारास पूर्वार्धांत प्रारंभ केला. प्रथम हिंदुसंघटणाची भूमिका सांगून दुसऱ्या प्रकरणांत हिंदु कोणास म्हणावें हें सांगितलें. पुढें सात प्रकरणांत हिंदुसमाजाचें मनोदौर्बल्य घालविण्याकरितां कोणत्या कल्पना आणि विचार यांचा उद्भव झाला पाहिजे, हें सांगितलें. उत्तरार्धामध्यें प्रथम शरीरबलाचा विचार करून पुढें समाजबलाचा विचार करूं.

हिंदुसंघटणाचा प्रश्न गेल्या पांच सहा वर्षांत पुढें आल्यापासून व्यायाम व शरीरबल या गोष्टींकडे लोकांचें लक्ष वेधूं लागलें आहे, हें अत्यंत इष्ट आहे. इंग्रजी राज्य होण्यापूर्वी आपल्या लोकांत मर्दपणा व पौरुष होतें हें स्पष्टच आहे. कारण स्वराज्य चालविणें व त्याचें रक्षण करणें ही महत्त्वाची जबाबदारी आपणांवर होती. परंतु इंग्रजी आमदानी सुरू झाली. इंग्रजी नोकरशाहीला महत्त्व आलें, सर्वत्र शांतता झाली, आणि आगगाड्या, तारायंत्रें व सडका यांच्या सोयी झाल्याबरोबर लोकांना कृतकृत्यता वाटली. अर्थात् इंग्रजी शिक्षण व नोकरी हीं इतिकर्तव्यें ठरतांच स्वाभाविकच शरीरबलाकडे दुर्लक्ष झालें. शरीरबलाविषयीं अव्वल इंग्रजीपासून इतकी अनास्था झाली कीं, शारीरिक दौर्बल्य हा दुर्गुण सद्‌गुणांत मोडूं लागला. स्वदेशी चळवळीनें लोकांच्या या वृत्तीला चांगला झटका दिला व तालमी, आखाड्यांकडे लोकांना लक्ष देण्यास भाग पाडलें. पण ती उत्सुकता सरकारची दडपशाही व लोकांचा हलगर्जीपणा यांमुळें चार दोन वर्षांपेक्षां अधिक टिकली नाहीं. अलीकडे पुन्हा शुद्धिसंघटणाच्या चळवळीनें उचल घेतली आहे, म्हणून व्यायामाबद्दल समाजांत सतत प्रेम व उत्साह राहील असा यत्न केला पाहिजे.

हिंदुसंघटणाच्या चळवळींत पुष्कळ विषय अंतर्भूत होतात. परंतु आखाडे, लाठी–काठी, स्वयंसेवकांचीं पथकें यांना अग्रस्थान देण्याचें कारण स्वसंरक्षण व स्वाभिमानसंरक्षण हें होय. इंग्रजांच्या शिस्तीच्या राज्यांत मुसलमानांनीं अलीकडे हिंदूंवर अशी चढाई व पुंडाई चालविली आहे कीं, तिचा प्रतिकार लोकांनींच केला पाहिजे. कोहाट, गुलबुर्गा, संगमनेर, बंगलोर, गोध्रा, सुरत व लारखाना इत्यादि शेंकडों ठिकाणच्या दंग्यांवरून सरकाराचे पोलीस हिंदूंचें रक्षण करूं शकत नाहीं हें सिद्धच झालें आहे. मूर्ती फोडण्याची आगळीक कर, स्त्रिया पळविण्याचे अत्याचार कर, मिरवणुकींवर आडमुठेपणानें हल्ले कर, तर घटिंगणपणें लहान पोरासोरांना बाटवून मुसलमान कर, अशा ज्या मुसलमानांच्या लीला दररोज वर्तमानपत्रांत वाचण्यांत येतात, प्रत्यक्ष पाहाण्यांत व ऐकण्यांत येतात, त्यांना आळा घालण्याकरितां समाजामध्यें प्रतिकारक्षमता संघटित स्वरूपांत यावयास पाहिजे. मूर्ती फोडली कीं हात तुटतो, स्त्रीकडे वाकड्या नजरेनें पाहिलें कीं डोळा फुटून जन्मांध होण्याचा प्रसंग येतो, आणि मिरवणुकीवर हल्ले केले कीं प्राणांवर प्रसंग येतो, अशी दहशत जेव्हां मुसलमान गुंडांना बसेल; त्याच वेळीं त्यांचे हे अत्याचार थांबतील. मुसलमानांच्या या प्रासंगिक आगळिकीमुळें व्यायामानें प्रतिकारसामर्थ्य वाढविण्याचें महत्त्वाचें कार्य पुढें आलें आहे.

कोणत्याहि समाजाला नेहमीं व्यायामाची व शरीरबलाची आवश्यकता आहे हें सांगावयास नकोच. तत्रापि, हिंदुसमाजासारखा जो जुनाट अस्ताव्यस्त आणि अवाढव्य समाज असतो, त्याला आपल्या अंतर्बाह्य शत्रूंपासून सुरक्षित राहाण्याकरितां नेहमीं शरीरबलसंपन्न राहावें लागतें. म्हणूनच **पंडित मदन मोहन मालवीयां**-सारखा हिंदुसभेचा अध्यक्ष सांगतो कीं, शरीरानें समर्थ व मनानें उदात्त बना. (Be strong and noble-minded ). कारण कोणत्याहि हातघाईच्या प्रसंगीं स्वाभिमानानें रक्षण करण्याचा मार्ग म्हणजे ठोशास ठोसा व दंडास दंडा हा होय. यास्तव दुर्जनाला ताळ्यावर आणण्याकरितां प्रत्येक हिंदूनें धट्टेकट्टे व दोन तोंडांत देण्याजोगें सामर्थ्यवान् बनलें पाहिजे. हिंदुसमाजाला संघटणेच्या दृष्टीनें जशी व्यायामाची जरुरी आहे त्याचप्रमाणें धर्म व राष्ट्रदृष्ट्याहि जरुरी आहे. कोणताहि समाज शारीरिक ऱ्हास झाल्यावर नुसत्या बुद्धीनें जगूं शकत नाहीं. समाजांत बुद्धि, पौरुष, पराक्रम व कर्तृत्व हीं जेव्हां असतात, तेव्हांच तो जिवंत समाज असें समजावें. आणि जिवंत समाजाला शरीरबलाकडे लक्ष्य द्यावेंच लागतें. त्याशिवाय समा-

जाचें धर्मकारण, राजकारण व कोणतेंहि कार्यकारण चालत नाहीं. धर्माचरणाला शरीरबल पाहिजेच पाहिजे. राष्ट्र म्हटलें कीं तें ( राजते तद्राष्ट्रम् ) दैदीप्यमान् असावयास पाहिजे. राष्ट्राला आपला प्रकाश सतत टिकविण्याकरितां व्यायामजन्य शरीरबलाची व बुद्धिबलाची अत्यंत जोपासना करावी लागते. म्हणून हिंदुराष्ट्र या दृष्टीनें स्वराज्य मिळविण्याला आणि तें रक्षण करण्याला शरीरबलाची आवश्यकता आहे. अनेक साहसें, दीर्घोद्योग व अचाट शोध करून हिंदु राष्ट्राला भावी कालांत शास्त्रसंपन्नतेच्या जोरावर जगावयाचें असल्यामुळें कणखर व धट्टेकट्टे राष्ट्रपुरुष हिंदुसमाजांतून उत्पन्न झाले पाहिजेत. सारांश, व्यायामाची जरुरी निरनिराळ्या दृष्टींनीं आहे, एवढें सांगितल्यावर आपल्या परंपरेंत याबद्दल काय सांगितलें आहे हा विचार ओघानेंच येतो.

आपल्या धर्माचीं अभ्युदय व निःश्रेयस हीं दोन प्रमुख अंगें सांगितलीं आहेत. यांनाच प्रपंच-परमार्थ, प्रवृत्ति-निवृत्ति असें म्हणतात. हीं ध्येयें साध्य करण्याकरितां शरीरबलाची जोपासना केली पाहिजे. वैदिक वाङ्मयामध्यें ज्या प्रार्थना आहेत, त्यांत आम्ही शंभर वर्षें जगावें, शंभर वर्षें राज्य करावें व त्याचा शंभर वर्षें उपभोग घ्यावा, आमचीं अंगें सुदृढ असावीं, आमच्या राष्ट्रांतील तरुण बलवान् भोक्ते व मोठे सभापंडित असावेत, अशी मागणी केली आहे. सनातन वैदिक धर्मानें मानवी जीविताचें पुरुषार्थप्राप्ति हें ध्येय सांगितलें आहे. पौरुष, पराक्रम व पुरुषार्थ यांची समव्याप्ति आहे. धर्मपुरुषार्थापैकीं आचारधर्म आचरण्यास प्रथम शरीरबल पाहिजे, म्हणूनच 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' असें म्हटलें आहे. सामान्य व्यावहारिक नीतितत्त्वें तंतोतंत पाळण्याकरितां शरीरबल चांगलेंच पाहिजे. अर्थपुरुषार्थसिद्धीकरितां व्यापार, शेती, नोकरी, हे उद्योग करावे लागतात. पण या उद्योगांत धडाडी व कर्तृत्व दाखविण्याकरितां शरीरसंपत्तीची जरूर आहे. सर्व संपत्तींत शरीरसंपत्ति मुख्य आहे. ही संपत्ति गेली कीं अर्थसंपत्ति मिळवितां येत नाहीं आणि असली तर उपभोगितां येत नाहीं. कामपुरुषार्थ म्हणजे जगांतील शब्दस्पर्शादि विषयांचा रसिकतेनें उपभोग घेणें, पण त्या उपभोगालाहि शरीरबल पाहिजेच. उमद्या घोड्यावरून घोडदौड करणें, पल्लेदार बंदुकीनें शिकार करणें, हिमालयासारख्या पहाडांत व काश्मीरसारख्या देशांत पाहिजे तिकडे भटकून निसर्गसुंदरीचा उपभोग घेणें, अशा कार्यांस अंगांत चांगला जोम पाहिजे. सारांश, कोणत्याहि पुरुषार्थाच्या दृष्टीनें पाहातां शरीर-

बलाची फारच जरुरी आहे· वैदिक प्रवृत्तिपर वाङ्मयांत शरीरबलाचा उल्लेख असल्यास नवल नाहीं. निवृत्तिपर वाङ्मयामध्यें सुद्धां म्हणजे उपनिषदांमध्येंहि '**नायमात्मा बलहीनेन लभ्यः** ।' बलहीनाला आत्मप्राप्ति होत नाहीं, असा सिद्धांत सांगितला आहे. श्रीमत् भगवद्गीतेमध्यें बलवंतांचें बल मीच आहें, असें भगवान् सांगतात. वैद्यकाच्या वाग्भटग्रंथामध्यें व्यायामापासून कोणकोणते फायदे होतात याचें मोठें मार्मिक विवेचन केलें आहे. '**लाघवं कर्मसामर्थ्यं दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः । विभक्तघनगात्रत्वं व्यायामादुपजायते** ॥' म्हणजे हलकेपणा, चापल्य, कोणतेंहि काम उत्साहानें करण्याचें सामर्थ्य, प्रखर जठराग्नि, अंगांतील मेद झडणें आणि अवयवांमध्यें घटीवपणा व पिळदारपणा येणें इतके फायदे व्यायामापासून होतात.

शरीरबल व ब्रह्मचर्य यांचें मोठें उदाहरण म्हणजे श्री. हनुमानाचें होय. श्रीरामायणांत वज्रांगबली श्रीमारुतिराय यांच्या पराक्रमाचीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत. रामायणांतील बलभीमाप्रमाणें भारतीय भीमाच्या पराक्रमकथा आबालवृद्धांना माहीत आहेत. भीमानें बकासुराला ठार केलें, कीचकाची रेवडी उडविली, दुःशासनाची मांडी फोडली आणि जरासंधाचीं दोन शकलें केलीं. प्राचीन रामायण व भारतकाल सोडून तीनशें वर्षांपूर्वीचा महाराष्ट्राचा उज्ज्वल काल जरी डोळ्यांपुढें ठेवला तरी समर्थांच्या वाङ्मयांत शरीरबलाविषयीं उत्कृष्ट उद्गार सांपडतात. समर्थ म्हणतात,

**शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ॥**
**शक्तियुक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत नांदती ॥**
**धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ॥**
**याकारणें शक्ताला । नाना युक्ति सुचवाव्या ॥**
**उदंड खस्तीचीं कामें । मर्द मारून जातसे ॥**
**नामर्द काय ते लंडी । सदा दुश्चित लालची ॥**

समर्थांच्या या जिवंत उद्गारांवरून त्यांनीं राष्ट्रांत बल उत्पन्न होण्याकरितां किती यत्न केले असतील याची कल्पना येते. समर्थांनीं नामर्द राष्ट्राला मर्द केलें यांत संदेह नाहीं. श्रीसमर्थ व छत्रपति शिवराय यांचीं कणखर शरीरें व सूक्ष्म आणि विशाल बुद्धि हींच त्यांचीं प्रारंभींचीं स्वराज्यसाधनें होतीं. तीनशें वर्षांपूर्वी स्वराज्यसंस्थापनेची जी जबाबदारी राष्ट्रावर होती त्यापेक्षां आजची परिस्थिति अधिक

बिकट आहे. आज आपणाला शस्त्रसंपन्न सत्तेशीं झुंजावयाचें आहे, शासनतंत्र बळकावयाचें आहे व लोकसत्ता निर्माण करावयाची आहे, व हें करितां करितां विधर्मी समाजाची चढाई व दंडेली नष्ट करून त्यांना आत्मसात् करावयाचें आहे. म्हणजे आपल्यापुढें कार्याचा डोंगर आहे. अशा वेळीं "अरे, नेभळे होऊं नका, नामर्द होऊं नका, पराक्रमी व्हा," अशी घोषणा हिंदुसमाजांत सारखी व्हावयास पाहिजे.

हिंदुसमाजाचें निरीक्षण केल्यास असें दिसतें कीं, या समाजांतील सर्व वर्गांत सांप्रत शरीरबलाचा ऱ्हास होत असून व्यायामाची आवड दिवसेंदिवस कमी होत आहे. त्यांत सुशिक्षित समाजाची मनोवृत्ति फारच अनुकंपनीय आहे. सुशिक्षित म्हटला कीं त्याच्या ठिकाणीं अजागळपणा, पोशाखीपणा व नाजुकपणा यांचें साहचर्य असतें! डोळे खोल गेलेले, गालफडें बसलेलीं, छातीचीं हाडें वर आलेलीं असा जणूं हाडाकातड्यांचा सापळा असें त्याच्या शरिराचें वर्णन अतिशयितेनें करितां येईल. मग कणखरपणा, काबाडकष्ट यांचें नांवच नको! पडेल तें काम करणें, प्रसंगाला तोंड देण्याचें सामर्थ्य असणें, कोणतेंहि कार्य निश्चयानें शेवटास लावणें, या गोष्टी सुशिक्षितांचे हातून कधींच होत नाहींत. तरुण पिढी तर निव्वळ नटवी, छानछुकीची, निर्बल, निरुत्साही व निःसत्त्व दिसूं लागल्यामुळें ती अकालीं मृत्युमुखीं पडत आहे. शंभर वर्षांचें आयुष्यमान गेलेंच गेलें. पण साठीची मर्यादाहि सुशिक्षित ओलांडीत नाहींत. सुशिक्षित लोकांनीं अल्पायुषी मरावें यासारखी देशाची हानी नाहीं. कारण विद्या व ज्ञान यांचा खरा फायदा समाजाला सुशिक्षितांपासूनच मिळतो. पण सुशिक्षित जर असे अल्पायुषी झाले, तर विद्या, ज्ञान व अनुभव यांचा फायदा समाजास कसा मिळेल? इतर देश व आमचा देश यांतील सुशिक्षितांचें आयुर्मान पाहिलें तर महदंतर दिसतें. इंग्लंड, जर्मनी, अमेरिका इत्यादि देशांतील मुत्सद्दी, संशोधक, शास्त्रज्ञ असे पुरुष ८०।९० वर्षें जगतात. म्हणजे साठ वर्षांनंतर पंचवीस तीस वर्षें हे लोक आपल्या देशाची महत्त्वाची सेवा करतात. पण आपल्याकडे कै. रानडे, गोखले, टिळक, राजवाडे असले पुरुष पन्नासांपासून पासष्ट वर्षांचे आंतच इहलोकची यात्रा संपवून गेले! भारतीय युद्धांतील सर्व सेनापती ६० वर्षांवरचे होते हें हिंदु तरुण ध्यानीं घेतील काय?

हिंदु मुलामुलींमध्यें व्यायामाची आवड उत्पन्न व्हावी म्हणून प्रत्येक पालकानें काय केलें पाहिजे हें आतां सांगतों. प्रत्येक हिंदु पालकानें मी देवाला, देशाला

**आणि व्यायामाला तर विसरणारच नाहीं अशी शपथ घेतली पाहिजे** व ती पाळली पाहिजे. देवाचें जसें नित्यस्मरण, देशाकरितां कर्तव्याचरण, तसेंच व्यायामाचें नित्य उपासन केलें पाहिजे. सकाळीं नमस्कार, प्राणायाम, आसनें, फिरणें, पळणें यांपैकीं कांहींतरी व्यायाम, किंवा संध्याकाळीं लाठी, काठी, बोथाटी, कुस्ती, मलखांब यांचा व्यायाम, सशास्त्र पद्धतीनें प्रत्येक हिंदूनें घेतलाच पाहिजे. शरिरांत जोम, मस्ती व मनांत धैर्य येईल अशा पद्धतीचा व्यायाम करून प्रत्येकानें प्रतिवादी होण्याची–आरोपी होण्याची तयारी केली पाहिजे. हिंदु पालकाला आपला मुलगा रडत आला, फिर्याद घेऊन आला, वादी म्हणून आला तर वाईट वाटावें; पण दोन तडाखे देऊन आला, आरोपी म्हणून आला, प्रतिवादी म्हणून आला तर अत्यानंद झाला पाहिजे.

प्रत्येक हिंदु पालकानें नित्य व्यायाम घेतला तरच मुलें त्याचें अनुकरण करतील. पालकांनीं आपलीं मुलें अधिक जोरदार व्हावीत म्हणून स्वतःला थोडेंसें बंधन लावून घेतलें पाहिजे. मुलगा परीक्षेंत पास व्हावा, लौकर नोकर व्हावा म्हणून पालक काळजी घेतात; परंतु मुलगा उंच, सशक्त, लांब, रुंद व्हावा म्हणून मुळींच काळजी घेत नाहींत. वर्षाला किती अभ्यास होतो याचा जसा आईबाप आढावा घेतात तसाच जर ते मुलाच्या शक्तीचा घेतील, आरोग्याचा घेतील, तर मुलें चिरंजीव होतील. बाप मुलाला चिरंजीव म्हणून लिहितो आणि आशीर्वाद देतो. परंतु मुलगा साक्षात् चिरंजीव होण्याला जें करावयास पाहिजे तें करीत नाहीं. मुलाकरितां आईबाप अनेक कष्ट सोसून धनदौलत मिळवितात; परंतु मुलगा हें जें खरें धन–राष्ट्राचें धन–त्याची काळजी जशी घ्यावी तशी घेत नाहींत. **राष्ट्राची संपत्ति तरुण पिढी, राष्ट्राची तिजोरी लहान नवयुवक मुलें व मुली.** त्यांच्या खाण्यापिण्याची, आरोग्याची, व्यायामाची यथायोग्य काळजी जर पालक घेतील तर हिंदुसमाजाचें बल हांहां म्हणतां वाढेल. मुलांकडून सकाळीं आणि सायंकाळीं विविध प्रकारचा व्यायाम करवून घेणें, किंवा ते करतील अशी व्यवस्था करणें, तसेंच काटकपणा येण्याकरितां विविध प्रकारचीं व्यवहारांतील कामें करणें व करवून घेणें, हें आईबापांचें कर्तव्य आहे. हल्लीं पोषाकीपणा इतका आला आहे कीं, जरा ऊन लागलें कीं उष्ण होतें व थंडी लागली कीं पडसें येतें ! वेलदोड्यानें थंडी व लवंगेनें उष्ण होणारी प्रजा धकाधकीच्या मामल्यांत कशी टिकेल ? द्रव्य, घर, अब्रू, स्वाभिमान, स्त्री, या सर्वांच्या रक्षणाकरितां

हिंदु पालकानें आपला मुलगा मर्द करावयासच पाहिजे. हिंदु तरुण मर्द बनले तर उदंड खस्तीचीं कामें करून ते जगतील आणि नामर्द राहिले तर जगांतून नामशेष होतील. नव्या पिढींतील दुर्बळपणा, भ्याडपणा, भित्रेपणा, नष्ट करण्याकरितां पालक आतां बद्धपरिकर झालें पाहिजेत आणि त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें आपल्या मुलांना सामर्थ्यवान् बनविलें पाहिजे. आपल्या पश्चात् मुलाचें कसें होईल ही काळजी करण्यापेक्षां आपल्या देखतच तो समर्थ कसा होईल ही काळजी आईबापांनीं घ्यावी. आणि दूध, तूप, पौष्टिक अन्न, व फळें मुलांना खाऊं घालून त्यांना उत्तम वीर्यवान् बनवावें. पौष्टिक अन्न खाऊं घालून व्यायाम करवून घेणें हें हल्लींच्या युगांत एक धर्मकृत्य आहे असें प्रत्येक हिंदूनें ध्यानांत ठेवावें.

प्रत्येक हिंदु पालकानें मुलांप्रमाणें मुलींचीहि काळजी घेतली पाहिजे आणि त्यांना प्रतिकारक्षम बनविलें पाहिजे. स्त्रियांच्या खेळांकडे आणि व्यायामाकडे हिंदुसमाज फारच दुर्लक्ष करितो. त्यामुळें त्याहि निःसत्त्व होत आहेत. स्त्रिया म्हणजे पाळीव जनावरें किंवा स्त्रिया म्हणजे देवता अशा दोन्ही परस्परविरुद्ध कल्पना हिंदु समाजामध्यें वावरत आहेत. हीं दोन्हीं टोकें सोडून स्त्रिया या मनुष्य आहेत, त्या गृहिणी आहेत, माता आहेत, असें समजून पालकांनीं मुलांपेक्षां मुलींच्या शरीरबलाची काळजी थोडी अधिकच घेतली पाहिजे. हिंदुसंस्कृतीच्या दृष्टीनें मुली या दुसऱ्याच्या आहेत, परंतु त्या उपवर होऊन व योग्य पद्धतीनें कन्यादान होईपर्यंत बाप हा मुलीचा ट्रस्टी आहे. अतएव त्यानें या परक्या ठेवीला अत्यंत सुरक्षित ठेविलें पाहिजे. पूर्वीचीं घरगुती कामें हल्लींच्या राहाणींत नाहींत आणि इंग्रजी पद्धतीचा व्यायामहि नाहीं, म्हणून हिंदु मुलींना व स्त्रियांना कोणताच व्यायाम नाहीं असें निदर्शनास येतें. म्हणून मुलांप्रमाणें मुलींनाहि विविध प्रकारचे खेळ, व्यायाम, कवाइती शिकवून जंबिये, तलवारी, सुऱ्या, अशीं हत्यारेंहि वापरण्याचें शिक्षण दिलें पाहिजे. मुलींना हें शिक्षण दिलें तरच त्या प्रौढपणीं प्रसंगविशेषीं त्याचा उपयोग करतील. मनुष्यत्वाचे हक्क, अब्रू, स्वाभिमान यांबद्दल स्त्रियांना नेहमी संशयास्पद स्थितींत राहावें लागतें. म्हणून बौद्धिक शिक्षणाबरोबर त्यांना शारीरशिक्षणहि दिलेंच पाहिजे. हिंदुसमाजाशेजारीं जे दुसरे समाज आहेत आणि जोंवर त्यांना दुसऱ्याची स्त्री भ्रष्ट करण्यामध्यें स्वर्ग मिळणार असें वाटत आहे, तोंवर कोणता प्रसंग केव्हां येईल याचा नेम

नाहीं. म्हणून स्त्रियांना नेहमी सशस्त्र ठेविलें पाहिजे. पुरुषवर्ग घरांत असतो अगर नसतो. कोणती आपत्ति कांहीं सांगून येत नाहीं. म्हणून त्यांना असहाय्य होण्याचा प्रसंग न यावा अशी खबरदारी हिंदुसमाजानें आतां घ्यावयासच पाहिजे. एवंच पुरुषांना सहाय्य करण्याकरितां स्त्रियाहि मर्द झाल्या पाहिजेत.

हिंदुसमाजांत शरीरबलाकरितां खेळ, काबाडकष्ट, कुस्ती, लाठीकाठी यांची आवड उत्पन्न केली पाहिजे, खेळांमुळें मनःप्रसाद व व्यायाम असा दुहेरी फायदा होतो. आट्यापाट्या, खोखो, हुतूतू या देशी खेळांप्रमाणें फुटबॉल व क्रिकेट हे विदेशी खेळही चांगले आहेत. पण ते खर्चाचे आहेत. आट्यापाट्यांच्या खेळांत व्यायामाशिवाय दुसऱ्याला चकवावें कसें हें चांगलें समजतें, तर हुतूतूमध्यें धडाडीनें घुसून प्रतिपक्षावर आक्रमण कसें करावें हेंहि कळतें. खोखोच्या खेळानें चापल्य येतें. क्रिकेटनें शिस्त हा गुण अंगीं येतो. खेळांमुळें शरिराच्या अवयवांची आडवी व उभी वाढ होऊन मनःप्रसन्नताहि मिळते. इंग्लंड हें खेळाडू राष्ट्र आहे असें म्हणतात, म्हणजे त्या राष्ट्रांतील सर्व स्त्रीपुरुषांना खेळाचा भारी नाद लागलेला आहे. दर आठवड्यास, दर महिन्यास प्रत्येक गांवीं खेळांच्या मोठ्या शर्यती तिकडे होतात, म्हणून इंग्लंडांतील लोक खेळाडूपणामुळें मोठे हौशी व उत्साही आहेत, असे समजले जातात व तसे ते आहेत. आपल्या समाजांत खेळाबद्दलच्या कल्पना अलीकडे बदलल्या आहेत, नाहींतर खेळल्याबद्दल मास्तर व आईबाप यांनीं पोरांना मरेमरेपर्यंत चोप दिल्याचींच उदाहरणें ऐकूं येत होतीं. खेळांप्रमाणें सर्व तऱ्हेचीं कामें करणें व पोहणें हाहि चांगला व्यायाम आहे. अलीकडे शिक्षणाच्या व श्रीमंतीच्या कल्पना भल-भलत्या झाल्यामुळें कामें करण्यांत सर्वांना कमीपणा वाटतो, पण ही वृत्ति सर्वस्वीं नष्ट केली पाहिजे. मनुष्य म्हटला कीं त्याला व्यवहारांतलें सर्व काम प्रसंगीं करितां आलेंच पाहिजे. पाणी भरणें, धोतर धुणें, ओझें उचलणें, घर सारवणें, माती वाहणें, शेतांत काम करणें, शौचकूप झाडणें, कुंदा खणणें, कापूसकाठ्या उपटणें, भांगलणें, जोंधळा उपटणें हीं व अशा तऱ्हेचीं कामें करण्याची सवय प्रत्येकाला पाहिजे. आपले लोक नेभळे व पोषाखी होऊं नयेत यास्तव ही दक्षता घेतलीच पाहिजे. कारण हल्लीं बाजारांत, स्टेशनवर किंवा प्रवासांत हमाल किंवा टांगेवाला न दिसला कीं, कित्येकांच्या अगदीं जिवावर प्रसंग येत असतो व एकादा तरुणहि " **सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति** " असें म्हणतो !

शरिरामध्यें काटकपणा, जयिष्णु वृत्ति हीं येण्याकरितां जोर, जोडी, बैठका, मल्लखांब, कुस्ती असले व्यायाम पाहिजेत. आपलें राष्ट्र प्राचीन काळापासून मल्लांचें आहे. मल्लविद्येचें बाळकडू लहानपणापासून सर्वांना मिळालें पाहिजे. श्रीमारुतिराय यांचें उदाहरण सोडून दिलें तरी सबंद भारतांत श्रीकृष्ण, कंस, बालिराम, दुर्योधन, दुःशासन, भीमसेन, जरासंध, इत्यादि सर्व भारतीय वीर मल्लविद्येमध्यें निष्णात दिसतात. मल्लविद्येचा लोप मुळींच झालेला नाहीं, याचें प्रत्यंतर **गामा व झिस्को** यांच्या सामन्यावरूनहि उघड होतें. ही विद्या आज आपल्यांत आहे. यास्तव तिचें पुनरुज्जीवन केलेंच पाहिजे. ठिकठिकाणीं तालमी व आखाडे उघडून गांवच्या सर्व तरुणांना जोर, जोडी, मल्लखांब व कुस्ती यांचें शिक्षण दिलें पाहिजे.

हिंदुस्थानाला स्वराज्य मिळवून तें रक्षण करवयाचें आहे व त्याकरितां क्षात्रवृत्तीची जरुरी आहे. सर्व राष्ट्रांत क्षात्रतेज चमकलें पाहिजे. इतर स्वतंत्र राष्ट्रांत सक्तीचें लष्करी शिक्षण दिलें जात आहे. तें जरी शक्य नसलें तरी येथें सक्तीचें शारीरिक शिक्षण दिलें पाहिजे. प्रत्येक आखाड्याला लाठी-काठीच्या वर्गाची जोड दिली पाहिजे. लाठीकाठीची किती जरुरी आहे, हें डॉक्टर मुंजे यांनीं आपल्या भाषणांत वेळोवेळीं सांगितलें आहे. ते म्हणतात कीं, " मुलगी देतांना मुलाला पहिल्यानें लाठीकाठी येते कीं नाहीं हें अगोदर पाहा, कारण जर एखादा लाठीवाला वटिंगण दारांत आला तर त्यापासून स्वस्त्रीचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य तरुणांमध्यें असावयास पाहिजे, लाठीकाठीचें शिक्षण देऊन ' शठंप्रति लाठ्यं व काठ्यं 'चा प्रयोगहि वेळोवेळीं अगदीं सव्याज झाला पाहिजे. इतर सर्व गोष्टींकडे जरा कानाडोळा करून लाठीकाठीच्या शिक्षणाकडे अधिक लक्ष्य आज तरी दिलेंच पाहिजे. बडोद्याचे प्रोफेसर माणिकराव यांचें 'सद्यः-स्थितींत स्वाभिमान व माणुसकी यांकरितां हाच व्यायाम केला पाहिजे, ' असें मत आहे. पुष्कळ मारामाऱ्यांमध्यें एखादाच लाठीबहाद्दर तरुण स्त्रीच्या व समाजाच्या अब्रूचें रक्षण करतो हेंहि अलीकडे शेंकडों वेळां ऐकण्यांत येतें.

गांवोगांवीं आज तालमी व आखाडे जितके निघतील तितक्यांची जरुरी आहे. दांडपट्टा, लाठी, काठी, कुस्ती, जंबिये यांचें शिक्षण आणि मर्दानी खेळांचे सामने ह्यांची अत्यंत आवश्यकता आहे. पंधरा वर्षांपासून वीस वर्षांपर्यंतच्या विद्यार्थ्यांना हें शिक्षण दररोज एक तास सक्तीनें दिलें पाहिजे व पालकांनीं आपल्या मुलांना तें घेण्यास भाग पाडलें पाहिजे. बाळपणीं पालकांची उपेक्षा

व आंधळी माया, प्रौढपणीं तरुणांचें औदासिन्य व गद्धेपंचविशीचा जोर, यांमुळें शरीरबलाची हीन स्थिति झाली आहे. शाळेंत शिक्षकांनीं, घरांत पालकांनीं, व इतरत्र सद्‌गृहस्थांनीं तरुण पिढीवर चांगलें लक्ष ठेवून ती मर्द व जोरदार होईल अशी तरतूद केली पाहिजे. प्रत्येक हिंदूनें मुलगा व्यायाम करतो कीं नाहीं, तालमींत जातो कीं नाहीं, मर्दपणाचे खेळ खेळतो कीं नाहीं हें अवश्य पाहिलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर घरीं दररोज निदान साठ तरी साष्टांग नमस्कार श्रीसूर्यनारायणास § घालवून घेतलेच पाहिजेत. नमस्कार हा एक घरगुती उत्कृष्ट व्यायाम आहे. तो करण्याचा प्रत्येक हिंदूला अधिकार आहे. कारण सूर्य हें सर्व हिंदूंचें निर्विवाद दैवत आहे. कोणताहि उपाय करून कोणत्याहि साधनानें तरुण पिढीचें बल वाढविलें पाहिजे. अनेक प्रकारचीं कष्टाचीं कामें, अनेक प्रकारचे शारीरिक सामने, विविध संस्था, अनेक स्वयंसेवकदलें, कवायितीच्या पलटणी, सेवासमित्या स्थापून व उभारून हिंदुसमाज-विशेषतः भावी पिढी-जितकी सकस व जोरदार करतां येईल तितकी केली पाहिजे. व्यायामाला मोठ्या खुराकाची, किंवा मांसभक्षणाची जरूर आहे असें मात्र नाहीं. हिंदु लोक जीं तृणधान्यें, जीं द्विदल धान्यें खातात, ज्या फळभाज्या व ज्या पालेभाज्या वापरतात, जे दूध, तूप, दहीं यासारखे पदार्थ खातात त्यांमध्यें पुष्कळ पौष्टिक भाग आहे. यास्तव मांसाहाराची जोरकसपणास आवश्यकताच आहे असें म्हणतां येत नाहीं. क्रूरपणा येण्याकरितां मांसाहाराची जरूर आहे. म्हणून ज्या हिंदु जातीं-मध्यें मांसाहाराचा प्रचार आहे त्यांनीं तो अवश्य करावा.

समाज म्हटला कीं त्याचीं अंगें दोन असतात. स्त्रिया व पुरुष या दोहोंचा समाज बनतो. पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि शरिरानें व मनानें समर्थ झाल्या तर समाजाची प्रगति हां हां म्हणतां होते. स्त्री व पुरुष या दोन घटकांचा संबंध विवाह-संस्थेमुळें दृढ होतो, यास्तव विवाहसंस्था व स्त्रीवर्ग यांचा विचार पुढील दोन प्रकरणांत करितों.

---

§ श्रीमंत औंधकरांसारखे संस्थानिक नमस्काराचा प्रचार करितात हें अत्यंत अभिनंदनीय व अनुकरणीय आहे.

# प्रकरण दुसरें

## समाजबलविचार

### विवाहाविषयीं चार शब्द

हिंदुसमाजाच्या सामाजिक बलाचा विचार करितांना विवाहाकडेहि पाहावें लागतें. विवाहाचा व शरीरबलाचा बराच संबंध आहे. समाजाच्या भूषणभूत जीवनाला वळ्याकट्या सुप्रजेची व कौटुंबिक सुखाची अत्यंत आवश्यकता आहे. यास्तव विवाहाविषयीं थोडा विचार करूं.

हिंदुसमाजांत विवाहसंस्था फार पवित्र गणली आहे. ही संस्था धर्म, अर्थ व काम साध्य करून देणारी आहे. गृहाचा पाया गृहिणी, कुटुंबाचा पाया गृह व समाजाचा पाया कुटुंब अशी परंपरा आहे. गृह, कुटुंब आणि समाज यांच्या धारणपोषणाला जी संस्था कारणीभूत होते व झाली आहे तिची थोरवी किती वर्णन करावी ? विवाह हा एक करार आहे किंवा तो स्त्रीपुरुषांचा वैषयिक संबंध आहे अशा पाश्चात्यांच्या कल्पना पूर्वी होत्या. परंतु अलीकडील समाजशास्त्रज्ञ विवाह हें सामाजिक स्वास्थ्याचें आद्य साधन आहे असें म्हणूं लागले आहेत. ज्या समाजांत विवाहाचे निर्बंध नाहींत तेथें स्वास्थ्य व समाधान हीं दुर्मीळ असतात. अतएव समाजस्वास्थ्यास विवाह अवश्य आहे.

जगांतील कोणत्याहि समाजाप्रमाणें हिंदुसमाजाच्या बाल्यावस्थेंतहि विवाह-संस्था नव्हती. स्त्रीपुरुष यथेच्छ स्वैर विषयसेवन करीत असत, हें भारतांतील श्वेतकेतूच्या गोष्टीवरून उघड दिसतें. विवाहसंस्था नसणें, पैशाचपद्धतीनें संभोग घेणें, राक्षसी वृत्तीनें कन्याहरण करणें, या सर्व पायऱ्या ओलांडून आसुर, गांधर्व पद्धति पाहून सांप्रतचा ब्राह्मविवाह उत्पन्न झाला आहे. स्मृतिग्रंथांतील अष्टविवाह म्हणजे समाजाच्या इतिहासाचीं आठ युगें होत. हिंदुसमाजानें हीं वैवाहिक आठ युगें पाहिलीं आहेत आणि विविध प्रयोगांतून वर येतां येतां ब्राह्मविवाहाच्या मेहमण्याजवळ तो थांबला आहे. समाजबलवृध्यर्थ हीच विवाहपद्धति सर्वस्वीं अवलंबिणें अत्यंत उचित आणि श्रेयस्कर आहे. विवाहाचे राक्षस, पैशाच, आसुरादि प्रकार हल्लीं समाजांत रूढ नाहींत. तथापि बालविवाह, प्रौढविवाह, विधवाविवाह, विधुरविवाह, जरठविवाह इतके प्रकार समाजांत सांप्रत चालू आहेत. समाजबलाच्या दृष्टीनें या प्रकारांतील मुख्य अंगांचा, उपांगांचा व तत्संबद्ध विषयांचाहि विचार केला पाहिजे.

हिंदुसमाजांत बव्हंशीं बालविवाहच अधिक होतात. हिंदुसमाज अडाणी, रूढीला चिकटणारा, देशकालाचा विचार न करणारा असा असल्यामुळें " अष्टवर्षा भवेत् कन्या " या वाक्यानुसारीच तो चालत आहे. एकाद्या स्मृतींत " अष्टवर्षा भवेत् कन्या " असें वाक्य एका काळीं आढळलें कीं, सर्व काळीं तेंच प्रमाण मानून चालावें अशी हिंदुसमाजाची कल्पना पंडितांनीं केली आहे. त्याचा परिणाम असा होत आहे कीं, आठ वर्षांची सुद्धां वाट न पाहातां तिसऱ्या चौथ्या वर्षींहि मुलींचीं लग्नें लावण्यांत येतात. नेमाडांतील ब्राह्मणवर्गामध्यें तीन चार वर्षांच्या मुली व ५।६ वर्षांचीं मुलें यांचीं लग्नें होतात. या लग्नांचे वाग्निश्चय त्याच्याहि पूर्वी झालेले असतात. आरोग्यशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र, आणि आईबापांचीं कर्तव्यें या सर्व दृष्टींनीं हीं बाहुलाबाहुलींचीं लग्नें सर्वस्वीं त्याज्य नाहींत काय ? ज्या वयांत ज्या जबाबदारीची कल्पना नाहीं, जगाची माहिती नाहीं, फार काय पण स्त्रीपुरुष-स्वभावाचेंहि ज्ञान नाहीं, त्या वयांत मुलाच्या गळ्यांत बायको व मुलीच्या गळ्यांत नवरा बांधणें किती हास्यास्पद आहे ?

मुलींचीं लग्नें प्रौढ वयांत करणें एवढेंच आईबापांचें कर्तव्य नाहीं. मुलींच्या बाबतींत तर त्यांची जबाबदारी मुलांपेक्षां अधिक आहे. मुलगी ही दुसऱ्याची, दुसऱ्या कुळांत जाणारी, दुसऱ्याचें घर उभारणारी, माता होऊन सुप्रजा निर्माण करणारी अशी एक ब्रह्मदेवानें दिलेली दुसऱ्याची ठेव आहे, हें आईबापांनीं ध्यानांत वागविलें पाहिजे. ही जाणीव हजारांत एकाद्या तरी आईबापाला असते कीं नाहीं याची वानवा आहे. मुलीची मनःस्थिति, तिची संस्कृति, तिचें आरोग्य, तिचें गृहशिक्षण यांकडे आईबापांनीं मुलापेक्षां जास्त, निदान मुलाइतकी तरी काळजी घेतली पाहिजे. गृहस्थाश्रमाचें मूळ गृहिणी आहे. ती कौटुंबिक सुखाची भूमिका आहे. यास्तव शरिरानें दणकट व मनानें सुसंस्कृत झालेल्या प्रौढ मुलीचा विवाह करणें हा खराखुरा गृहस्थधर्म होय.

विवाहकालीं वधूचें वय १४ ते १८ किंवा फार तर २० इतकें असल्यास हरकत नाहीं. रजोदर्शन झाल्यानंतर निदान तीन वर्षांचे आंत मुलीचा विवाह करावा. तो न झाल्यास मुलीनें स्वयंवर करावें असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. रजोदर्शनोत्तर तीन वर्षें म्हणजे कोठें १६, कोठें १८ असें वयोमान पडेल. वाग्-भटामध्यें " पूर्णषोडशवर्षा स्त्री पूर्णविंशेन संगता " असें म्हटलें आहे. गृह्य-सूत्रामध्यें सांगितलेलें चतुर्थीकर्म, मनुस्मृतींत सांगितलेलें स्वयंवर आणि अशींच

प्रौढविवाहदर्शक वाक्यें पाहिलीं तर १६ ते २० वर्षें हीच वधूच्या विवाहाची किमान आणि कमाल मर्यादा ठरते. परिस्थितीप्रमाणें या वयापर्यंत मुलीचें माध्यमिक शिक्षणहि संपण्यास हरकत नाहीं. एखाद्या हुषार मुलीचें वीस वर्षांपर्यंत उच्च शिक्षणहि पूर्ण होईल व आईच्या हाताखालीं वागून गृहकृत्यांमध्यें विविध कामें करून व्यवहारचातुर्यहि संपादन करतां येईल. गृहकृत्यांत कुशल, मनानें सुसंस्कृत, आणि प्रकृतीनें धडधाकट अशी गृहिणी कुटुंबाला सुखदायी होईल. जुन्या समजुतींच्या लोकांना प्रौढविवाह शास्त्रसंमत नाहीं असें वाटतें. त्याकरितां कांहीं वचनें उदाहृत करितों व त्यांचा भावार्थहि सांगतों.

### प्रौढविवाहाला अनुकूल वचनें

काममामरणात्तिष्ठेत् गृहे कन्यर्तुमत्यपि । मनु अ. ९.
न चैवेनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ॥ ८९ ॥
त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्युतुमती सती ।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विंदेत सदृशं पतिम् ॥ ९० ॥
अदीयमाना भर्तारमधिगच्छेद्यदि स्वयम् ।
नैनः किंचिदवाप्नोति न चायं साधिगच्छति ॥ ९१ ॥
त्रीणि वर्षाण्यृतुमती कांक्षेत पितृशासनम् ।
ततश्चतुर्थे वर्षे तु विंदेत सदृशं पतिम् ॥१५॥ बोधायन.

### गृह्यसूत्रें

त्रिरात्रमुभयोरधः शय्या ब्रह्मचर्यं क्षारलवणवर्जनं च ॥ ८ ॥
तयोः शय्यामंतरेण दंडो गंधलिप्तो वाससा सूत्रेण वा
परिवीतस्तिष्ठति ॥ ९ ॥ आपस्तंब खंड ८.
त्रिरात्रं क्षारलवणे दुग्धमिति वर्जयातौ सहशय्यानौ
ब्रह्मचारिणौ ॥ ९ ॥ खादिर १।४
त्रिरात्रमक्षारालवणाशिनौ स्यातामधः शयीयाताम्
संवत्सरं न मिथुनमुपेयाताम् द्वादशरात्रं,
षड्रात्रं त्रिरात्रमंततः ॥ २१ ॥ पारस्कर १।८
त्रिरात्रमक्षारालवणाशिनौ ब्रह्मचारिणावधः संवेशिनावसंवर्तमानौ
सहशयातामूर्ध्वं त्रिरात्रात्संभवो निशायाः ॥ जैमिनी १।२२

मनु-अ. ९:-कन्या रजोदर्शनयुक्त असली तरी तिनें खुशाल मरेपर्यंत घरीं रहावें, परंतु केव्हांहि गुणहीन ( मूर्ख, अविद्वान् ) पुरुषाला तिचें दान करूं नये ( ८९ ). ऋतुमती झाली असतां कुमारीनें तीन वर्षेंपर्यंत आईबापांकडून योग्य वर मिळण्याची वाट पहावी. त्यानंतर तिनें स्वत:ला योग्य असा पति करावा ( ९० ). बापाच्या अभावीं कन्येचें दुसऱ्या कोणीं पालकानें दान न केल्यास जर तिनें स्वतः पतीला वरिलें तर तिला व ती ज्याला वरील त्याला कोणतेंहि पाप लागत नाहीं ( ९१ ) बोधायन-ऋतुमती कन्येनें तीन वर्षेंपर्यंत पित्याच्या आज्ञेची ( स्वयंवर करण्याची ) वाट पाहावी. तदनंतर चवथ्या वर्षी कन्येनें स्वत:शीं समान अशा पतीला पसंत करून वरावें. गृह्यसूत्रें-आपस्तंब. खंड ८. तीन दिवस (रात्रीं) पर्यंत वरवधूंनीं सहशयन करावें, ब्रह्मचर्य धारण करावें, व खारट पदार्थ व मीठ वर्ज करावें. या उभयतां वधूवरांच्या शय्यांमध्यें चंदनलिप्त दंड ठेवावा. तो दंड वस्त्रानें किंवा सुतानें गुंडाळिलेला असावा. [ ९ ] खादीर १-४. तीन दिवस खारट पदार्थ, मीठ, दूध वर्ज्य करून वधूवरांनीं ब्रह्मचारी राहून एकत्र शयन करावें [ ९ ]. पारस्कर १-८. तीन रात्रींपर्यंत क्षारयुक्त पदार्थ व मीठ सेवन न करितां वधूवरांनीं असावें, जमिनीवर निजावें, एक वर्ष उभयतांनीं संबंध करूं नये. निदान बारा, सहा अगर तीन रात्री तरी संबंध न करावा. [ ब्रह्मचारी रहावें ]-२१. जैमिनी १-२२. तीन रात्रींपर्यंत क्षारयुक्त पदार्थ व मीठ यांचें सेवन न करतां वधूवरांनीं ब्रह्मचर्य धारण करून अधोभागीं [ उच्चासनावर नव्हे ] भूमीवर शयन करावें. एकमेकांकडे आपलें अंग न वळवितां सहशयन करावें. तीन रात्री लोटल्यानंतर चौथ्या रात्रीं संबंध करावा. या शास्त्रवचनांवरून प्रौढविवाह शास्त्रसंमत आहे हें सामान्य मनुष्याच्याहि लक्ष्यांत येईल.

पारस्कर, खादिर सूत्रांप्रमाणें, सांख्यायन, मानव, द्राह्यायण व वाराह सूत्रांमध्यें विवाहानंतर चतुर्थीकर्म या नांवाचा एक संस्कार सांगितलेला आहे. हा संस्कार विवाहानंतर चौथ्या रात्रीं करावयाचा असतो. ह्या संस्कारांत वधूवरांचा संयोग स्पष्ट सांगितला आहे. कित्येक सूत्रांत चतुर्थीकर्म व गर्भाधान ह्यांचा एकरूपानें विचार केला आहे. तर कांहीं सूत्रांत गर्भाधान हा संस्कार नसून चतुर्थीकर्मामध्येंच त्याचा अंतर्भाव केलेला आहे. भट्टगोपिनाथ दीक्षितकृत 'संस्काररत्नमाला ' नामक ग्रंथामध्यें ( आनंदाश्रम पा. ५८४ ) विवाहांतर्गत चतुर्थीकर्म

सांगितलें आहे. त्यांत योनिस्पर्श, संगम, पर्यालिंगन, मुखचुंबन इत्यादि कृत्यें असून गर्भाधानाच्या प्रयोगांतीलच मंत्र ( पृ. ६९४ ) दिलेले आहेत व शेवटीं इदमुपगमनं आवश्यकं ' हा संयोग आवश्यक ( स्त्रीसंस्कारत्वात् ) असें म्हटलें आहे. मुलगी जर बाला आठ वर्षांची असेल तर सूत्रांतील हा विधि अप्रयोजक-पणाचा नाहीं काय? हा विधि जर शास्त्रोक्त आहे तर बालविवाहाचें समर्थन म्हणजे आग्रह नव्हे काय?

निरनिराळ्या स्मृतींमध्यें विवाहाविषयीं भिन्नभिन्न वचनें आहेत, त्यांचा समन्वय पराशरमाधव, स्मृतिचंद्रिका, वीरमित्रोदयादि निबंधकारांनीं मोठ्या मार्मिकपणें केला आहे. सात वर्षांनंतर विवाह करावा असें जसें वाक्य आहे तसेंच यमस्मृतीमध्यें 'तस्माद्विवाहयेत्कन्यां यावन्नर्तुमती भवेत्' असें वाक्य आहे. म्हणजे ऋतुप्राप्तीपर्यंत व पुढें तीन वर्षें एवढा काल विवाहाला प्रशस्तच सांगितला आहे. संवर्तस्मृतींमध्यें १२ व्या वर्षी, कालनिर्णयदीपिकेंत बारा, चौदा व सोळाव्या वर्षी, महाभारतांत सोळाव्या वर्षी व पद्मपुराणांत २० व्या वर्षी स्त्रियांना ऋतु-दर्शन होतें असें म्हटलें आहे. त्यावरून शास्त्रांत बालविवाहाप्रमाणें प्रौढविवाहहि प्रशस्त मानला आहे.

हिंदुसमाजांतील वरच्या थरांत व पांढरपेशा जातींमध्यें प्रौढविवाह सांप्रत चालूच आहे. इतर समाजांमध्यें हा प्रौढविवाह यावा म्हणून कायद्याची उणीव होती ती शारदा कायद्यानें दूर झाली. सांप्रत हिंदुसमाजांत जे शेंकडा ५० बाल-विवाह होतात ते यापुढें बंद होतील. आठदहा वर्षांची मुलगी व पंचवीस तीस वर्षांचा नवरा असले विषम विवाह हिंदुसमाजांतील खालच्या थरांत फार होतात. त्याचा परिणाम असा होतो कीं, नवऱ्याचें तारुण्य असेपर्यंत ती वयांत येत नाहीं व बायको वयांत येते तों नवऱ्याचें तारुण्य उतरणीस लागतें. बालवयस्क बायको-वर अकालीं जुलूम होतो व तो तिला असह्य वाटला कीं, ती माहेरीं पळून जाते व नवऱ्याकडे नांदण्यास येऊं इच्छित नाहीं. असे खटके पांच चार वेळां झाले म्हणजे वर्तमानपत्रांतून नोटिसा येऊं लागतात व कुटुंब आणि गृहसौख्याची राखरांगोळी होते. यदाकदाचित् असले विषम विवाह सुखकर झाले तर संततीवर त्यांचा इष्ट परिणाम होत नाहीं. रा. सा. हरविलास शारदा यांच्या बिलानें हा दुष्परिणाम टळणार आहे. परंतु त्या कायद्यांत जे दोष राहिले आहेत ते नसते, तर सोन्यापेक्षां पिवळें झालें असतें.

मुलगी मोठी झाली आणि आईबाप जर जुन्या समजुतीचे असले तर त्या मुलीला व आईबापांना अतिशय त्रास होतो. खेडवळ व अडाणी आईबाप असले म्हणजे मुलीला रजोदर्शन झालें कीं, जीव नको असा होतो. रजोदर्शन हा निसर्गधर्म आहे, म्हणून त्याकरितां जिवाला कंटाळण्याचें किंवा मुलीचें मीठ तोडण्याचें आणि विटाळ कालविण्याचें कांहीं कारण नाहीं. मुलगी विटाळशी झाली कीं चार दिवस विटाळ पाळावा आणि पूर्ववत् पुढें व्यवहार सुरू ठेवावा. दिवसानुदिवस दारिद्र्य वाढत आहे, आर्थिक आपत्ति वृद्धिंगत होत आहे, एकत्र कुटुंबें नष्ट होत आहेत आणि कांहीं मिळविण्याची पात्रता आल्यावांचून लग्नें करण्याची इच्छाच जेथें तरुण दर्शवीत नाहींत तेथें लहान वयांत मुलींचीं लग्नें होणार कशीं ? अगदीं धर्ममार्तंड बाप असला, तर नवराच जेथें पंचवीस वर्षांचे आंतील मिळत नाहीं, तेथें हा काय करणार ? वधूच्या वयाप्रमाणें वराचेंहि वय विवाहकालीं २४ ते २८ पर्यंत असावें. त्यापेक्षां वराचें वय अधिक असणें हें अनेक दृष्टींनीं श्रेयस्कर नाहीं. लग्न करावयाचेंच नसेल तर गोष्ट निराळी. पण लग्न कर्तव्य असल्यास तें चोवीस आणि तीस वर्षें वयाच्या दरम्यान झालें पाहिजे. वधूवरांमध्यें अंतर कमींत कमी ५ व जास्तींत जास्ती १० इतकेंच असावें. समाजांत असे सम विवाह झाले तरच प्रजा चांगली होते व आईबापांना संततीपासून सुख होतें. विषम विवाह होऊं लागले, तर आईबाप मुलांचे शत्रू व मुलें आईबापांचे शत्रू असा संबंध घरोघरीं दिसतो. ज्या तरुणांना गृहस्थाश्रमाची जबाबदारी पत्करावयाची असेल किंवा ज्या तरुणींना गृहिणी व माता व्हावयाचें असेल, त्यांनीं या वयोमर्यादा उल्लंघूं नयेत. समाजबलाला सम विवाहाची जितकी मदत होते तितकी विषम विवाहाची होत नाहीं.

समाजबलाच्या दृष्टीनें जसा बालविवाह त्याज्य आहे तसा फाजील प्रौढविवाहहि त्याज्य आहे. रजोदर्शनोत्तर तीन वर्षांच्या आंत मुलीचें लग्न व्हावें आणि फार तर अठ्ठावीस वर्षांपर्यंत मुलाचें लग्न व्हावें हा सामान्य नियम म्हणून चालण्यास हरकत नाहीं. कोणत्याहि नियमाला अपवाद असणारच. प्रौढ विवाहाचा काळ अतिक्रांत होऊं लागला तर त्यामुळें कौटुंबिक सुखाचें मातेरें होईल. हिंदुसमाजांत जें आज कौटुंबिक स्वास्थ्य दिसत आहे तें नाहींसें झालें तर समाजाची हानी होणार आहे. पाश्चात्य देशांत विवाहकालाचें नियमन न उरल्यामुळें कौटुंबिक सुखाची माती होऊं लागली आहे. हिंदुस्थानांत अगदीं गरीब हिंदु जे

कौटुंबिक सुख अनुभवितो तें तिकडील श्रीमंतीलाहि दुर्लभ होऊं लागलें आहे. कांहीं समाज बायकांच्या उच्छृंखलपणानें गांजले जाऊन Women have made us fools असे उद्गार काढीत आहेत. फाजील प्रौढविवाहाचे जे दुष्परिणाम इतर समाजांत दिसतात ते टाळून हिंदुसमाजांत प्रौढ विवाहाचा प्रचार झाला पाहिजे. घटस्फोट, काडीमोड, नवऱ्यावर बायकांनीं केलेले दावे यांचा इतर देशांत सुकाळ आहे. हिंदुसमाजांतील वरच्या थरांत अद्याप या अनिष्ट गोष्टी दिसत नाहीत. खालच्या थरांत असल्या तरी त्या अज्ञानजन्य आहेत. खालचे थर वरच्या थरांचें अनुकरण करण्यांत आज गुंतलेले आहेत. ह्मणून समाजाच्या भावी राष्ट्रिय जीवनाला पोषक अशाच चालीरीति समाजांतील वरच्या थरांनीं स्वीकारल्या पाहिजेत. कौटुंबिक सुख, स्वास्थ्य, समाधान हीं तर जाणार नाहींत व बालविवाहजन्य दोष राहणार नाहींत, अशा कौशल्यानें प्रौढविवाह समाजांत चालू केले पाहिजेत.

वधूवरपरीक्षेसंबंधानें एकदोन सूचना अवश्य केल्या पाहिजेत. वधूपरीक्षेविषयीं हल्लीं नसती चिकित्सा उत्पन्न झालेली आहे व ती अत्यंत त्रासदायक आहे. वरपरीक्षा मात्र जातां जातां आकाशांतील उडणाऱ्या पक्ष्याकडे पाहाण्याइतपत होत आहे. या दोन्ही पद्धति सदोष आहेत. पूर्वी वराला पाहण्याकरितां त्यांच्या घरीं जात, पोक्त मनुष्य एक दोन दिवस तेथें राही. मुलगा खातो कसा, वागतो कसा, कपडे काढल्यावर दिसतो कसा, कोणाच्या संगतींत असतो, त्याचे स्वैरालाप काय निघतात, एकंदरींत योजावयाचा वर आपल्या कुटुंबाशीं समानशील निघेल कीं नाहीं, आपल्या योग्यतेस साजेल अशी ही सोयरिक होईल किंवा नाहीं हें तो पाहात असे. वरपरीक्षा अशा पद्धतीनें खरोखरी आजसुद्धां व्हावयास नको काय ? या पद्धतीचा प्रचार समाजांतील नेत्यांनीं केला पाहिजे. वराप्रमाणें वधूची परीक्षाहि पूर्वी चांगली करीत. हल्लीं मुली सांगून आल्या पाहिजेत अशी समजूत आहे. परंतु 'स्त्रीरत्नं दुष्कुलादपि' या न्यायानें मुलीची मागणी करीत. मुलीला मागणी घालणें हेंच खरोखरी योग्य आहे. मुलगी सून होऊन आपल्या घरांत यावयाची असते, ती घर चालविणारी गृहलक्ष्मी होऊन वावरावयाची असते, म्हणून अशी सुकन्या चांगली आढळली कीं, तिला मागणी घालणें यांत कांहीं वावगें नाहीं. स्नातकानें विद्या पुरी झाल्यावर वधूची याचना करावी, असा पूर्वीचा परिपाठ होता. हल्लीं परस्पर स्नेह्यांमध्यें या मागणीच्या संकोचामुळें विवाह

होतच नाहींत. मागणीच्या अभावामुळें पोटजातींत झटपट लग्नें होत नाहींत व एकीकरणहि लांबतें. मागणी करण्यामध्यें कमीपणा आहे या समजुतीमुळें सांगून आलेल्या चार दोन मुलींत जी बरी दिसेल ती पत्करण्याचा प्रसंग येतो ! शिवाय सांप्रत जी वधूपरीक्षा होते तीहि इतकी चमत्कारिक व हिडिस असते कीं, प्रत्येक मुलीच्या बापाला मुलीला जन्म दिल्याबद्दल त्या वेळीं पश्चात्तापच होतो ! मुलीला जर पहावयाचें असेल, तर एखाद्या पोक्त बाईला मुलीच्या माहेरीं दोन दिवस पाठवावें. तेथें एकदोन दिवसांत स्वभाव व वागणूक यांची जशी परीक्षा होते तशी परीक्षकाप्रमाणें कांहींतरी प्रश्न विचारिल्यानें होत नाहीं. मुलगी अवयवानें सुदृढ, स्वभावानें सुशील व घरच्या चालीरीतीनें कुलीन आहे कीं नाहीं, हें मुख्य बारकाईनें पहावें व पसंत करावी.

विवाह हा एक पवित्र धार्मिक विधि आहे ही गोष्ट हिंदुसमाजाच्या ध्यानीं-मनीं नाहीं. त्या पवित्र संस्काराला लौकिक समारंभाचें स्वरूप आलें आहे आणि त्या पायीं लाखों रुपयांचा चुराडा होत आहे. कांहीं जातींत हुंड्याच्या पैशामुळें मुलीचा बाप कर्जबाजारी होतो, तर कांहीं जातींत मुलीच्या बापाला सपाटून पैसा द्यावा लागल्यामुळें मुलाचा बाप व पुढें तो स्वतः नवरा कफल्लक होतो. यामुळें लग्न हा सुखाचा विषय न होतां ती एक आपत्तीच वाटूं लागली आहे. गरीब आईबापांना हुंडा देण्याची शक्ति नसते. हुंड्याशिवाय लग्न तर होत नाहीं, म्हणून मुलींनीं जीव दिल्याचीं उदाहरणेंहि घडत आहेत. विवाहसंस्कारांत हुंडा, खर्च, मानापमान, व्याहीविहिणींचे रुसवे हें सर्व पाहिलें कीं, हिंदुसमाजाच्या हिडिस मनोवृत्तीची घाण येऊं लागते. लग्नांतील हे सर्व निरर्थक आणि निष्कारण खर्च बंद करून केवळ शुद्ध व शास्त्रोक्त विधि करून विवाह लाविला पाहिजे. विवाहांत कांहींचा पैसा दारू उडविण्यांत जातो, तर कांहीं अडाणी जातींत तो पैसा दारू पाजण्यांत जातो. कांहीं श्रीमंतांचा पैसा बेंडबाजा, मिरवणुकी, रोषणाई, मंडप यांत जातो, तर कांहींचा पैसा नाच व गाणीं यांकडे जातो. हा सर्व खर्च म्हणजे शास्त्रोक्त विवाहविधीची खरोखर थट्टा आहे. शास्त्रोक्त विवाहविधीला फार थोडा पैसा पुरतो. ज्या माणसांना पक्वान्नाची ओकारी आली आहे त्यांना मेजवान्या देण्यांत, ज्यांना सुखसोहळ्याचा वीट आलेला आहे त्यांची मिजास राखण्यांत जो पैसा खर्च होतो, तो सर्व हिंदुसमाजाला उपयुक्त अशाच कार्याकडे खर्च केला पाहिजे. विवाहसंस्कारांतील मुख्य मुख्य मंत्र सार्थ समजून द्यावेत व योग्य

समजुतीनें वधूवरांनीं शपथा घ्याव्या. ब्राह्मणांमध्यें सुद्धां संस्कारांतील मुख्य शास्त्रीय भागाकडे अक्षम्य दुर्लक्ष्य होत आहे, मग इतरांचें सांगावयासच नको.

समाजबलाचा विचार करितांना विवाहामध्यें जशी सुधारणा व्हावयास पाहिजे, त्याचप्रमाणें विधवाविवाहाचा प्रश्न सोडवून व पुनर्विवाह न करणाऱ्या विधवांना त्यांच्या मनःप्रवृत्तींस साजेसें काम देऊन विधवांचा दर्जा समाजानें वाढविला पाहिजे. हिंदुसमाजांत विधवांची संख्या बरीच आहे त्यांत वरच्या वर्गांतील विधवांची स्थिति फारच शोचनीय आहे. विधवांच्या दुःखाची जाणीव हिंदुसमाजाला नाहीं, म्हणून तो विधवांशीं अनुकंपेनें न वागतां अत्यंत अनुदारपणें वागतो. मनुष्याला अन्न, अपत्य व आप्त हीं पाहिजेत. पोटाला अन्न, प्रेमाला अपत्य व अंतःकरण उघडें करण्याकरितां आप्तेष्ट लागत असतात. या नियमाला विधवा कशा अपवाद होतील ? कां वैधव्य येतांच त्यांचे निसर्गसिद्ध विकार जाऊं शकतात ? तरुण विधवांचे तर सर्व विकार जोरां-तच असतात. त्या विधवांवर जुलमानें वैराग्य लादल्यास त्याचा दुरुपयोग होतो. म्हणून त्यांच्या विवाहाचा विचार केला पाहिजे. कांहीं वरच्या जाती सोडून दिल्यास इतर जातींमध्यें पाटाची किंवा गंधर्वाची चाल आहे. ही पुनर्विवाहाची चाल सर्व जातींमध्यें विशिष्ट परिस्थितींत, विशिष्ट मर्यादेपर्यंत रूढ होणें अत्या-वश्य आहे. तरुणांचे अकालीं मृत्यु, दारिद्र्य व इतर कारणें यांमुळें विधवांची संख्या वाढत आहे. शिवाय एकत्रकुटुंबपद्धतीचा अभाव, वाढतें दारिद्र्य, समा-जाचें पालटलेलें स्वरूप व विधर्मीयांचीं आक्रमणें यांमुळें या विधवांचा प्रश्न फारच नाजूक झालेला आहे. हिंदुसमाजांत कांहीं एका कारणानें व एका विशिष्ट कल्पनेप्रमाणें पुनर्विवाह हा कमी किंमतीचा व तिरस्करणीय असा विषय जरी गणला गेला असला, तथापि आज त्याचें तें स्वरूप राहणें शक्य नाहीं व इष्ट नाहीं. चाळीस वर्षांवरील विधवांचा विचार हिंदुसमाजानें न केला तरी चालेल. परंतु ज्या अल्पवयी, तरुण आणि असहाय्य अबला विधवा जेथें जेथें आहेत तेथें तेथें त्यांचा विचार केलाच पाहिजे. कल्पना यावी म्हणून कांहीं आंकडे देतों.

### हिंदुसमाजांतील विधवा

| | | | |
|---|---|---|---|
| १ ते ५ वर्षें | ११,८९२ | १ ते १० वर्षें | ८५,०३७ |
| ५ ते १५ ,, | २,३२,१४७ | १५ ते २० ,, | ३,९६,९७२ |
| २० ते २५ ,, | ७,४२,८२० | २५ ते ३० ,, | ११,६३,७२० |
| ३० ते ३५ ,, | १८,१८,३६३ | ३५ ते ४० ,, | १६,९६,७०६ |

या सर्व विधवांचा विचार हिंदुसमाज सहानुभूतीनें करतो काय? विधवा ही फक्त पोटगीची मालकीण, तिला कसलाहि अधिकार नाहीं व हक्क नाहीं हें जरी खरें असलें तथापि पोटगीची तरी व्यवस्था मानानें व्हावयास नको काय? बरें, पोटाबरोबर निसर्गविकारांचाहि विचार झालाच पाहिजे. दीर, भाऊ, सासरा, कुणीही झाला तरी त्याची दृष्टी विधवेजवळचें असेल नसेल तें लुबाडण्याची! त्यांत अपत्य नसलें, आप्त नसले म्हणजे विधवांना आकाश कोसळल्यासारखें वाटतें व त्या बिचाऱ्या बुवा, बैरागी, गोसावी, साधु यांच्या नादीं लागतात. अर्थात् हे लुच्चे लोक त्यांच्या जवळचा पैसा लुबाडून शेवटीं त्यांची अत्यंत केविलवाणी स्थिति करितात. विधवा जेव्हां यात्रा, जत्रा, तीर्थ व देवदेव करीत हिंडतात, तेव्हां त्यांच्यावरहि अनेक प्रकारचे दुर्धर प्रसंग मुसलमान गुंड व तीर्थस्थ पंडे यांचेकडून गुजरतात. काशीक्षेत्र, पंढरीक्षेत्र, कुंभमेळा, ग्रहणपर्वणी इत्यादि स्थळीं व प्रसंगीं हिंदु विधवांना पळविण्याकरितांच इतरधर्मीय गुंड तेथें येत असतात, हें सत्य आर्यसमाजाच्या कार्यकर्त्यांनीं व इतरांनीं आतां उजेडांत आणलें आहे. भुसावळ, नागपूर, मुंबई, प्रयाग अशा मोठमोठ्या स्टेशनांवरील रात्र-पाळींच्या तिकिट मास्तरांकडे व इतर हिंदु सहृदय अधिकाऱ्यांकडे जरा चौकशी केल्यास अंगावर शहारे येण्याजोगे प्रकार ऐकूं येतात. त्यांत विशेष गोष्ट ही कीं, हिंदूंतील कोणत्याहि जातींच्या विधवेवर मुसलमान गुंडाची दृष्टि विशेष असते! कारण हिंदु विधवेकडे कोणताहि हिंदु मनुष्य इतका धिटाईनें पाहूं शकत नाहीं. त्याला जाती समाज व इष्टमित्र यांचें थोडें तरी भय असतें. परंतु मुसलमान गुंडाला अशा प्रकारचें भय तर नाहींच, परंतु अशा कृत्यांमुळें गौरव होण्याचा प्रसंग असल्यामुळें तो वरच्या वर्गातील कसलीहि हिंदु विधवा घरीं आणून ठेवण्यास मुळींच भीत नाहीं. गेल्या पांच सहा वर्षांत अशा प्रकारच्या आक्रमणाचीं किती तरी कृत्यें घडलेलीं आहेत. ज्या धर्ममार्तंडाला विधवाविवाह म्हटलें कीं, नाकाला पदर लावावासा वाटतो त्यानें कृपा करून मुंबईचें **श्रद्धानंद रेस्क्यू होम** पाहावें. तेथें आजपर्यंत सुमारें ७५ स्त्रिया येऊन गेल्या व कांहीं राहिल्याहि आहेत. या स्त्रियांचे इतिहास वाचले म्हणजे स्वधर्मीयांच्या भल्या बुऱ्या व्यवहाराचें खडान् खडा ज्ञान होतें व परक्यांच्या विधवांवरील आक्रमणाची कल्पना येते. विधवांच्या द्वारें हिंदुसंस्कृतीवर फार मोठा प्रसंग गुजरत आहे. पुष्कळ अल्पसंख्य जातींमध्यें स्त्रिया अधिक व पुरुष कमी अशी स्थिति आहे. त्यामुळें विधवांवर

खेडयापाडयांत फार अत्याचार होतात. विधवा म्हणजे जणूं 'बेवारशी इस्टेट', पाहिजे त्यानें तिजवर डोळा ठेवावा. जणूं धर्मशाळेंतील जागा कीं, वाटेल तशी ती प्रत्येकानें वापरावी ! ही अनिष्ट स्थिती घालविण्याकरितां जमेल तर शास्त्राधारानें नाहींतर युक्ति व जरुरी या दृष्टीनें हा विधवाविवाहाचा प्रश्न हिंदुसमाजानें सोडविलाच पाहिजे. जी विधवा संतति, संपत्ति, आप्त व ऋणानुबंध यांनीं दुसऱ्या कुळाशीं पूर्ण संबद्ध झाली नसेल तिच्या विवाहाला आडकाठी असण्याचें कारण नाहीं. दुराचारापेक्षां सदाचार बरा हें कोणींहि मान्य करील. दुसऱ्या नवऱ्याच्या नांवानें कुंकू लाविल्याबद्दल कांहीं लोक एकदांच नाकें मुरडतील, परंतु जन्मभर लोकांच्या डोळ्यांत खुपण्यापेक्षां एकदांच पुनर्विवाह करून दृष्टिआड झालेलें बरें. अर्थात्च जिला तोल संभाळून समाजांत वावरणें शक्य वाटत नसेल, जी वैषयिक मोहानें परधर्मीयांच्या जाळ्यांत सांपडण्याचा संभव असेल ( अर्थात् तो बव्हंशीं आहे ) म्हणून बापानें अगर आप्तानें पहिल्या लग्नाप्रमाणें विधवेचें दुसरें लग्न करून द्यावें व तिजकडे क्षुद्र दृष्टीनें पाहूं नये. हें विवेचन ज्या हिंदु-जातींमध्यें पुनर्विवाह रूढ नाहीं त्यांकरितां आहे हें सांगणें नकोच !

विधवाविवाहाचा सर्रास पुरस्कार करूं लागल्यास एक आपत्ति ओढवण्याचा संभव आहे म्हणून तो करूं नये. समजा, समाजांत लग्नाचे मुलगे व मुली यांची संख्या सम आहे. अशा स्थितींत पुनर्विवाहाचा पुरस्कार केल्यास कांहीं मुलगे विध-वांशीं लग्नें लावतील व कुमारिकांना प्रथमसंबंधाचे वर मिळणार नाहींत. कुमारिकांना नवयुवक नवरे मिळावयास पाहिजेत. म्हणून विधवांचीं लग्नें विधुरांशीं लावावीं. विधुरांचीं लग्नें जर कुमारिकांशींच लावलीं तर, तिकडूनही अडचण आहे. विधुरांनीं जर कांहीं कुमारिका आपल्या लग्नांमुळें अडविल्या तर प्रथमसंबंधाच्या मुलांना मुली मिळण्याची पंचाईत पडेल. म्हणून स्त्रीपुनर्विवाहाचा पुरस्कारहि करूं नये आणि तिरस्कारहि पण करूं नये. समाजांत मुलींची संख्या अधिक असली आणि जर त्या प्रथमविवाहाचे मुलगे व विधुर यांत खपून गेल्या तर मग विधवाविवाहाला अवसरच मिळणार नाहीं. याकरितां तारतम्यानें काय तें ठरविलें पाहिजे.

हिंदुसमाज बाल आणि प्रौढ विधवाविवाहाविषयीं जितका अनुदार आहे, तितका तो विधुरविवाहाविषयीं नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. खरोखर स्त्रीपुनर्विवाहापेक्षां पुरुषपुनर्विवाह, फाजील प्रौढ वधूवरविवाह, जरठकुमारिका-

विवाह यांचा धिःकार हिंदुसमाजानें केला पाहिजे. विधुरानें वयाच्या पन्नास साठ वर्षीपर्यंत खुशाल कुमारिकेशीं लग्न लावावें, पुनः पुनः घरांत पूर्वसंबंधजन्य मुलांसमक्ष गर्भाधानें व बाळंतपणें असले सुखसोहळे भोगावे आणि ते सर्व घरांतील बाल अथवा प्रौढ विधवांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहावे यासारखी शोचनीय स्थिति कोणती? वृद्ध आजोबांचें हें कर्म पाहून बाल नातवंडांना काय वाटत असेल याचा विचार करावयास नको काय? विधुरविवाहाच्या वेळीं तारतम्यबुद्धीचा उपयोग करून वागलें पाहिजे. पुरुषांनीं पाहिजे तसें वर्तन केल्यास समाजबलाचा ऱ्हास होईल. विशिष्ट वयापुढें सरकारहि आपल्या नोकरांना नालायक ठरवितें. नोकरीला व इतर व्यवहाराला जीं माणसें नालायक ठरतात तीं पुन: लग्न करून संसारांत पडण्याला कशीं लायक होतात? पंचेचाळीस अगर पन्नास वर्षांपुढें स्वार्थमूलक संसाराला पुरुषाला अयोग्य ठरवून त्यानें वानप्रस्थाश्रमाचें रूपांतर करून सार्वजनिक जीवनांत आपलें आयुष्य घालविलें पाहिजे. हल्लीं सार्वजनिक कार्याकरितां जो तो तरुणांना आव्हान करितो. परंतु पोक्त, वयस्क, अनुभवी माणसांना सार्वजानिक कार्याकरितां कोणींच आव्हान करीत नाहीं. वानप्रस्थाश्रमाचें पुनरुज्जीवन सार्वजनिक कार्यांत करून तशा लोकांच्या संस्था उभारल्या पाहिजेत. विधुरांनीं व वयस्कांनीं आपल्या घरचें खाऊन समाजावर ओझें न टाकतां रात्रीच्या शाळा काढण्यापासून तों कौन्सिलांत झगडण्यापर्यंत जें शक्य असेल तें सार्वजनिक कार्य केलें पाहिजे. पन्नास वर्षांनंतर जो सुशिक्षित विधुर असें करणार नाहीं त्याला समाजांत वावरण्याची शरम वाटेल असें वातावरण समाजांत उत्पन्न झालें पाहिजे. म्हणजे समाजसेवा करण्यास अनुभविक गृहस्थ मिळूं शकतील.

शास्त्रांमध्यें अग्निहोत्राकरितां पुरुषपुनर्विवाहाची परवानगी आहे हें '**आहरेद्विधिवद्दारानग्नींश्चैवाविलंबयन्**' किंवा '**पुनर्दारक्रियां कुर्यात्पुनराधानमेव च**' या याज्ञवल्क्य व मनुस्मृतींतील वाक्यांवरून उघड दिसतें. हल्लीं अग्निहोत्र संस्था असें म्हटलें कीं, '**कलौ पंच विवर्जयेत्**' असा शास्त्रार्थ कांहीं लोक तेव्हांच दाखवितात. कलियुगांत जर अग्निहोत्र नाहीं तर पुरुषपुनर्विवाहहि नको. संततीकरितां विवाहच केला पाहिजे असें नाहीं, दत्तक घेतला कीं पिंड देणाराहि उत्पन्न होतो. सरकारानें दत्तकाचा कायदा (निर्बंध) इतका सैल केला आहे कीं, माणसानें मनुष्य दत्तक घेतला म्हणजे झालें. अर्थात् संततीकरितां किंवा अग्निहोत्राकरितां विधुरानें कुमारिकेशीं विवाह करण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. देशांत दारिद्य "मी मी" म्हणत

आहे, आयुष्य कंसांत येत आहे, महर्गता वाढत आहे, धर्मबंधन व समाजशासन यांना खो मिळत आहे, अशा स्थितींत विधुरांनीं वयाच्या अतिक्रमाणानंतर विवाह करणें म्हणजे समाजघात, राष्ट्रघात व आत्मघातहि करण्यासारखें आहे. प्रत्येक पुरुषानें एकदांच दारपरिग्रह करावा व विधुरावस्थेंत सार्वजनिक आयुष्यक्रम स्वीकारावा.

---

# प्रकरण तिसरें

## समाजबलविचार

### हिंदुसमाजांतील स्त्रिया

कोणत्याहि समाजाचें सामर्थ्य वाढण्याला स्त्रियांचें सर्व प्रकारचें साहाय्य असावें लागतें. हिंदुसमाजांतील अडाणीपणा व विशेषत: स्त्रियांतील वेडगळ, भोळ्या, धर्मवेडया कल्पना सर्वस्वीं गेल्यावांचून हिंदुसमाज समर्थ होणें अशक्य आहे. महाराष्ट्रांतील हिंदु स्त्रियांच्या स्वभावाचें व मनाचें निरीक्षण केल्यास त्या अतिशय मागासलेल्या आढळतील. हिंदुसमाजांतील कांहीं सरसावलेले थर सोडून दिले तर स्त्रियांमध्यें अतिशय गाढ अज्ञान आहे असें दृष्टोत्पत्तीस येतें. हिंदुसमाजच जेथें निरक्षर, पूर्वकल्पनाग्रस्त, धर्मभोळा असा आहे, तेथें स्त्रिया कशा असतील हें सांगावयासच नको. तथापि भावी काळांत ही शोचनीय स्थिति अनिष्ट आहे, असें समजून स्त्रियांच्या उन्नतीकडे यापुढें लक्ष दिलेंच पाहिजे. स्त्रियांची योग्यता सर्व क्षेत्रांत जितकी अधिक वाढेल तितकी हिंदुसमाजाची शक्तिहि वाढणार आहे असें समजून त्या महत्त्वाच्या कार्याकडे हिंदुसमाजानें लक्ष दिलें पाहिजे.

हिंदुसमाजामध्यें स्त्रियांबद्दल हल्लीं ज्या विचित्र कल्पना आढळतात त्या पहिल्यानें बदलल्या पाहिजेत. स्त्रिया या पापाचें मूळ आहेत, त्या मोक्षघातक आहेत, त्या वाईट मार्गाला लावणाऱ्या आहेत इत्यादि कल्पना बौद्ध* संस्कृतींतील

---

* स्त्रियांसंबंधाच्या वैदिक उदार कल्पना 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष', पूर्वार्ध, प्रकरण ४ व १० यांत पाहा.

आहेत. वैराग्य, संन्यास आणि निवृत्ति हें ध्येय ठरवून सर्व मनुष्यांनीं तिकडे जाणें हा स्वभावधर्म समजून विषयाची निंदा करतांना स्त्रियांचीहि निंदा जेवढी करितां आली तेवढी केलेली आहे. अर्थात् ही एकांतिक निंदा अतिशयोक्तीची अतएव त्याज्य मानली पाहिजे. स्त्रियांसंबंधीं दुसरे अनुदार विचार जे आढळतात ते मुसलमान शेजाऱ्यां-कडून आमच्या समाजांत आलेले आहेत. स्त्रियांना आत्मा नाहीं, मनहि नाहीं, त्या एक उपभोगाचें व प्रजोत्पत्तीचें साधन आहेत, कितीहि स्त्रिया केल्या व सोडल्या तरी त्यांत कांहीं विधिनिषेध नाहीं, स्त्रिया हें एक धन आहे, त्यांचा लिलाव करण्यासहि हरकत नाहीं असल्या ज्या कल्पना मानवजातीला कलंक म्हणून ठरतील त्या समूळ नष्ट केल्याच पाहिजेत. आमच्या शेजारीं राहाणारे जे मुसलमान लोक त्यांच्यामध्यें आर्यश्रेष्ठांच्या कल्पना तर उतरल्या नाहींतच, परंतु अनेक कारणांमुळें त्या समाजांतील अत्यंत संकुचित, हिडिस व निंद्य कल्पना हिंदुसमाजांत मात्र प्रचलित झाल्या आहेत. हिंदुसमाजांत एकपत्निव्रत व एकपतिव्रत हीं ध्येयें मानलीं आहेत, तर मुसलमानांत एकाच वेळीं निदान चार बायका असण्यास कांहींच हरकत नाहीं असा समज आहे. वाटल्यास दरसाल एक दोन बायका कराव्या व जुन्या काडीमोड करून सोडून द्याव्या तरी त्यांत कांहींच अनिष्ट नाहीं अशी त्या समाजांत समजूत प्रचलित आहे. अकोल्यास एका मुसलमान रिसीव्हरनें चार वर्षांपूर्वी आत्महत्या केली. त्यानें एकंदर अठ्ठेचाळीस बायका केल्या. पैकीं चार अवशिष्ट होत्या असें आम्ही एका बड्या कामगाराचे घरीं तो तिऱ्हाइतांशीं बोलतांना श्रवण केलें. कदाचित् ही अतिशयोक्ति असू शकेल या संशयानें आम्ही बळेंच प्रश्नहि केला; परंतु अठ्ठेचाळीस बायका झाल्याचें त्यांनीं आपल्या माहितीप्रमाणें पुनः समजावून सांगितलें. या गृहस्थानें पंचवीस वर्षांत अठ्ठेचाळीस बायका केल्या असें जर खरें मानलें तर बायकांची किंमत त्या समाजांत किती क्षुद्र आहे याची कल्पना येते. सोडलेल्या बायांनीं पुन्हां नवरे केले असतील व सोडलेल्या बऱ्याच बायांशीं दुसऱ्यांनीं लग्नें लाविलीं असतील. यावरून पातिव्रत्याचें महत्त्व हा समाज किती मानतो हें दृष्टोत्पत्तीस येतें.

मुसलमानी बादशहांच्या नाटकशाळेंत आणि जनानखान्यांत हजार - दीड हजार बायका असत. फार कशाला, हल्लींच्या निजामसरकारच्या वडिलांच्या सुमारें दोन अडीचशें बायका होत्या व त्यांची वाट या निजामांनीं मोठ्या मजेनें

लाविली असें हैद्राबाद संस्थानचे लोक सांगतात. हल्लींचे निजाम हे खर्चाच्या कामांत मोठे काटकसरी आहेत. म्हणून त्यांनीं अडीचशें बायांना व्यर्थ पोसण्यापेक्षां जो बरा दिसेल किंवा असेल असा मुसलमान पाहून एकेका अाईचें (बाईचें) जुलमानें लग्न लावून दिलें ! या गोष्टीवरून बहुपत्नित्व म्हणण्यापेक्षां असंख्यपत्नित्व त्या समाजांत आहे. म्हणूनच स्त्रियांबद्दल अत्यंत क्षुद्र कल्पना आहेत असें अनुमान करण्याकडे प्रवृत्ति होते. मुसलमानी स्त्रियांचा गोषा, त्यांचें पारतंत्र्य, पोषाख, घरांतील व शरिरावरील अमंगळपणा हीं पाहिली म्हणजे वरील अनुमानाला बळकटी येते. स्त्रियांची इतकी विटंबना किंवा इतकी क्षुद्र किंमत जगांत कोणत्याहि समाजांत असतां कामा नये. हिंदुसमाजानें परक्यांपासून आलेल्या या घाणेरड्या कल्पना सोडून आपल्या शुद्ध कल्पनांकडे वळलें पाहिजे व स्त्रियांची सुधारणा केली पाहिजे.

जशी परब्रह्माला जगदुत्पत्तीकरितां माया लागते किंवा संहार करणाऱ्या शिवाला शक्ति लागते तशी मनुष्याला संसारचक्र चालविण्याला स्त्री लागते अशा आपल्या कल्पना आहेत. पुरुष म्हणजे कांहीं विकारांचा व विचारांचा समुदाय तर, स्त्री ही त्याच विचारांना व विकारांना योग्य मार्गांत आणणारी शक्ति, म्हणून स्त्री व पुरुष मिळून मनुष्य होतो असा सिद्धांत आहे. एकाकी स्त्री किंवा एकाकी पुरुष हे अपूर्णच असतात. काठिण्य, कठोरता, धैर्य व पौरुष या गुणांशीं वात्सल्य, प्रेम, भीरुता, मार्दव इत्यादि गुणांचा संयोग म्हणजेच स्त्रीपुरुषसंबंध होय.

"अर्धं भार्या मनुष्यस्य ।" स्त्री हा पुरुषाचा अर्धा भाग आहे. अर्थात् पुरुष हा स्त्रीवांचून पूर्ण नाहीं व स्त्री ही पुरुषावांचून पूर्ण नाहीं. दोघे एकमेकांची पूरक आहेत असा सिद्धांत आहे. आपल्या शास्त्रांत, 'गृहिणी गृहमुच्यते,' 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' असे उज्ज्वल विचार सांगितले आहेत. हिंदुसमाजांत स्त्रियांबद्दल प्राचीन आर्यांच्या कल्पना वावरल्या पाहिजेत. हिंदुगृहिणींमध्यें, आम्ही घर उभारणाऱ्या आहोंत, आम्हीच मुख्य आहोंत, कुटुंबाच्या सुखाला आमच्या पासूनच आरंभ होतो, समाजामध्यें आमचा बराच कार्यभाग आहे, असा शुद्ध सात्त्विक अहंकार किंवा अभिनिवेश उत्पन्न झाला पाहिजे. समाजांत ज्या घटकांची किंमत नाहीं, त्यांच्यावर कांहीं जबाबदारी नाहीं, अर्थात् त्यांचें कांहीं कार्यहि नाहीं ! प्रत्येक समाजाच्या प्रत्येक घटकाला, मी कोणी तरी आहें, माझें कार्य आहे, माझी आवश्यकता आहे, असें वाटू लागलें तरच तो आपला पराक्रम

दाखवील. हिंदु स्त्रियांना, आपला जन्म कशाला ? आपलें कार्य काय ? ह्याची जर कांहींच जाणीव नसेल तर त्या बिचाऱ्या समाजबल वाढविणार कशा व त्यांच्या अभावीं हिंदुसमाज समर्थ तरी होणार कसा ?

प्रत्येक हिंदु गृहिणीला आज जगांत काय चाललें आहे, आपल्या भोंवतीं काय आहे, याचें म्हणजे देशकालपरिस्थितीचें उत्तम ज्ञान पाहिजे. हें ज्ञान शिक्षणानें, व्यवहारानें व निरीक्षणानें उत्पन्न होतें म्हणून साक्षरतेचा प्रसार झपाट्यानें केला पाहिजे. बायकांनीं शिकूं नये, वाचूं नये, लिहूं नये, कारण तसें झालें तर सरस्वतीचा शाप होतो अशा प्रकारच्या कल्पना आज फारशा नाहींत; तथापि शिक्षणाचा प्रसार खूप होत आहे असेंहि आढळत नाहीं. निरक्षर स्त्री म्हणून दिसतां कामा नये इतक्या महत्त्वाकांक्षेनें व ईर्षेनें हें कार्य चालविलें पाहिजे. अमेरिकेमध्यें चांदण्याच्या शाळा सुरू करून ( Moonlight Schools) सत्तर, ऐशीं, नव्वद वर्षांपर्यंतच्या स्त्रीपुरुषांची निरक्षरता घालविली जात आहे, तर आपल्या इकडे लोक व सरकार या दोघांचे यत्न मुंगीच्या गतीनें चाललेले आहेत. साक्षरता हें शिक्षणाचें, पद्धतशीर विचार करण्याचें व समजुतीचें साधन आहे. हिंदुसमाजाला जो गाढ अज्ञानाचा व आचरट धर्मभोळेपणाचा रोग जडला आहे तो झडण्याला साक्षरतेसारखें औषधच नाहीं. यास्तव सक्तीचें पण मोफत प्राथमिक शिक्षण देण्याची व्यवस्था झाली पाहिजे. या प्रश्नाकडे देशांतील पुढाऱ्यांचें दुर्लक्ष झालें आहे असें कष्टानें म्हणावें लागतें. कौन्सिलपुढाऱ्यांना आमची अशी सूचना आहे कीं, त्यांनीं हरप्रयत्नानें हें प्राथमिक शिक्षण सरकारकडून सुरूं करवावें. समाजाचा रोग नाहींसा करणारें साक्षरता हें एक मोठें औषध आहे. म्हणून ही साक्षरता समाजांत जितक्या सुलभ पद्धतीनें व कमी खर्चानें आणितां येईल तितकी आणण्याचा यत्न करावा. हिंदुसमाजाच्या बलाकरितां साक्षरतेच्या प्रसाराला **भाषावार विद्यापीठें व भाषावार प्रांतरचना** यांची जोड पाहिजे. भाषावार विद्यापीठें व प्रांतरचना या प्रश्नांकडे हल्लीं अक्षम्य दुर्लक्ष झालें आहे. हिंदुसमाजाच्या कैवाऱ्यांनीं व त्याला जिवंत ठेवूं इच्छिणाऱ्यांनीं पुनः पुनः या प्रश्नांकडे लक्ष दिलें पाहिजे. भाषावार प्रांतरचनेच्या अभावीं मुंबई इलाख्याची किती दैना चालली आहे हें दृष्टीआड करितां येत नाहीं.

हिंदु गृहिणींना साक्षरतेबरोबर जगांतल्या अनेक व्यवहारांचें ज्ञान दिलें पाहिजे. समाजांतील कांहीं वरचे थर सोडून दिले तर खालच्या थरांत पुष्कळ

व्यवहारांबद्दल अज्ञान आहे. पोस्ट, रेल्वे, बँका, संमेलनें, उत्सव, यात्रा, सण या व्यवहारांचें प्रत्यक्ष कृतीनें शिक्षण दिलें पाहिजे. पोस्टाच्या पेटींत पत्र टाकून त्या खांबाला नमस्कार करणाऱ्या, कोर्टाचें वारंट म्हणजे एक वरवंटा येतो असें समजून बेलिफाचे हात ओले करणाऱ्या, पोस्टमननें पत्र आणून दिल्यावर तें दिल्याबद्दल त्याला दक्षिणा देणाऱ्या कित्येक स्त्रिया अद्याप आढळतात. या व अशाच खुळचट कल्पना जाण्याकरितां ते ते व्यवहार प्रत्यक्ष त्यांचेकडून घडवून घेतले पाहिजेत. संकुचित कल्पना जाऊन व्यापक विचार होण्याकरितां कांहीं विशिष्ट पुस्तकें हिंदु गृहिणींनीं वाचलींच पाहिजेत. भूतेंखेतें, कली, बागुलबुवा, अंगांत येणें, देव दिसणें असलेल्या ज्या शेंकडों कल्पना आहेत त्यांचा थोतांडपणा स्त्रियांच्या लक्षांत जितक्या विविध प्रकारांनीं आणितां येईल तितका आणला पाहिजे. नाहीं तर हिंदु गृहस्थ एकीकडे अस्पृश्यतानिवारण करितो तर दुसरीकडे त्याची बायको शेजाऱ्याच्या घरीं हळदीकुंकवास जाऊन आल्याबरोबर विटाळ झाला म्हणून लुगडें सोडते. हिंदु गृहस्थ इकडे शुद्धीकृतांशीं अन्नव्यवहार करतो तर, तिकडे त्याची बायको त्याला घरीं आल्यावर त्याचा विटाळ होईल म्हणून अन्न दुरून वाढते! एकादा हिंदु मांसाहारी असल्यामुळें कोंबडीं, बदकें, बकरीं मारण्याला त्याला कांहींच वाटत नाहीं, तर त्याच्या बायकोला नारळ फोडावयास सांगितला असतां तिच्या जिवावर येतें, तर कांहीं हिंदु गृहिणींना भाजीचा भोंपळा फोडण्याची हत्या वाटते! इतकें विषम अंतर जर हिंदु स्त्रीपुरुषांमध्यें राहिलें तर हिंदुसमाज सामर्थ्यसंपन्न कसा होईल?

हिंदु गृहिणींना प्राचीन आर्य स्त्रियांच्या आदर्शाचे पाठ दिले पाहिजेत. मराठ्यांच्या इतिहासांतील पराक्रमी व धोरणी स्त्रिया, राजपुतान्यांतील शूर स्त्रिया, भारतरामायणकालीन आणि वेदकालीन विदुषी यांच्या गोष्टी गृहिणींना चांगल्या माहित करून देऊन त्या सत्य आहेत, आचरणीय आहेत, अशी त्यांची खात्री करून द्यावी. हिंदु गृहिणींना असें वाटतें कीं, बायकांचा जन्म व्यर्थ आहे. "रांधा, वाढा आणि उष्टीं काढा" हींच बायकांचीं कर्तव्यें असे उद्गार त्या वेळप्रसंगीं काढितात. परंतु माता या दृष्टीनें त्यांचें केवढें महत्त्व आहे, हें त्यांना पटवून द्यावयास नको काय? कौसल्या, कुंती, विदुला, सुनीति, जिजाई अशा ज्या भारतमाता होऊन गेल्या आणि ज्या शेंकडों भारतमातांचीं उज्ज्वल चरित्रें इतिहासांत आढळतात त्यांवरून मातांची किंमत काय आहे, हें आर्य गृहिणींच्या ध्यानीं

आणून द्यावें. माता सुसंस्कृत, सुबुद्ध, व्यापक विचारांची व धाडसी असेल तर ती आपल्या मनोवृत्तीचा परिणाम मुलावर चांगला करते असा सिद्धान्त आहे. राष्ट्रांत वीर पुत्र, वीर माताच उत्पन्न करतात. समाजाच्या नसानसांत जेव्हां जेव्हां स्वातंत्र्याचें रक्त सळसळत असतें तेव्हां तेव्हां मातांची उद्बोधकता व उपदेश यांचा परिणाम सुपुत्रांवर होतो. हिंदु मातांची व जगांतील राष्ट्रमातांची तुलना केली तर निराशाच वाटते. एकदोन मुलें होतांच हिंदु माता वार्धक्याचे द्वारांत प्रवेश करते. तिचे डोळे खोल जातात, गाल सुरकुततात, डोक्यांचा भांगहि फाटतो आणि बाळंतरोग व क्षयरोगही जडतात ! इतर स्वतंत्र राष्ट्रांत पांच चार मुलांच्या आया, कोणी घोडयावर बसून १०।१० मैल दौड करतात तर, कोणी इंग्लिश चॅनेल पोहून जातात, तर कोणी हिंदु पुरुषाला खालीं मान घालावी लागेल असें कृत्य करून दाखवितात ! हिंदु गृहिणींमध्यें हे सर्व गुण आणिले पाहिजेत, तरच हिंदुसमाज समर्थ होईल.

हिंदु स्त्रीनें गृहिणीचीं कर्तव्यें उत्तम बजावलीं पाहिजेत. म्हणून प्रत्येक गृहिणीला आपलें घर, घराभोंवतालचा प्रदेश, शेजारी व त्यांचे स्वभाव यांची खडान्‌खडा माहिती असावी. अशी सज्ञान गृहिणी जर असेल तरच ती आपल्या गृहाचें योग्य दक्षतेनें संरक्षण करील. हिंदु गृहिणींना आपल्या हिंदुस्थानरूपी गृहाचें सामाजिक दृष्टीनें बारीक सारीक ज्ञान व्हावयास पाहिजे. हिंदुस्थान देशाचा इतिहास, भूगोल, चालीरीति, विचार, कल्पना व भावना या सर्व तिच्या डोळ्यांपुढें पाहिजेत. हिंदुसमाजांत यात्रांच्या निमित्तानें प्रवास करण्याची पद्धत आहे. परंतु नुसत्या धार्मिक भावनेनें झालेल्या प्रवासाचा समाजनिरीक्षणाचे दृष्टीनें फारच अल्प उपयोग होतो. म्हणून यात्रांबरोबर किंवा यात्रांपेक्षां समाजनिरीक्षण करण्यास हिंदु गृहिणींना शिकविलें पाहिजे. एकंदरींत धर्माबद्दल हिंदुसमाजांतील पुरुषांचे विचार बरेच कोते आहेत. स्त्रियांच्या तर इतक्या संकुचित कल्पना असतात कीं, धर्म म्हणजे सोंवळें, ओवळें, शिवाशिव, विटाळ व स्नान करणें यांमध्येंच भरलेला आहे, असें त्यांना वाटतें. स्त्रियांच्या समजुतींतील संकुचितपणा घालविण्यास प्रवास हा सर्वांत उत्तम उपाय आहे. पुस्तकी शिक्षणानें जी विचारक्रांति होत नाहीं ती विचारक्रांति समाजनिरीक्षणानें होते. चार देश पाहून आल्यावर, चार ठिकाणचें पाणी प्याल्यावर, चार देशांतील चालीरीतींचें अवलोकन केल्यावर, शहाणपण अंगीं येतें असा प्रत्यक्ष अनुभव आहे. म्हणून हिंदु

गृहिणींनीं आपल्या मोठ्या घरांत कोठें कोठें काय काय आहे हें पाहिलें पाहिजे. घरांत उंदीर असले तर त्यांचीं बिळें बुजवावीं लागतात व मांजरें बाळगावीं लागतात, घुशी असल्या तर माराव्या लागतात. ढेंकूण, डांस, पिसवा, चिलटें, यांचेंहि निवारण मुलांबाळांना ताप होऊं नये म्हणून विचारी गृहिणीला करावें लागतें. हिंदु गृहिणींनीं आपल्या भावी पिढीला आपल्या सत्तेच्या मोठ्या घरांत सुखानें राहतां यावें म्हणून आपल्या घरांत समाजाला कुरतडणारे उंदीर कोठें आहेत, समाजाच्या भिंती पाडणाऱ्या घुशी कोठें आहेत, समाजाला दंश करणारे वृश्चिक कोणच्या भागांत आहेत, हिंदुसमाजाला गिळणारे काळसर्प कोठें टपून बसले आहेत, हें पाहून त्या धोरणानें वागावयास पाहिजे. हिंदु गृहिणींना धोरण, दूरदर्शीपणा, सावधपणा व दीर्घसूचना हे गुण जर आत्मसात् करितां न आले तर त्यांच्या हातून त्यांच्या गृहाचें रक्षण होणार नाहीं.

हिंदु गृहिणींना आपल्या घरांतील अन्न, वस्त्र, पाणी व हवा यांची स्थिति काय आहे याचें ज्ञान पाहिजे. हिंदुस्थान देश हें आपलें घर असतांना तेथील अन्न जातें कुठें, कां जातें, आपल्या घरांत पूर्वी उत्तम तऱ्हेचीं वस्त्रें पुष्कळ होत असतांना तीं कशीं नष्ट झालीं, देशांतील पूर्वीचें आरोग्य व हल्लींचें आरोग्य यांमध्यें अंतर कां पडलें, यांचें ज्ञान हिंदु गृहिणींना असलें म्हणजे त्या आपल्या गृहांत अन्न, पाणी, हवा व आरोग्य यांची काळजी घेऊं शकतील. हिंदुसमाजांत मुलांचें संगोपन आणि निगा नीट होत नाहीं याचें कारण हिंदु गृहिणींचें अक्षम्य अज्ञान हें होय. बालमृत्यूचें प्रमाण दिवसेंदिवस वाढत आहे. दीर्घायुष्याचा संकोच होत आहे. अनेक रोगांचा प्रादुर्भाव होत आहे. प्रजा निःसत्त्व, दुबळी, अल्पायुषी अशी होत आहे. या सर्वांना आळा घालण्याचें काम हिंदु गृहिणींकडून त्यांना ज्ञान मिळाल्यास पुष्कळसें होण्याचा संभव आहे. हल्लीं चलत्‌चित्रपटांच्या साह्यानें आणि शिशुसप्ताहाच्या चळवळीनें स्त्रियांना वस्तुस्थिति समजावून देण्याचा उद्योग होत आहे तो इष्टच आहे. परंतु अशा तऱ्हेचे पुष्कळ प्रयत्न झाले पाहिजेत.

हिंदु गृहिणींचा पोषाख, दागिने व इतर गोष्टी या सर्व व्यवस्थित, सुबक व सुटसुटीत पाहिजेत. महाराष्ट्रांत सर्व हिंदु स्त्रिया कच्छ घालतात ही चांगली चाल आहे. लुगडें, चोळी हा पोषाख सुटसुटीत आहे. याचें अनुकरण इतर प्रांतियांनीं करावयास पाहिजे. महाराष्ट्रांतील मारवाडी स्त्रिया अद्याप लहंगे व

झगे नेसतात व बरेचसे अवजड दागिनेहि हातापायांत अडकवितात. हिंदु स्त्रियांमध्यें दागिन्यांचा सोस पुष्कळच आढळतो. दागिन्यांच्या योगानें शरिराची शोभा वाढते व त्या निमित्तानें थोडा द्रव्यसंग्रह होतो हें जरी खरें असलें तथापि अतिशय दागिने, अवजड दागिने हे सर्व दृष्टींनीं त्रासदायकच होत. शिकलेल्या स्त्रियांमध्यें दागिन्यांच्या कल्पना झपाटयानें बदलत आहेत. त्याच कल्पना इतर सर्व स्त्रियांमध्यें प्रसृत झाल्या पाहिजेत. महाराष्ट्रांतील मारवाडी समाजानें स्त्रियांच्या पोषाखाच्या व दागिन्यांच्या व्यवहारांत सुधारणा करणें अवश्य आहे. अवजड दागिने व बोजड पोषाख यांमुळें स्त्रिया स्वसंरक्षणक्षम आणि प्रतिकारक्षम होत नाहींत असें अनेक ठिकाणच्या अनुभवारून सिद्ध झालें आहे.

हिंदु गृहिणींनीं शरीर काटक होण्याकरितां घरांतील सर्व लहान मोठीं कामें करण्यांत शिकलें पाहिजे. पुष्कळ श्रीमंत बायकांना आपल्या घरांतील कामें करण्यांत कमीपणा वाटतो हा मूर्खपणा आहे. शरीर व मन हीं निरोगी राहण्यास मनुष्यानें नेहमीं कार्यव्यापृत असलें पाहिजे. जुनीं घरगुती कामें गेलीं, नवीन पद्धतीचा व्यायाम घेण्याची सोय नाहीं, अशा स्थितींत स्त्रियांच्या आरोग्याला कीड लागूं लागली आहे. पाटावरून ताटावर बसणें, नाटकें, कादंबऱ्या वाचणें, दिवसांतून चार दोन वेळां चहा घेणें, दिवसा गादीवर व रात्रीं पलंगावर लोळणें असले कार्यक्रम एकसारखे चालू ठेवणाऱ्या स्त्रिया हिंदुसमाजांतील श्रीमंत घराण्यांत आढळतात. मध्यम स्थितीच्या लोकांतहि काम नको, नुसतें बसावयास पाहिजे असला ऐदीपणा वाढत आहे. जगांतील सुधारलेल्या देशांत व समाजांत अगदीं याच्या उलट स्थिति आहे. म्हणून स्त्रियांनीं आपल्या खेळांचीं मंडळें, व्यायामसंघ किंवा शरीरबलवर्धक संस्था उत्पन्न केल्या पाहिजेत. निदान तालुक्याच्या गांवांत तरी अशी एखादी संस्था पाहिजे. ह्या संस्थेमार्फत स्त्रियांचे सामने व शर्यती हे कार्यक्रम व्हावेत. स्वयंपाक करणें, दळणें, कांडणें, सारवणें, धुणें, पळणें, खेळणें, सायकलवर बसणें, डोंगरावर चढणें, अशा तऱ्हेचे विषय स्त्रियांच्या–विशेषतः प्रौढ मुलींच्या–उपयोगाचे ठेवल्यास त्यापासून मुलींमध्यें व स्त्रियांमध्यें उत्साह उत्पन्न होईल आणि शरीरबलाचें महत्त्व समजूं लागेल. हिंदुसमाजांतील स्त्रियांवर कोणत्या वेळीं कोणता प्रसंग येईल याचा आज तरी कांहीं नियम नसल्यामुळें स्त्रिया केव्हांहि स्वसंरक्षणक्षम राहातील अशी व्यवस्था

असावी. घराबाहेर व घरांत कांहीं विशिष्ट शस्त्रें स्त्रियांना वापरण्यास शिकविलें पाहिजे. सशस्त्र स्त्री असहाय्य स्थितींत पातिव्रत्याचें संरक्षण करूं शकते व दुष्टापासून आपला बचाव करूं शकते अशीं कित्येक उदाहरणें अलीकडे घडलेलीं आहेत, तीं लक्षांत घेऊन त्यांतील तत्त्वें हिंदु स्त्रियांनीं व्यवहारांत आणलीं पाहिजेत. हिंदु गृहिणीवर आपलें घर, आपलीं मुलें, आपलें पातिव्रत्य व आपली संस्कृति रक्षण करण्याची जबाबदारी येऊन पडली असल्यामुळें ती पार पाडण्याइतकें सामर्थ्य त्यांनीं आणलें पाहिजे हेंच मुख्यतः सांगावयाचें आहे.

हिंदु स्त्रियांनीं आपले सर्व घरगुती व्यवहार समाजबंधुत्वाच्या नात्यानें हिंदूंशींच करण्यास विसरूं नये. हिंदु स्त्रिया विसरभोळया असल्यामुळें त्या नेहमी चुकतात व पुढें पश्चात्ताप पावतात. हिंदु गृहिणी आपल्या घरांतील सर्व कार्यें आणि आपल्या घरांतलि सर्व घरगुती व्यवहार हिंदूंशींच करूं लागतील तर हिंदु-समाजाचें बल तात्काळ वाढेल. कल्हईवाला, बागवान, माळी, कासार, दुकानदार, कुंभार, तेली, तांबोळी, सुतार इ. सर्व धंदेवाले हिंदु पाहिजेत. लग्नामध्यें वाजंत्री, ताशेवाले, बँडवाले हिंदु पाहिजेत असा हिंदुत्वाचा आग्रह हिंदु स्त्रियांच्या रोमरोमांत आढळला पाहिजे. हिंदु गृहिणी व माता यांचीं कर्तव्यें उत्तम बजावण्याकरितां सार्वजनिक व जगांतील हालचालींकडेहि त्यांनीं लक्ष दिलें पाहिजे. सार्वजनिक उत्सव, समारंभ, सभा यांमध्यें गृहकर्म संभाळून कांहीं गृहिणींनीं चार आठ दिवस काम केलें पाहिजे. केवळ स्त्रियांनीं चालविण्यासारखीं बरींच सार्वजनिक कार्यें हल्लीं दिसूं लागलीं आहेत. तीं कार्यें सधवा गृहिणींपेक्षां विधवा स्त्रिया उत्तम करूं शकतील, म्हणून त्यांच्या कर्तव्याचा विचार अवश्य केला पाहिजे.

हिंदुसमाजांत पुनर्विवाह न करणाऱ्या विधवाहि पुष्कळ आहेत. खरोखर या विधवांइतका पवित्र वर्ग दुनियेंत आढळणें शक्य नाहीं. कोणी या विधवा म्हणजे समाजाची शोभा आहे असें म्हणतात, तर कोणी विधवा हें मूर्तिमंत पावित्र्य आहे असें सांगतात. पण अशा विधवांना हिंदुसमाज फार अनुदारपणानें वागवतो असें कष्टानें म्हणावें लागतें. आपणावरून जग ओळखावें अशी म्हण आहे. विधवांच्या स्थितीशीं घटकाभर स्वतःचें तादात्म्य करून विचार केल्यास विधवांच्या हालअपेष्टांची व मानहानीची कल्पना येईल. समाजांत अनुदार भाषा, घरांत टोंचून बोलणें, पदोपदीं अपशकुनादि कल्पनांनीं अपमानपरंपरा

होऊं लागली कीं, विधवांना जिव नकोसा वाटतो. नाशकास १९२० सालीं हिंदु-धर्मपरिषदेमध्यें एका भगिनीनें सती जाण्याची परवानगी मागितली ! सती जाणें म्हणजे एकदम मरणें हें बरें असें त्यांना वाटतें. कारण हल्लींच्या समाजस्थितींत विधवांना दररोज इंचाइंचांनीं मरण्याचा प्रसंग येत आहे. हिंदुसमाजांत विधवांचा हा छळ म्हणजे मोठा अन्याय आहे. विधवांचा वर्ग चांगला असतांना व तो समाजकार्याला उपयुक्त असतांना, समाज त्यांचा उपयोग तर करून घेत नाहींच; उलट अगदीं कोत्या दृष्टीनें त्यांचेकडे पाहतो ! हिंदुसमाजानें समाजबल वाढविण्याकरितां विधवांकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलला पाहिजे.

हिंदुसमाजांतील कांहीं जातींमध्यें वपनाची चाल आहे. ही चाल आमच्या मतें बुद्धोत्तर कालांतील आहे. वपनाबद्दल मनु, याज्ञवल्क्य, पराशर, इत्यादि प्रसिद्ध स्मृतींमध्यें एकहि वचन नाहीं. एकट्या व्यासस्मृतींत असें वचन आहे. '**जीवन्ती चेत् त्यक्तकेशा तपसा शोधयेत् वपुः ॥**' निर्णयसिंधूमध्यें व धर्मसिंधूमध्यें वपनाला अनुकूल अशीं कांहीं वचनें सांपडतात. परंतु प्रतिकूल वचनेंहि पुष्कळ मिळतात. महाभारतांत कौरवांच्या विधवांचें जें वर्णन आहे, अथवा कुंतीचें जें वर्णन आहे, त्यांत वपनाचा उल्लेख नाहीं. बाणभट्टाच्या हर्षचरित्रांत '**वध्नातु वैधव्यवेणीम्**' असा वाक्यप्रयोग आहे. यावरून वपनाचा विकल्प दिसतो व तशीं स्मृतींत वाक्येंहि आहेत.

## विधवावपनाबद्दल प्रतिकूल वचनें

**जन्मरोमाणि या नारी क्षौरकर्म समाचरेत् ।**
**कन्या वा विधवा वापि रौरवं नरकं व्रजेत्** ॥ शंखस्मृति ॥
**नाचरेद्वपनं स्त्रीणामष्टादशसु कर्मसु ।**
**कन्यानां विधवानां चेदित्येवं मनुरब्रवीत्** ॥ वृद्धमनुः ॥
**साध्वीनामिह नारीणामग्निप्रपतनादृते ।**
**नान्यो धर्मोऽस्ति विज्ञेयो मृते भर्तरि कुत्रचित् ॥**
**गर्भिणी नानुगंतव्या मृतं भर्तारमव्ययम् ।**
**ब्रह्मचर्यव्रतं कुर्याद्यावज्जीवमतंद्रिता ॥**
**केशरंजनतांबूलगंधपुष्पादिसेवनम् ।**
**भूषणं रंगवस्त्रं च कांस्यपात्रेषु भोजनम्** ॥ वृद्धहारीतः ॥

हिंदुसमाजानें विधवांना कामें देऊन त्यांचा उपयोग करून घेतला पाहिजे. विधवांच्या वृत्तीला साजेशीं कामें त्यांना मिळालीं, त्या निर्भय वृत्तीनें वागूं लागल्या, म्हणजे समाजाला त्यांचेपासून चांगला फायदा होईल. कित्येक विधवा मोक्षाच्या मार्गास लागतात व त्याकरितां मोक्ष-गुरु हुडकीत बसतात. कित्येक घरेंदारें सोडून तीर्थयात्रांतच जन्म घालवितात व कित्येक मरणाचीच वाट पहातात. अशा विधवांच्या हातीं मुलांमुलींचें प्राथमिक शिक्षण द्यावयास पाहिजे. इंग्लंड व इतर उदयोन्मुख राष्ट्रांमध्यें ज्या प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाच्या शाळा म्हणजे कौंटीस्कूल्स आहेत, तशा संस्था इकडे काढून तेथील मातृस्थानांतर्गत गणिल्या गेलेल्या कार्याची जबाबदारी जर कुलीन विधवांनीं घेतली तर किती बरें उपयोग होईल ? हिंदुसमाजांतील विधवा संस्कृतीनें उच्च आणि वृत्तीनें सात्त्विक असतात. त्यांच्या नाजूक अंतःकरणाला योग्य असें फक्त शिक्षणाचेंच काम आहे. हल्लीं शिक्षण हें अत्यंत जरुरीचें झालें असल्यामुळें पुष्कळ हिंदु पालकांना आपल्या मुली संस्कृति व अभिमानशून्य अशा अध्यापिकांच्या शाळेंत डोळ्यांवर कातडें ओढून पाठविण्याचा प्रसंग येतो ! वास्तविक असल्या शाळांत मुली पाठविण्यापेक्षां त्या न पाठविल्या तरी चालतील. हिंदुसमाजानें विधवांचा प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणाकडे उपयोग करून घेतल्यास विधवांना पवित्र काम मिळेल, मानानें राहातां येईल, आणि प्रसन्न वृत्तीनें कोणावर भार न घालतां उदरभरण करितां येईल. पतीच्या मरणानंतर कित्येक विधवांना हातांत पोळपाट लाटणें घेऊन घरोघरीं स्वयंपाक करीत हिंडण्याचा जो प्रसंग येतो तो या व्यवस्थेनें आपोआप टळेल.

अध्यापनाप्रमाणें वैद्यकीचा धंदा विधवांनीं केल्यास त्यांचाहि उपयोग हिंदुसमाजाचें बळ वाढविण्याकरितांच होणार आहे. हिंदु विधवांना आर्य व आंग्ल वैद्यकीचें शिक्षण द्यावें, वृद्ध स्त्रियांकडून त्यांनीं परंपरेनें आलेलें वैद्यकज्ञान मिळवावें आणि स्त्रिया व मुलें यांच्या आरोग्याचें काम आपणांकडे सर्वस्वीं विभागून घ्यावें. पूर्वींच्या म्हाताऱ्या-कोताऱ्या आजीबाई सांगशी, बटवा या साधनांनीं बऱ्याच रोगांना हद्दपार करीत व बाळंतिणी सोडवीत. स्त्रियांच्या बहुतेक रोगांची चिकित्सा स्त्रीवैद्यांकडूनच चांगली होते. त्यांना पुरुषांपुढें केव्हांहि आपल्या रोगांचा संकोचच करावासा वाटतो. घरांतील स्वच्छता, अन्न, हवापाणी, मुलांचे व मुलींचे व्यायाम, नेमस्तपणा इत्यादि आरोग्यशास्त्रांतर्गत विषयांवर

स्त्रीवैद्यांचीं घरोघरीं नसलीं तरी आळोआळीं व्याख्यानें व्हावींत. त्यांनीं लहान लहान पुस्तकें विविध विषयांवर मुलांना व मुलींना सहज समजतील अशा भाषेंत लिहावींत व अनेक उपाय योजून आरोग्यवृद्धीस साह्य करावें. अलीकडे स्त्रियांमध्यें आरोग्याच्या बाबतींत इतकें अज्ञान वाढूं लागलें आहे कीं, मुलाला सामान्य पडसें, खोकला, ताप आला तरी घरगुती उपचारानें त्याला बरें करण्याची वृत्ति दिसून येत नाहीं. उलट उठल्यासुटल्या डॉक्टरकडे पळत सुटण्याची आणि सात महिन्यांच्या मुलाच्या घशांत ७००० मैलांवरचें औषध ओतण्याची संवय जडून गेली आहे. हिंदु विधवांकडून जर स्त्रियांच्या वैद्यकीय कार्यांत भर पडेल आणि माता आपल्या घरीं सामान्य गृहवैद्यांचें काम करूं लागतील तर अतिशय चांगलें होईल. विधवांचा उपयोग अनाथालयांमध्यें करून घ्यावा. सांप्रत हिंदुसमाजाला या अनाथालयांची तीव्रतेनें वाण भासत आहे. अशा संस्थांत निराश्रित विधवा, पोरकीं अर्भकें व मुलेंहि परधर्मीयांच्या तावडींतून निसटलेलीं असतात, त्यांचें संगोपन मातृसदृश वात्सल्यानें करण्याकरितां विधवांशिवाय दुसरें योग्य असें मनुष्य क्वचितच आढळेल. अनाथालयांप्रमाणें रुग्णगृहांत विधवांचा उपयोग होईल. रुग्णशुश्रूषेला या परिचारिका मिळाल्या म्हणजे प्रेमानें औषध देणें घेणें होऊन रोग्याला एक प्रकारची प्रेमळ आणि सात्त्विक मदत मिळेल. विधवांना स्वाभाविक घरगुती कौशल्याची आवड असते म्हणून कित्येक घरगुती कौशल्याचे धंदे त्यांना शिकवावेत. सूत कांतणें, पांजण देणें, कशिदा काढणें, खडी काढणें, शिवणकाम करणें, मंडोळ्या करणें, मातीचीं चित्रें करणें, कातरकाम करून मुलांचीं खेळणीं तयार करणें, तसबिरांना चौकटी बसविणें, चित्रें काढणें, पायमोजे व गळपट्टे विणणें, उदबत्त्या वळणें, जानवीं तयार करणें, धान्य उत्तम निवडून देणें, मसाले, लोणचीं तयार करून देणें अशीं कितीतरी कामें सांगतां येण्यासारखीं आहेत आणि तीं विधवांच्याकडून उत्तम तऱ्हेनें होण्यासारखीं आहेत. हिंदुसमाजाचें बळ वाढण्याकरितां अस्पृश्यतेचें उच्चाटण, शुद्धीचें संवर्धन, ब्राह्मणेतरवादाचें निर्मूलन, पोटजातींचें एकीकरण इ० झालेंच पाहिजे. म्हणून त्यांच्या विवेचनाकडे वळतों.

---

# प्रकरण चवथें

## समाजबलविचार

### अस्पृश्यतेचें उच्चाटण

हिंदुसमाजाला धर्म, समाज व राष्ट्रदृष्ट्या सामर्थ्यवान् होण्याकरितां अस्पृश्य वर्गाच्या अस्पृश्यतेचें उच्चाटण अत्यावश्य केलें पाहिजे. अस्पृश्य या नांवानें वावरणारा सुमारें ५ कोटी समाज आज हिंदुसमाजांत आहे. त्याला यापुढें याच स्थितींत ठेवून लोकशाहीचें स्वराज्य संपादन करतां येणार नाहीं आणि हिंदु या दृष्टीनें समाजबलहि वाढवितां येणार नाहीं. यास्तव अस्पृश्य वर्गाचा विटाळ घालवून त्यांच्या उन्नतीचा मार्ग मोकळा करणें हें हिंदुसमाजाचें कर्तव्य आहे.

अस्पृश्यता-निवारणाला महात्मा गांधींनीं १९२० सालापासून जबरदस्त चालना दिली. राष्ट्रीय महासभेनें व हिंदु महासभेनें हा विषय आपल्या कार्यक्षेत्रांत घेतल्यामुळें गेल्या दहा वर्षांत हा प्रश्न बव्हंशीं सुटत आलेला आहे. महाराष्ट्रामध्यें श्रीयुत शिंदे, माटे, हिंदुधर्मपरिषदा आणि देशकालज्ञ पंडितवर्ग यांच्या प्रयत्नामुळें हा प्रश्न सुटत चाललेला आहे. एका दृष्टीनें हा प्रश्न लोकांपुढें गेल्या दहा वर्षांतच आला असला, तथापि महाराष्ट्रामध्यें १८८० सालापूर्वींपासून हा प्रश्न सोडविण्याचा यत्न होत आहे. उदाहरणार्थ ब्रम्हचारी विष्णुबुवा गोखले हे अस्पृश्यांविषयीं जे विचार आपण आज बोलतों ते सर्व बोलून गेलेले आहेत. थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, स्पृश्य वर्गाचें लक्ष या विषयाकडे बहुत दिवसांपासून आहे.

ज्यांचा विटाळ घालवावयाचा व ज्यांनीं विटाळ घालवावयाचा त्या दोघांमध्यें जागृति झाली पाहिजे. त्याप्रमाणें अस्पृश्य लोकांतहि अस्पृश्यतानिवारणासंबंधीं सांप्रत जागृति उत्पन्न झाली आहे. अस्पृश्यांचे पुढारीहि आतां बोलूं लागले आहेत. मात्र त्यांनीं हें काम स्पृश्यांकडून करवून घ्यावयाचें आहे हें लक्षांत ठेवावें. दुसऱ्याकडून एखादें काम त्याच्या मनाप्रमाणें वागूनच करवून घेतां येतें, हा व्यवहार लक्षांत न घेतां अस्पृश्य जर धमक्या देऊं लागले कीं, " आम्ही स्वतंत्र राष्ट्र आहोंत, आम्हांला स्वतंत्र मतदारसंघ पाहिजे, आम्हांला बरोबरीचे हक्क पाहिजेत, हिंदूंशीं आम्हांला कांहीं कर्तव्य नाहीं, अमुक दिवसांत हिंदु

लोक आमच्या मागण्या पुऱ्या न करतील तर आम्ही मुसलमान होऊं, " तर अस्पृश्यतेचें उच्चाटण होण्याच्या मार्गांत बरींच विघ्नें उपस्थित होतील. आम्हीं धर्म सोडून जाऊं, " यंव करूं त्यंव करूं " अशा भाषेनें अस्पृश्यता कधींहि जाणार नाहीं. हजारों वर्षांचे संस्कार गेल्या दहा वर्षांत पुष्कळ कमी झालेले आहेत व लौकरच ते नष्ट होतील अशा दृढ विश्वासानें अस्पृश्यांनीं यत्न केला पाहिजे. बायकोनें नवऱ्याला " अमुक दिवसांत इतके दागिने न दिल्यास मी पतिव्रताधर्मानें राहणार नाहीं, " अशी नोटीस दिली तर ती शहाणपणाची होईल काय ? मुलानें बापाला किंवा विद्यार्थ्यानें शिक्षकाला नोटीस दिली कीं, " इतकें द्रव्य मजकरतां ठेवशील तर मी तुझा मुलगा, नाहींतर मी तुझा मुलगा नाहीं, " किंवा " अमुक दिवसांत इतका विषय मला आला तरच तुम्ही खरे गुरु, नाहींतर तुम्ही खरे शिक्षक नव्हे, " अशा नोटिसा देणें हें जितकें गर्हणीय आहे तितकेंच अस्पृश्यांचें बडबडणेंहि वेडगळ आहे. धर्म हा दुसऱ्याकरितां **मोबदल्याच्या अपेक्षेनें कांहीं व्यापार म्हणून केव्हांहि आचरणांत आणावयाचा नसतो. धर्माचें क्षेत्र अत्यंत पवित्र, निर्मल, उज्ज्वल असें समजून प्रत्येकानें आपापल्या धर्मानें स्वधर्माचरण करीत राहावयाचें असतें.**

स्पृश्य व अस्पृश्य वर्गांनीं अस्पृश्यतेचें उच्चाटण करण्याकरितां प्रथम या विषयाचें स्वरूप निश्चित केलें पाहिजे. नाहींतर कुठें अतिव्याप्ति तर कुठें अव्याप्ति यांमुळें गोंधळ होतो. अस्पृश्यतेचें उच्चाटण म्हणजे अस्पृश्य मानल्या गेलेल्या वर्गाच्या शिवाशिवीचें किंवा **विटाळाचें उच्चाटण होय**. शिवाशीव घालविण्यापलीकडे ह्यांत कोणताहि विषय अंतर्भूत होत नाहीं. अस्पृश्य वर्गाला आज तीनचार ठिकाणची अस्पृश्यता फार नडते. तेवढी घालविली म्हणजे विषय संपला. (१) सार्वजनिक स्थळीं व सामुदायिक प्रसंगीं ( शाळा, सभा, उत्सव वगैरे ) अस्पृश्यांचा विटाळ न मानणें. (२) सार्वजनिक पाणवठे, विहिरी व तलाव यांवर त्यांना पाणी भरण्याची मोकळीक देणें. (३) घरामध्यें ख्रिश्चन व मुसलमान यांपेक्षां अस्पृश्यांशीं आपलेपणानें वागणें. (४) सार्वजनिक देवालयांमध्यें गाभाऱ्याबाहेरून सर्वांबरोबर देवदर्शनार्थ अस्पृश्यांचा प्रवेश होणें.

वरील चार प्रकारांशिवाय अस्पृश्यतेच्या उच्चाटणामध्यें अन्नोदक अगर जाती मोडणें यांपैकीं कोणताहि विषय येऊं शकत नाहीं. जाती मोडण्याची चळवळ

ज्यांना कर्तव्य असेल त्यांनीं ती स्वतंत्र करावी. पण या विषयांत तो विषय घुसडूं नये. अस्पृश्यांतील कांहीं बहकलेले पुढारी असें म्हणतात कीं, शालजोडी-वाला शास्त्री व कंगणीदार पगडीवाला मराठा हे ज्या दिवशीं अस्पृश्यांना आपल्या मुली देतील त्याच दिवशीं अस्पृश्यता गेली असें आम्ही समजूं. पण हें म्हणणें इतकें मूर्खपणाचें आहे कीं, त्याला उत्तर देण्याइतकेंहि तें महत्त्वाचें नाहीं. चांभार महाराचा विटाळ मानतो. महार मांगाचा विटाळ मानतो. तेली व न्हावी सकाळीं एकमेकांचें तोंड पाहाणें अशुभ मानतात. जैन व लिंगाइत, पाण्यास ब्राह्मण शिवला तर जोंवर विटाळ मानतात, तोंवर अशा भाषा बोलणें म्हणजे हिंदुसमाजाच्या गाढ अज्ञानाचें निदर्शक होय. मुख्य मुद्दा स्पष्ट करावयाचा तो हाच कीं, **जाती मोडण्याची चळवळ स्वतंत्र आहे. ती अस्पृश्यतानिवारणामध्यें बिलकूल अंतर्भूत होत नाहीं.**

जाती मोडण्याची भाषा व मुसलमान होण्याच्या धमकावणीची भाषा या दोन्ही एकच होत. स्पृश्य हिंदुसमाज याला केव्हांहि किंमत देत नाहीं. सर्व जाती मोडून एकंकार करण्याची भाषा चार्वाकापासून चालली आहे. अलीकडे अव्वल इंग्रजीपासून तों गायकवाडवाड्यांतील आयडियल क्लबापर्यंत जाती मोडण्याची भाषा चालूच आहे. अस्पृश्यांतील पुढारी आज तीच भाषा बोलत आहेत. कारण त्यांत त्यांचा स्वार्थ आहे. स्पृश्यांच्या स्वार्थापेक्षां अस्पृश्यांचा स्वार्थ जाती मोडल्यानें अधिक साधला जाईल अशा आशेनें अस्पृश्य पुढारी जाती मोडण्याची भाषा बोलतात. परंतु त्यांनीं हें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, या चळवळींत सामील झाल्यास त्यांचें भयंकर नुकसान होणार आहे. स्पृश्यांनीं अस्पृश्यांना स्पष्ट बजावलेंच पाहिजे कीं, "आम्ही फक्त तुमचा विटाळ घालवूं. कारण तो तुमच्या उन्नतीच्या आड येतो. हें तुम्हांस मान्य नसेल तर तुम्ही खुशाल मुसलमान व्हा, ख्रिश्चन व्हा किंवा पाहिजे ते व्हा. उद्यां मुसलमान होत असाल तर आजच व्हा. पूर्वीच्या आमच्या चार शत्रूंत तुमची एक भर." हिंदुसमाज हा असा स्थाणु पुरुष आहे कीं, तो आतां कोणत्याहि भाषेला भिणार नाहीं व कर्तव्यहि सोडणार नाहीं.

•अस्पृश्यतेचें उच्चाटन करण्याकरितां अस्पृश्यांनीं प्रथम आपल्यांतील विटाळ अजिबात नष्ट करावा. आपल्या लोकांना चांगलें राहाणें, चांगलें वागणें, स्वच्छता व टापटीप हे गुण त्यांनीं शिकविले पाहिजेत. अस्पृश्यांपैकीं पुष्कळ लोक मेलेल्या

जनावरांचें मांस खातात. हें मुरदाड मांस खाणें त्यांनीं सोडून दिलें पाहिजे. स्वच्छता, स्नानशीलता यांचा अवलंब करून अस्पृश्य वर्गांतील स्त्रिया व मुलें यांच्यामध्यें ज्या ओंगळ व अत्यंत घाणेरड्या चाली आहेत, त्या नाहींतशा केल्या पाहिजेत. स्पृश्य लोकांमध्यें जी स्वच्छता व टापटीप दिसते, तशी स्वच्छता आपल्या समाजांत उत्पन्न व्हावी म्हणून त्याबद्दल आवड उत्पन्न केली पाहिजे. ही आवड शिक्षणानें उत्पन्न होते. शिक्षणानें मन सुसंस्कृत होऊन शिष्टता, सभ्यता, सौजन्य यांचें ज्ञान होऊन वृत्तीमध्यें फरक पडतो. ख्रिश्चन मिशनरी लोक ज्या पद्धतीनें अस्पृश्यांची उन्नति करतात त्याच पद्धतीनें अस्पृश्यांनीं आपली उन्नति स्पृश्यांच्या साहाय्यानें करून घेतली पाहिजे. रात्रीच्या शाळा, विद्यालयें, वसतिगृहें, अनाथालयें, अशा अनेक संस्थांच्या द्वारें यांनीं आपली उन्नति करून घेतली पाहिजे. शिक्षणाबरोबर व्यवसायांतहि बदल करून राहाणी सुधारली पाहिजे.

धंद्याचा व स्वच्छतेचा बराच जवळचा संबंध आहे. अस्पृश्यांपैकीं कांहींचा निर्वाह पूर्वीच्या धंद्यांवर होतो. महार वतनावर कसाबसा जगतो. चांभाराचा धंदा त्याला पोटापुरेसें देतो. तथापि परदेशी दोरखंडें, जोडे व बूट यांनीं चांभारांचे व मांगांचे धंदे जवळजवळ बसविलेच आहेत. म्हणून त्यांनीं पखाल वाहाणें, कल्हई करणें, बँड, ताशे वगैरे वाद्यें वाजविणें, पिण्याची आणि शोभेची दारू विकणें, भाजी व फळें विकणें, पटनेगार, मणेरी, बागवान, बोहरी इत्यादि झाडून सर्व धंदे आपल्या हातीं घेतले तर त्यांची सांपत्तिक स्थिति सुधारेल आणि अस्पृश्यता नष्ट होण्यास पुष्कळ मदत होईल. हे अनेक धंदे स्पृश्यांशीं अधिक दळणवळण वाढविणारे आहेत. हे धंदे थोडक्या भांडवलावर होऊं शकतात म्हणून अस्पृश्यांनीं ते संघटित होऊन बळकावले पाहिजेत. नागपूर सिताबर्डी येथें भाजी विकणाऱ्या सर्व माळणी अस्पृश्य आहेत व स्टेशनवर सर्व हमाल महार आहेत. श्रीक्षेत्र काशी येथें अस्पृश्य लोक टांगेवाले आहेत. त्याचप्रमाणें अकोल्यास व इतरत्र अस्पृश्य लोक बँडचा धंदा करितात. हल्लीं पुष्कळ अहिंदु जे व्यवसाय करितात ते त्यांनीं करून स्पृश्य लोकांशीं त्या द्वारानें संबंध अधिक आणला पाहिजे. किंबहुना धंदेवाले या दृष्टीनें त्यांचीं घरें स्पृश्यांच्या वस्तींत झालीं तथापि कोणी नाकें मुरडणार नाहीं. आणि दुसरी कसली हरकतहि उपस्थित करणार नाहीं. गांवाबाहेरचे महारवाडे कायदा करून उठवावे असें कांहीं म्हणतात. परंतु कायद्यापेक्षां व्यवसायांत बदल करून रहाणी सुधारून तें काम सुलभ होईल.

धंदेवाला म्हणून रुबाबदारपणें अस्पृश्य जरी घरीं आला तरी त्याचें कांहीं वाटत नाहीं. ही वस्तुस्थिति ध्यानांत घेऊन अस्पृश्यांतील शिकलेल्या पुढाऱ्यांनीं केवळ संकुचित दृष्टीनें जातिहित न पहातां राष्ट्रीय दृष्टीनें आपल्या उद्धाराचा अवश्य यत्न करावा. उत्तम राहाणी, सज्जनपणाचें शिक्षण, सुविचारी वर्तन, राष्ट्रहिताची दृष्टि, व्यवसायांत बदल ह्या साधनांनीं अस्पृश्यांच्या अस्पृश्यतेचें उच्चाटण अति त्वरित होईल. म्हणून त्यांनीं या साधनांचा अविलंबें करून स्वीकार करावा. येथवर अस्पृश्यांनीं त्यांच्या अस्पृश्यतेचें उच्चाटण व्हावें म्हणून काय काय केलें पाहिजे हें सांगितलें. आतां स्पृश्यांनीं अस्पृश्यता कशी नष्ट करावी या विवेचनाकडे वळतों.

स्पृश्यांनीं प्रथम ईश्वराचा न्याय लक्षांत ठेवला पाहिजे तो हा कीं, मनुष्य प्राणी पशुपक्ष्यांपेक्षां श्रेष्ठ आहे. परमेश्वरानें विविध प्रकारचे प्राणी उत्पन्न केले, परंतु त्याला बरें वाटेना; शेवटीं जेव्हां त्यानें मनुष्य निर्माण केला तेव्हां त्याला आनंद झाला, अशी कथा भागवतांत (ब्रह्मावलोकधिषणं मुदमाप देवः ।) आहे. अस्पृश्य लोक हीं जर ईश्वरनिर्मित माणसें आहेत तर त्यांना कुत्रीं, मांजरें, कावळे यांपेक्षां तिरस्कारानें वागविणें योग्य आहे काय ? मनुष्य पशुपक्ष्यांना त्यांच्या गुणावर मोहित होऊन जवळ करितो, तर अस्पृश्यांच्या मनुष्यत्वाचा विचार करून त्यांना तिरस्कारनें वागविणें अयोग्य नाहीं काय ? स्पृश्यांनीं यापुढें तरी ईश्वरी नियमांचें उल्लंघन करून अधिक पाप जोडूं नये. कारण मनुष्याला ईश्वर होण्याची योग्यता ईश्वरानें दिली आहे व शास्त्र तर मनुष्याला असें सांगतें कीं, तूं ईश्वर आहेस, ब्रह्म आहेस, तेव्हां चिदंश असलेल्या मनुष्याचा तिरस्कार म्हणजे परंपरेनें ईश्वराचाच तिरस्कार नव्हे काय ? ईश्वर होण्यास योग्य अशा अस्पृश्यांचा तिरस्कार यापुढें न करणें हेंच पुण्य आहे.

स्पृश्यांनीं हें लक्ष्यांत ठेवलेंच पाहिजे कीं, अस्पृश्य हे हिंदु आहेत, ते आपले आहेत व आपल्या सारखींच तीं माणसें आहेत. माणसानें माणसाशीं कसें वागावें याबद्दलचें शास्त्र मानवजातीनें उत्पन्न केलें आहे. त्याप्रमाणें अस्पृश्यांशीं स्पृश्यांनीं वागलें पाहिजे. मान, अपमान, आदर, तिरस्कार, या वृत्ती ईश्वरानें त्यांच्या ठिकाणींहि उत्पन्न केलेल्या आहेत असें समजावयास पाहिजे. आपला कुणीं अपमान केला, कुत्र्याप्रमाणें आधिक्षेप केला, जोडयाजवळ कुणीं आपणाला उभें राहूं दिलें नाहीं तर कसें बरें वाटतें ? या दुःखाचें स्मरण ठेवून दुसऱ्याच्या दुःखाशीं तद्रूप होऊन तें नष्ट करण्याचा विचार केला पाहिजे. समर्थ म्हणतात, " आपणास

चिमोटा घेतला । तेणें प्राण कासावीस झाला । आपणावरूनि दुसऱ्याला, पाहात जावें ।" तुकोब्बाराय म्हणतात, ' **जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे.** ' 'आपणावरून जग ओळखावें ' या लौकिक म्हणींतहि हाच अर्थ भरलेला आहे. बालविधवेच्या दुःखाची कल्पना मुलीवर अगर सुनेवर जेव्हां प्रसंग येतो तेव्हांच चांगली येते. नाहीं तर ' परदुःख शीतळ ' या म्हणीप्रमाणें मनुष्य अनुदारतेनें वागत असतो. त्याचप्रमाणें अस्पृश्यांच्या दुःखाची कल्पना स्वतः एक दिवस आपण अस्पृश्य आहोंत असें समजून वागल्यानें चांगली येईल. जेथें तेथें छी थू, अपमान, तिरस्कार, अरेतुरे ही भाषा! यांचा वर्षाव झाला म्हणजे दुःख कसें काय आहे हें समजेल. तात्पर्य, स्पृश्यांनीं या विषयाचा विचार तद्रूप होऊन केला पाहिजे.

स्पृश्य वर्गानें दुसरी गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती ही कीं, हे पांच कोट अस्पृश्य हिंदु आहेत, हिंदु संस्कृतीचे आहेत व आपल्याच हाडामासाचे व रक्ताचे हे लोक आहेत. "आम्हांस काय त्याचें," " मरूं द्या ते तिकडे, " ही परधार्जिणी घरबुडवी उदासीनतेची वृत्ति या कामीं अनर्थकारक आहे. उदासीनता हा हिंदुसमाजाचा मोठा दुर्गुण आहे व त्याचा फायदा विधर्मी लोक सारखा घेत आहेत. घरांत सर्वत्र लक्ष नसलें कीं उंदीर व घुशी यांचें फावतें आणि घरांत पडझड होते. अत्यंत बेसावधपणें घरचा मालक वागूं लागला तर चोरांचे उदरीं शनी येतो. लहानपणीं आईबापांनीं मुलांच्या दातांची हेळसांड केली तर त्या पोरांना जन्माचें अधूपण सोसावें लागतें. तात्पर्य, असावधता व उदासीनता यांचे परिणाम फार दूरवर जात असतात हें लक्ष्यांत ठेवून स्पृश्य हिंदूंनीं अस्पृश्यतेचें उच्चाटण लगबगीनें केलें पाहिजे.

हिंदुस्थानांत ख्रिश्चन व मुसलमान हे जे दोन समाज आहेत त्यांचें लक्ष्य या वर्गाकडे फारच आहे, ही तिसरी गोष्ट स्पृश्यांनीं विसरतां कामा नये. मिशनरी लोक शाळा काढून, औषधें देऊन, शिक्षण व सभ्याचार शिकवून या वर्गांतून पुष्कळ माणसें आपल्या समाजांत ओढत आहेत. शिक्षण दिलें, औषध देऊन उपकार केला, अडल्या वेळीं साह्य केलें कीं, कोण मनुष्य कृतज्ञ होणार नाहीं ? अर्थात् या कृतज्ञतेचा अतिरेक धर्मांतरांत होत असतो. ही गोष्ट डोळ्याआड करण्याजोगी नाहीं. ख्रिश्चन मिशनऱ्यांचे अस्पृश्यांच्या उन्नतीबद्दलचे प्रयत्न प्रशंसनीयच आहेत. फक्त धर्मांतराच्या काळ्या डागानें त्यांचे हेतु कलंकित झालेले आहेत येवढेंच. सभ्यता, शिष्टाचार, सनदशीरपणा यांच्याशीं फारकत करून

मुसलमानांचेहि यत्न हा वर्ग आत्मसात करण्याविषयीं सदैव चालू आहेत. फाटक्या तुटक्या मुसलमानापासून तों जीना, महंमदअल्लीपर्यंत सर्वांची विचारसरणी अगदीं एकाच साच्याची आहे. दिल्लीचे ख्वाजा हसन निजामी यांनीं एक कोट हिंदूंना अहिंदु करण्याची म्हणे प्रतिज्ञा केली, असें वृत्तपत्रांत जाहीर झालें आहे. निझामीसाहेबांची ही प्रतिज्ञा अस्पृश्य वर्गाच्या उद्धारावांचून केव्हांच पूर्ण होणार नाहीं ! ! महात्मा गांधींच्या प्रभावळींत एका काळीं मिरवलेले महंमदअल्ली कोकोनाडा येथें राष्ट्रीय महासभेच्या व्यासपीठावरून घोषणा करतात कीं, “अस्पृश्यता नष्ट करण्याकरितां श्रमविभागाच्या तत्त्वावर निम्मेनिम्मे अस्पृश्य आपण वाटून घेऊं ! !” २॥ कोट अस्पृश्यांना स्पृश्य करण्याकरितां त्यांना इस्लामी धर्माची दीक्षा देणें हा एकमेवाद्वितीय मार्गच त्यांना पथ्यकर वाटतो. या उद्दाम घोषणेंत महंमदअल्लींचें व त्या समाजाचें अंतःकरण किती काळेंकुट्ट झालेलें आहे हें स्पष्ट दिसतें. राष्ट्रीय महासभेच्या मुसलमान अध्यक्षाची जर ही वृत्ति तर लुग्यासुग्याचे विचार किती क्षुद्र व भयंकर असूं शकतील याची कल्पना वाचकांनींच करावी.

अस्पृश्य हे मुसलमान किंवा ख्रिश्चन होऊन हिंदुसमाजाशेजारीं राहाण्यापेक्षां ते स्पृश्य होऊन हिंदुसमाजांत राहाणें सर्वथैव इष्ट आहे. गोरक्षक बरा कां गोभक्षक बरा ? गायखाऊ इष्ट कां सायखाऊ इष्ट याचा विचार तारतम्यानें स्पृश्य हिंदूंनीं मनापासून केला पाहिजे. एक अस्तनींतील निखारा होऊन हिंदु संस्कृतीच्या मंदिराला आग लावण्यास उद्युक्त होतो, तर दुसरा आर्यसंस्कृतीच्या रक्षणार्थ प्राणदानहि करितो. येवढें जमीनअस्मानाचें अंतर म्लेंच्छ होतांच ज्यांच्या वृत्तींत दिसतें त्यांची वसाहत शेजारीं असण्यापेक्षां अस्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट करणेंच इष्ट नाहीं काय ? शिवाय न्यायान्याय व युक्तायुक्तता यांचाहि विचार केलाच पाहिजे. मोरू महाराचा मॉरिससाहेब होतांच किंवा मीरखान होतांच त्याचा जर विटाळ जातो तर मोरू महार मोरयाचा भक्त असतांना त्याचा विटाळ कां न जावा? ग्यान्या चांभाराचा ग्यानुद्दीन झाला तर तो चालतो किंवा जॉन्सन झाला तर तें पत्करतें. पण ग्यान्या हा ज्ञानदेवांचा भक्त असतां त्याचा विटाळ जात नाहीं हा अन्याय नव्हे काय ? हा अन्याय स्पृश्य हिंदुसमाजानें आजवर केला आहे, तो आतां जमीनदोस्त करावयास नको काय ? ख्रिश्चन व मुसलमान होण्यांत प्रत्यक्ष फायदा दिसत असतां जे अस्पृश्य हिंदु राहिले तेच धन्य होत ! हिंदु या

शब्दाला व हिंदुत्व या नात्याला जे कित्येक हजार वर्षें अनेक आपत्तींना तोंड देऊन चिकटून राहिले त्यांचा उद्धार शिवाशीव घालवून आतां स्पृश्यांनीं केलाच पाहिजे. पतीपेक्षां पतिव्रतेची किंमत श्रेष्ठ असते. मानाची चाड न ठेवतां अपमान, त्रास, दुःख, गांजणूक, सासुरवास हीं सर्व विषें घोटींत घोटींत जी पतीच्या सेवेंत शरिरानें व मनानें तत्पर असते तीच पतिव्रता धन्यवादाला पात्र असते. ह्या दृष्टीनें विचार केल्यास **स्पृश्यांपेक्षां अस्पृश्यांची किंमत धार्मिक दृष्ट्या अधिक ठरते.** कारण स्पृश्य वर्ग आपल्या सर्व आकांक्षांना क्षेत्र होतें म्हणून तो हिंदु राहिला व त्यानें हिंदुधर्माचें रक्षण केलें, परंतु अस्पृश्य वर्गाला **मानवी आकांक्षा बाजूस ठेवून हिंदुपणाची ज्योत तेवत ठेवावी लागली** ही वृत्ति कांहीं कमी तेजस्वी आहे काय ?

स्पृश्य हिंदूंनीं चौथी व मुख्य गोष्ट ध्यानीं धरावी कीं, धर्मरक्षणाला चातुर्वर्ण्यवान् राजा असावा लागतो व सत्तेमुळेंच प्रजा आपापल्या धर्माप्रमाणें वागतात. परंतु आज तशी स्थिति नाहीं. हल्लीं राज्ययंत्र पालटल्यामुळें घराबाहेर आपली कसलीहि सत्ता चालत नाहीं. धर्मसत्ता स्वतःच्या आचरणापुरती जेवढी चालवितां येईल तेवढी खुशाल चालवावी. घराबाहेर राज्यसत्तेनें धर्मसत्तेला पादाक्रांत करून सोडल्यामुळें तेथें त्या व्यवहाराप्रमाणेंच वागलें पाहिजे. घराबाहेर " तूं बाजूला हो, शिवूं नकोस, " असें म्हणण्याची सोय नाहीं. **कारण कायद्यानें हा गुन्हा ठरतो.** वाई क्षेत्रांत मोटेशास्त्र्यांना, एका मिशनऱ्याला 'तूं शिवूं नकोस ' असें म्हटल्याबद्दल लीवॉनिरसाहेबांपुढें खटला चालून पूर्वीं शिक्षा झाली होती हें सर्वश्रुत आहे. पांच कोट अस्पृश्यांना बाजूला ठेवून हिंदुसमाजाचा क्षय वाढणार नाहीं काय ? तो क्षीण होणार नाहीं काय ? अस्पृश्य हे अनार्य, आहेत, घाणेरडे आहेत, धर्मभ्रष्ट पतित आहेत संकरोत्पन्न आहेत असें त्यांच्याबद्दल कांहींहि पूर्वपक्ष असले व इतर कितीहि मतें असलीं तरी त्यांना तितकींच प्रबल उत्तरेंहि आहेत. घाणेरड्यांना शुद्ध करितां येतें, अनार्य हे आर्यांच्या सत्सन्निकर्षानें उच्च स्थितीला जातात, धर्मभ्रष्ट पतितांना प्रायश्चित्त देऊन शुद्ध करतां येतें. मग बिचाऱ्या हिंदुस्थानांतल्याच अस्पृश्यांना सार्वजनिक व सामुदायिक ठिकाणीं स्पृश्य करितां येणें दुरापास्त आहे काय ? इच्छा असली कीं मार्ग सुचतो. शास्त्रपरंपरेचें धोरण पाहिलें तर शास्त्रार्थहि सांपडतात, हें लक्षांत घेऊन अस्पृश्यतानिवारण केलें पाहिजे.

हिंदुसमाज समर्थ होण्याकरितां अस्पृश्यतेचें उच्चाटण केलें पाहिजे ही गोष्ट आतां बऱ्याच लोकांना पटूं लागली आहे. परंतु हिंदु जनता बरीचशी अजाण व अडाणी आहे, म्हणून तिला आजवर चालत आलेली रूढी बदलणें कठीण वाटतें इतकेंच. तथापि शास्त्रकारांचें विटाळ, शिवाशीव व सोवळेंओवळें या बाबतींत एकंदरींत जें धोरण दिसतें तेंच यापुढें अनुसरण्यास पाहिजे. अनेक प्रकारचे विटाळ हे बुद्धोत्तर काळांत उत्पन्न झाले. समाजाची जेव्हां प्रतिकार-क्षमता नष्ट झाली त्याच वेळीं विटाळांचें पेव फुटलें ( आर्यसंस्कृतीचा उत्कर्षाप-कर्ष, पूर्वार्ध, प्र. १० पहा ). तथापि त्या सर्व विटाळांमध्यें शास्त्रकारांनीं तारतम्य सांगितलें आहे तें ध्यानांत यावें म्हणून त्याचा थोडा ऊहापोह करितों.

एकंदरींत विटाळाचा शास्त्रार्थ पाहिला तर अल्पाला दोष आहे व महदाला नाहीं हाच सिद्धान्त निघतो. निराळ्या दृष्टीनें बोलावयाचें तर, व्यष्टिधर्मात विटाळ आहे, समष्टिधर्मांत नाहीं. छांदोग्य उपनिषदांत 'नाल्पे सुखमस्ति,' अल्पामध्यें सुख नाहीं व महदाला कसलाच दोष नाहीं असें म्हटलें आहे. साडेतीन हात शरिराचा अहंकार धारण करून जो म्हणतो कीं, मी रडका आहें, मरका आहें, तरुण आहें, वृद्ध आहें, त्याला दोष आहे. परंतु, मी ब्रह्म आहें, ईश्वर आहें असा सर्व जगाचा जो अहंकार धारण करितो तो सर्वथैव निर्दोषी आहे असें वेदान्त-शास्त्र सांगतें. अल्पक्षेत्रांत दोष आहे, परंतु महाक्षेत्रांत दोष नाहीं. गंगेचें पाणी लहान भांड्यांत भरलें व त्यांत जर घाणेरडा हात बुचकळला तर त्यांत दोष आहे. परंतु गंगेच्या वाहत्या प्रवाहांत अस्पृश्यादि अनेक जातींनीं यथेच्छ स्नानपान केलें तर त्या प्रवाहाला दोष नाहीं. कारण क्षेत्र मोठें आहे. एकाद्या वाटसरूनें वाळ-वंटांत भाताची तपेली उतरली व त्याची नजर चुकवून एका कुत्र्यानें तींत तोंड खुपसलें तर तो भात टाकून दिलाच पाहिजे. परंतु शेंदीडशें लोकांच्या श्रमानें एक मोठा भोजनसमारंभ होत आहे व अन्नाच्या राशींच्या राशी पडल्या आहेत, अशा वेळीं एक बिटुकलें कुत्रें तेथें शिरलें व त्यानें अन्नराशींना तोंड लावलें तर येवढ्या यत्नानें केलेली पाकसिद्धि वाया दवडावयाची काय? नाहीं, मुळींच नाहीं. कुत्र्याचें तोंड साक्षात् जेथें लागलें असेल तेवढेंच अन्न फेकून द्यावें आणि बाकीच्या सर्व अन्नराशींवर 'अपवित्रःपवित्रोवा' या मंत्रानें प्रोक्षण करून खुशाल चापून जेवावें. कारण येथें क्षेत्र मोठें आहे म्हणून दोष नाहीं. शिवाय असें जर न करावें तर शेंकडों लोकांच्या प्रयत्नापेक्षां त्या कुत्र्याचें तेथें सहज येणें हें श्रेष्ठ

ठरेल व अनवस्थाप्रसंग येईल ! महावस्त्राला म्हणजे पीतांबर, पैठणी, शालजोडी यांना विटाळ नाहीं व धोतराला विटाळ आहे याचें कारण एकाचें महत्त्व व दुसऱ्याचें अल्पत्व हेंच होय. प्रेताखालची घोंगडी अगर सतरंजी हीं सुटसुटीत-पणामुळें चटकन धुतां येतात म्हणून तीं धुवावींत. परंतु गाद्या, गिरद्या, उशा यांना धुतां येत नाहीं, धुणें इष्ट नाहीं व पाणी नसल्या ठिकाणीं धुण्याचा आग्रह धरल्यास धुणाऱ्याच्या प्राणावर बेतेल म्हणून शास्त्र म्हणतें—

**तूलिका चोपधानानि पुष्परक्तांबराणि च ।**
**शोषयित्वाऽर्कतापेन प्रोक्षणेन विशुध्यति** ॥ १४ ॥ अंगिरा ॥

गाद्या, उशा, वेलबुट्टींचीं निरनिराळीं वस्त्रें ( जाजमें ) हीं उन्हांत वाळवून प्रोक्षण केल्यानंतर शुद्ध होतात.

सुतकाचा विटाळ मानण्याचाहि प्रघात आहे. परंतु त्यांतहि शास्त्रकारांनीं मोठ्या बारकाईनें तारतम्य ठेवलें आहे.

**एकाहात् शुध्यते विप्रो योऽग्निवेदसमन्वितः ।**
**त्र्यहात् केवल वेदस्तु निर्गुणो दशभिर्दिनैः** ॥ आत्रि. श्लो. ८३

( आईबाप वारल्यावर ) अग्निहोत्री व वैदिक ब्राह्मण एका दिवसांत शुद्ध होतो, केवळ वैदिक तीन दिवसांनीं आणि निर्गुणी म्हणजे अविद्वान् मनुष्य दहा दिवसांनीं शुद्ध होतात. अग्निहोत्री व वैदिक यांचीं कर्में धर्मसंबद्ध व समाजसंबद्ध अशीं आहेत, ते जर दहा दहा दिवस अशौच पाळूं लागले तर अग्निहोत्र उत्सन्न होईल व अध्यापनकार्य बुडेल, म्हणून त्यांना अल्पावधींत शुद्ध होण्याची अनुज्ञा शास्त्र देतें. विद्वान् ब्राह्मणाप्रमाणें राजाला सुतक नाहीं. ( न राज्ञाम् अघदोषोऽस्ति, मनु, अ. ५, श्लो. ३ ). कारण राजा जर सुतक व सोयर संभाळीत बसला तर राज्य चालणार कसें ? राजा झाल्यावर इतर मोठेपणाबरोबर सुतकासोयरांचीहि गर्दीच होते ! श्रीवर्धनकर भटांना पेशवाईची सत्ता मिळाल्यावर बहुसंख्य सुतकांचा विचार करावा लागला व शास्त्रविचार पाहून खुंट नेमून सुतक संभाळण्याचें काम देऊन जहागीर द्यावी लागली, हें इतिहासप्रसिद्ध आहे. याज्ञवल्क्यस्मृतींतील ' महीपतीनां नाशौचम् ' ( अ. ३, श्लो. २७ ) या श्लोकावर विज्ञानेश्वरांनीं मोठी सुंदर टीका लिहिली आहे व त्यांत व्यष्टि व समष्टिधर्मांचें तारतम्य मोठ्या बारकाईनें सांगितलें आहे.

**कारवः शिल्पिनो वैद्या दासीदासास्तथैव च ।**
**राजानो राजभृत्याश्च सद्यः शौचाः प्रकीर्तिताः** ॥ प्रचेता ।

कारूकर्म करणारे म्हणजे स्वयंपाकी, आचारी वगैरे, चित्रकार, धोबी, रंगारी, वैद्य, दासी, दास, राजे व राजसेवक हे लगेच शुद्ध समजावे, म्हणजे राजाला राजकर्मामध्यें, व्रत्यांना व्रतांमध्यें, कारू, वैद्य, दास यांना आपापल्या समाजसंबद्ध धर्मामध्यें अशौचदोष नाहीं, तर तो त्यांना केवळ व्यष्टिधर्मांत आहे. वैद्य, डॉक्टर, न्हावी, धोबी, स्वयंपाकी व मजूर इत्यादिकांना अशौचामध्यें आपल्या घरीं सण, वार, उत्सव, मेजवानी वगैरे कांहीं करतां येणार नाहीं. **परंतु घराबाहेरचा समाजसंबद्ध सर्व व्यवहार त्यांनीं केलाच पाहिजे.** कारण,

**चिकित्सको यत्कुरुते तदन्येन न शक्यते ।**
**तस्मात् चिकित्सकः स्पर्शे शुद्धो भवति नित्यशः** ॥ स्मृति ॥
**मूल्यकर्मकराः शूद्रा दासीदासास्तथैव च ।**
**स्नाने शरीरसंस्कारे गृहकर्मण्यदूषिताः** ॥ शातातप ॥

वैद्य जें करतो तें इतरांना शक्य नसतें, म्हणून चिकित्सक हा नित्य शुद्ध असतो. मोलमजुरी करणारे व दासदासी हे अंगाला लावणें, चोळणें, पाय रगडणें इत्यादि कर्मांत शुद्ध आहेत असें समजावें. वरील शास्त्रविचार अत्यंत विचारार्ह आहे. याच धोरणानें अस्पृश्यांचा स्पर्शदोष सांगितलेल्या वचनांचा विचार व्हावयास पाहिजे. अस्पृश्यता शास्त्रांत जशी सांगितली आहे तसेंच तिचें निराकरणहि शास्त्रांत आहे. त्याचा विचार आतां पाहूं.

सार्वजनिक स्थळीं व सामुदायिक प्रसंगीं स्पर्शदोष नाहीं याविषयीं पुढील वचनें निरनिराळ्या शास्त्रग्रंथांत सांपडतात.

अत्रिः—**देवयात्राविवाहेषु यज्ञप्रकरणेषु च**
**उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न विद्यते** ॥
आचारपल्लवेः—**कुण्डे मञ्चे शिलापृष्ठे नौकायां गजवृषयोः ।**
**संग्रामे संकटे चैव स्पर्शदोषो न विद्यते** ॥
बृहस्पतिः—**तीर्थे विवाहे यात्रायां संग्रामे देशविप्लवे**
**नगरग्रामदाहे च स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति** ॥
अत्रिः—**प्राकाररोधे विषमप्रदेशे सेनानिवेशे भुवनस्य दाहे ।**
**आरब्धयज्ञेषु महोत्सवेषु तथैव दोषा न विकल्पनीयाः** ॥

स्मृतिः—तृणे काष्ठे रणे यज्ञे नौकायां गजपृष्ठके ।
लोकयात्राविवाहेषु स्पर्शदोषो न विद्यते ॥
दीर्घकाष्ठे शिलापृष्ठे नौकायां जान्हवीतटे ।
महातीर्थे तु संप्राप्ते स्पर्शदोषो न विद्यते ॥

स्मृत्यर्थसारेः—संग्रामे हट्टमार्गे च यात्रादेवगृहेषु च ।
अग्न्युत्पाते महापत्सु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ॥

देवांच्या यात्रा, जत्रा, विवाह, यज्ञ, मोठमोठे उत्सव, पवित्र कुंडें, उच्चासनें, बैल व हत्ती यांचीं वाहनें, युद्ध, इत्यादि प्रसंगीं स्पर्शदोष नाहीं. तसेंच किल्ल्याला वेढा पडला असला, सैन्याचा तळ पडला असला, विषम प्रदेशांत आपण असलों, आग लागलेली असली, तर अशा आपत्प्रसंगीं व महाप्रसंगीं स्पर्शदोष मानूं नये. तृण, काष्ट, रण, यज्ञ, नौका, यात्रा, विवाह, महातीर्थ, महानदीचे तीर, बाजार, देवळें, इत्यादि ठिकाणीं स्पर्शदोष नाहीं, असा या श्लोकांचा भाव आहे.

म्हणजे आपत्प्रसंगीं व उत्सवादि महाप्रसंगीं स्पर्शदोष नाहीं असा सिद्धांत निघतो. घरामध्यें स्वच्छता, सोवळें व विटाळ हीं प्रत्येकानें आपल्या इच्छेप्रमाणें अवश्य पाळावीं. परंतु घराबाहेरचा म्हणजे समष्टिधर्माचा व्यवहार, विटाळाची कल्पना बाजूस ठेवून केला पाहिजे. शिवाय अस्पृश्यस्पर्शाला सर्वत्र स्नान हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे असेंहि नाहीं, तर स्नान व आचमन हीं दोन्हीहि विकल्पानें सांगितलीं आहेत. तेव्हां व्यष्टिधर्मामध्यें स्नान व समष्टिधर्मामध्यें आचमन अशी व्यवस्था करून अगदीं जुन्यांतल्या जुन्या मताच्या मनुष्याला अस्पृश्यतेचें उच्चाटन करणें शक्य आहे. त्याबद्दल पुढील शास्त्रवचनें अनुकूल आहेत.

रजकं चर्मकारं च नटं धीवरमेव च ।
बुरूडं च तथा स्पृष्ट्वा शुद्धेदाचमनाद्विजः ॥ अंगिरस्मृतिः ।
रजकश्चर्मकृच्चैव व्याधतालोपजीविनो ।
निर्णेजकः सौनिकश्चः नटः शैलूषकस्तथा ॥
मुखेभगस्तथा श्वा च वनिता सर्ववर्णगा ।
चक्री ध्वजी वध्यघाती ग्राम्यकुक्कुटसूकरैः ॥
एतैर्यदंगं स्पृष्टं स्याच्छिरोवर्जं द्विजातिषु ।
तोयेन क्षालनं कृत्वा आचांतः प्रयतो मतः ॥ शातातपः ।

परीट, चांभार, नट, कोळी, बुरुड, इत्यादिकांना शिवलें असतां द्विज आचमनानें शुद्ध होतो. रंगारी, चांभार, व्याध, फासेपारधी, परीट, कसई, बहुरुपी, पाथरवट, ताडीचा धंदा करणारा, कुत्रें, वेश्या, कुंभार, तेली, कलाल, मांग, कोंबडें, डुक्कर इत्यादिकांचा स्पर्श डोकें सोडून जेवढ्या भागास झाला असेल तेथेंच थोडासा पाण्याचा हस्तस्पर्श करून पाय धुऊन द्विजातींनीं मोकळें व्हावें, असें या श्लोकांचें तात्पर्य आहे. बाहेरून घरीं आल्यावर हातपाय धुतले कीं आचमनाचें श्रेय मिळतें. कानाला स्पर्श केल्यानेंहि आचमन होतें असें पराशर-स्मृतींत म्हटलें आहे. वरील आठ दहा श्लोकांत आपल्या पूर्वजांचें धोरण स्पष्ट प्रतिबिंबित झालें असून सद्यःपरिस्थिति लक्षांत घेऊन त्या धोरणानें वागावयास लागलें पाहिजे. अस्पृश्य वर्ग हिंदु राहावा अशी इच्छा असेल तर धोरण बदलण्यावांचून गत्यंतर नाहीं. धोरण बदलण्याला काल अनुकूल आला आहे आणि शास्त्र मान्यता देत आहे. पांच कोट अस्पृश्यांना हिंदु लोक जर माणसाप्रमाणें वागविण्यास तयार न होतील तर या प्रचंड स्पर्धेमध्यें हिंदुसमाज बलानें समर्थ केव्हांहि होणार नाहीं. पांच कोट अस्पृश्यांना जर खालच्या स्थितींत ठेविलें तर जगांत तो मोठा अन्याय होईल आणि हिंदुसमाजाला दुसऱ्यांच्या पायाखालीं काय जळतें आहे याबद्दल बोलण्याचा तिळमात्र अधिकार राहाणार नाहीं.

पानवठ्यांसंबंधानें असें शास्त्र आहे कीं:—

**चाण्डालपतितादीनां पुष्करिण्यां ह्रदेऽपि वा।**
**जानुदघ्नाच्छुचि ज्ञेयमधस्तादशुचि स्मृतम्॥**

"चंडाल, पतित इत्यादिकांच्या पुष्करिणींत व डोहांत गुडघ्याइतकें पाणी असल्यास तें शुद्ध होय; गुडघ्याच्या खालीं असल्यास अशुद्ध असतें" असें वाक्य 'शुद्धिचंद्रालोक' या निबंधग्रंथांत देवलाच्या नांवानें उद्धृत केलें आहे. त्याच निबंधांत पुढें औशनसस्मृतींतील वाक्य सांगितलें आहे तें असें:—

**नद्यः कूपतडागानि सरांसि सरितस्तथा।**
**असंवृतान्यदोषाणि मनुः स्वायंभुवोऽब्रवीत्॥**

"नद्या, आड, तलाव, सरोवरें, झरे, इत्यादि मोकळे जलाशय निर्दोष असतात, असें स्वायंभुव मनूनें सांगितलें आहे." 'कल्पतरु' या निबंधांत वृद्ध याज्ञवल्क्याचें वाक्य आलें आहे.

**समंताच्चतुर्हस्तस्तु जलाशयो भवेद्यदि ।**
**अन्त्यजैरपि संस्पृष्टः पूतो भवति सर्वथा ॥**

" औरसचौरस ४ हात असलेल्या जलाशयाला अंत्यजांचा जरी स्पर्श झाला तरी तो सर्वस्वीं पवित्र असतो."

म्हणून कोणत्याहि पानवठ्यावर सर्वांनीं पाणी भरावें, कारण सार्वजनिक जलाशय, विहिरी, कुवे, पुष्करणी, हौद हे बांधल्यानंतर धर्मार्थ म्हणून जो यांचा उत्सर्गसंकल्प सुटतो, त्या संकल्पांत सर्व भूतमात्रांना हें पाणी मिळावें, सर्वांनीं येथें स्नान, पान व अवगाहन करून संतुष्ट व्हावें, हा जलाशय सर्वांकरितां मोकळा केलेला आहे, अशा प्रकारचा हेतु आहे.

मत्स्यपुराणेः—**प्रदद्यात् सर्वभूतेभ्यो जलपूर्णजलाशयम् ।**
**सामान्यं सर्वभूतेभ्यो मया दत्तमिदं जलम् ॥**
**रमन्तु सर्व भूतानि स्नानपानावगाहनैः ॥**

'उत्सर्गमयूख' ग्रंथामध्यें या अर्थाचे आणखी बरेच श्लोक आहेत. या सर्व वचनांचा विचार केला तर सार्वजनिक पानवठ्यांवर, जेथें जेथें विधर्मी म्लेंछ येत असतील तेथें तेथें अस्पृश्यांना अवश्य येऊं दिलेंच पाहिजे हें स्पष्ट आहे.

हल्लींचा काळ हा लोकशाहीचा आहे. या कालांत प्रत्येक मनुष्याला मत-दानाचा हक्क असतो आणि बहुमतानें या कालांत सगळ्या गोष्टी होत असतात. बहुमताचा विचार लक्ष्यांत घेऊन हिंदुसमाजाचें बहुमत व्हावें म्हणून पांच कोट अस्पृश्यांना मनुष्य बनविण्याचे कामीं स्पृश्य लोकांनीं मदत केली पाहिजे. स्पृश्य व अस्पृश्य लोक यांचें दळणवळण वाढविणें, तें वाढविण्याकरितां अनेक प्रसंग उत्पन्न करणें, असलेल्या प्रसंगांचा फायदा घेणें, या गोष्टी प्रामुख्यानें करावयास लागलें पाहिजे. दसरा, पाडवा, मकरसंक्रांत, अशा सणांच्या प्रसंगीं, किंवा शिवाजीउत्सव, टिळक, गांधी, गोखले यांच्या उत्सवप्रसंगीं उभय समाजांचें सान्निध्य, साहचर्य व प्रेम वाढेल अशी योजना केली पाहिजे. अनेक प्रसंगीं बरोबरीच्या नात्यानें बसण्याची संवय अस्पृश्यांना व स्पृश्यांना लाविली कीं, अस्पृश्यता गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं. मनुष्याचा हक्क, मनुष्याचें स्वातंत्र्य व मनुष्याचें मत या सर्वांचा सुंदर मिलाफ लोकशाहीच्या तत्त्वांत आहे. त्या तत्त्वाचा भरभराट होण्याकरितां आणि या अस्पृश्य वर्गाची उन्नति करण्या-करितां, स्पृश्य व अस्पृश्यांचें दळणवळण वाढविणें ही मोठी बाब आहे. निदान

ख्रिश्चन व मुसलमान या परधर्मीयांशीं स्पृश्य हिंदूंचें जेवढें दळणवळण आहे, त्यापेक्षां अधिक आपुलकीचें दळणवळण अस्पृश्य वर्गाशीं ठेवलें पाहिजे. मुसलमान व ख्रिश्चन यांपेक्षां अस्पृश्य हा अधिक संव्यवहार्य आहे. कारण तो हिंदु आहे, अर्थात् गोरक्षक आहे आणि आर्यसंस्कृतीचा चाहता आहे. मुसलमान जर घरांत येत असेल तर अस्पृश्यहि त्याच्या पुढें यावा. ख्रिश्चन जर खुर्चीवर येऊन बसत असेल तर अस्पृश्यालाहि घरांत जवळची खुर्ची द्यावी. नळावर, विहिरीवर, रस्त्यावर, शाळांमध्यें, सभेमध्यें, आणि सामुदायिक महाप्रसंगीं या मागासलेल्या हिंदूंशीं आपलेपणानें स्पृश्यांनीं वागावें. शास्त्रांत अस्पृश्यांपेक्षां म्लेंच्छांचा म्हणजे परधर्मीयांचा विटाळ जास्त सांगितला आहे, व त्याहिपेक्षां गोभक्षकांचा विटाळ तीव्र आहे.

**सभायां स्पर्शनं चैव म्लेंच्छेन सह संविशेत् ।**
**कुर्यात्स्नानं सचैलं तु दिनमेकमभोजनम् ॥** देवलस्मृति ॥
**एतेऽन्त्यजाः समाख्याता ये चान्ये च गवाशनाः ।**
**एषां संभाषणात्स्नानं दर्शनादर्कवीक्षणम् ॥** वेदव्यासस्मृति ।

अस्पृश्यस्पर्शाबद्दल शास्त्रांत नुसतें स्नान व आचमन हें विकल्पानें सांगितलें आहे. तर वरील दोन श्लोकांत अस्पृश्यापेक्षां म्लेंच्छस्पर्श व दर्शन अधिक दोषावह असें म्हटलें आहे. " सभेमध्यें म्लेंच्छाशेजारीं बसून जर स्पर्श झाला तर सचैल स्नान तर करावेंच, पण एक दिवस उपासहि करावा." असें देवल ऋषी सांगतात. वेदव्यास ऋषींनीं पूर्वीच्या श्लोकांत अंत्यजांचीं नांवें सांगितलीं व पुढें ते म्हणतात " जे गोभक्ष आहेत, त्यांच्याशीं भाषण केलें कीं स्नान करावें व दृष्टादृष्ट होतांच सूर्यदर्शन करावें. " तात्पर्य **विधर्मीयांपेक्षां स्वधर्मीय मनुष्य श्रेष्ठ हाच शास्त्रकारांचा सिद्धान्त असून तो प्रत्येक हिंदूनें हृदयांत कोरून ठेवून त्याप्रमाणें घरांत व घराबाहेर वर्तन करावें.** हाच सिद्धान्त पुराणांनीं प्रमाण मानलेला आहे. गंगा ही अत्यंत पवित्र आहे. तिला म्लेंच्छस्पर्श झाला कीं ती अपवित्र होते, परंतु अंतकालीं अस्पृश्यानें जरी गंगोदक तोंडांत घातलें तरी तो वैकुंठाला जातो असें स्पष्ट मत आहे.

**चण्डालेनापि यस्यास्ये न्यस्येत् गंगाजलं परम् ।**
**सोऽपि मुक्तिं लभेन्मर्त्यः किंवा पुत्रादिनाद्विज॥** बृहद्धर्म-पुराणवचन

मनुस्मृतीवरून सुद्धां म्लेंच्छ हे अंत्यजांना अस्पृश्य आहेत हें सिद्ध होतें.

**ते चापि बाह्यान्सुबहूंस्ततोऽप्यधिकदूषितान् ।**
**परस्परेषु दारेषु जनयन्ति विगर्हितान् ॥१९॥**
**यथैव शूद्रो ब्राह्मण्यां बाह्यं जन्तुं प्रसूयते ॥**
**तथा बाह्यतरं बाह्यश्चातुर्वर्ण्ये प्रसूयते ॥ ३० ॥** मनु अ. १०

संकर जातीच्या लोकांत संकर झाल्यास तो संकर त्यांच्यापेक्षां दूष्य च गर्ह्य असतो. ज्याप्रमाणें शूद्रापासून ब्राह्मणीच्या ठिकाणीं अस्पृश्य जात निर्माण होते त्याप्रमाणें या अस्पृश्यांचा चातुर्वर्ण्याशीं संकर झाल्यास अस्पृश्यांनाहि अस्पृश्य अशी संतति निर्माण होते.

हिंदुस्थानांत विद्यमान असलेल्या मुसलमानांत हजारों जातींचे लक्षावधि लोक मिसळलेले आहेत. त्यांचा परस्पर संबंध सारखा सुरू असून त्यांच्यांत अनुलोम व प्रतिलोम संकर घडत आहेत. त्यामुळें अंत्यजांनाहि अस्पृश्य असे हल्लींचे मुसलमान आहेत असें म्हणावें लागतें.

अस्पृश्यतेच्या उच्चाटणाची शेवटची पायरी म्हणजे त्यांचा देवालयाच्या सभामंडपांत गाभाऱ्याबाहेरून देवदर्शनार्थ प्रवेश ही होय. ही पायरीहि महाराष्ट्रानें ओलांडण्यास प्रारंभ केला आहे. वर्ध्याचे सुप्रसिद्ध पुढारी व दानशूर गृहस्थ शेठ जमनलाल बजाज यांनीं मध्यप्रांतांत व श्री. नागोराव एकबोटे यांनीं वऱ्हाडांत प्रथम उपक्रम केला. तेव्हांपासून सातारा, वाई, मुंबई, पुणें, जबलपूर, अकोला इत्यादि ठिकाणीं कांहीं देवालयें दर्शनार्थ मोकळीं केलीं गेलीं. आणखी १००।५० **देवालयें मोकळीं केल्यावर महाराष्ट्रांतून अस्पृश्यतेचें उच्चाटण झालें असें समजण्यास मुळींच हरकत नाहीं.** मात्र हें कार्य लोकमतपरिवर्तनानें व सामोपचारानेंच होणार आहे. सत्याग्रह, हट्टाग्रह दंडेली, धमक्या हीं त्या कार्याचीं साधनें मुळींच नव्हेत. पर्वतीसत्याग्रहानें हें कार्य बरेंच लांब लोटलें आहे. तथापि स्पृश्य हिंदूंनीं आपलें कर्तव्य म्हणून देवालय-प्रवेशाला अस्पृश्यांना मोकळीक दिली पाहिजे. देवालयांत "तुम्ही येऊं नका म्हणतां म्हणून आम्ही येतों," इतकाच यांत खरा अर्थ आहे. देवालय मोकळें केल्यावर तेथें स्पृश्यांप्रमाणें अस्पृश्यहि क्वचितच दर्शनार्थ जातील अशी खरी परिस्थिति आहे.

अस्पृश्यांनीं देवालयांत देवदर्शनार्थ येऊं नये असें म्हणणारा मोठा वर्ग आहे. परंतु रूढीशिवाय तो कोणतेंहि प्रबळ कारण सांगूं शकत नाहीं. सरसकट सर्व देवालयांमध्यें इतरांप्रमाणें अस्पृश्यांनीं गेलेंच पाहिजे, असें कुणीहि म्हणणार नाहीं. परंतु जीं देवालयें बव्हंशीं अनादि, प्राचीन, प्रसिद्ध व सार्वजनिक अशीं आहेत तीं दर्शनार्थ उघडीं करावीं. रूढीची सबब तेथें पुढें आणूं नये इतकेंच आम्हांला सांगावयाचें आहे. देवालयप्रवेशाविरुद्ध ज्या अशास्त्रीय कल्पना पुढें येत असतात, त्यांचा थोडा विचार अवश्य केला पाहिजे.

अस्पृश्यांचा प्रवेश देवालयांत होतांच देव विटाळतो किंवा देवाचें देवत्व जातें ही कल्पना भ्रामक आहे. महाराच्या दृष्टिक्षेपानें जर देवाचें देवत्व जात असेल तर **देवापेक्षां अस्पृश्य हा श्रेष्ठ आहे** असें ठरण्याची आपत्ति येईल ! देव व अस्पृश्य यांची नजरानजर होतांच देवाचें देवत्व तर जात नाहींच, परंतु त्या पतितपावनाचें दर्शन झाल्यामुळें अस्पृश्याचें पातित्यच नष्ट होतें ! मूर्तीमध्यें जें देवत्व आहे तें भक्ताच्या भावनेनें उत्पन्न झालेलें आहे. ' भाव तोचि देव भाव तोचि देव, ' ' भावेन देवं, ' हाच नियम आहे. 'यो यत् श्रद्धः स एव सः' असें गीतावाक्य आहे. ज्याची श्रद्धा मूर्तीचे ठायीं देव या दृष्टीनें असेल त्यालाच ती उद्धरते, परंतु ज्या मूर्तींना आपण देव समजतों त्यांना इतर अश्रद्ध-धान लोक फत्तर समजत असतात. हें प्रत्यक्ष नाहीं काय ? 'मानला तर देव, नाहीं तर धोंडा, ' ही लौकिक म्हणहि हेंच सुचविते. देवाचें दर्शन कुणींहि घेतलें तरी देव कधीं विटाळत नाहीं. कारण तो पावनांना पावन करणारा आहे. परमेश्वर हा भक्तकामकल्पद्रुम आहे, भक्ताच्या इच्छा पुरविण्याकरितां तो सगुण साकार विग्रह धारण करीत असतो. अव्यक्तांतून व्यक्तपणांत, निर्गुणांतून सगुणांत जो देव येतो तो उपासकाच्या कार्याकरितांच येत असतो. अर्थात् उपासकांच्या भावना, कल्पना, वृत्ति यांच्या आधीनच मूर्तींतील देवत्व असतें. आजवर भक्तांची समजूत अशी होती कीं, अस्पृश्य आला कीं देव विटाळतो. परंतु उद्यां जर ती समजूत पालटली तर देव कधींहि विटाळणार नाहीं. हा सर्व खेळ भावनेचा आहे. भावना बदलली कीं झालें. आजवर आपल्या कितीतरी भावना बदललेल्या आहेत त्याप्रमाणें ही सुद्धां बदलली पाहिजे. खाऊन पिऊन बाटतो, पाव खाऊन ख्रिश्चन व शेंडी काढून मुसलमान होतो या आपल्या भावना बदलल्या नाहींत काय ?

लोकांची अशीच समजूत असली पाहिजे कीं जेथें सर्व **हिंदु दर्शनार्थ येऊं शकतात तेथेंच खरा देव** आहे व जेथें प्रतारणा आहे तेथें समदृषीचा देव नाहीं. ही कल्पना यापुढें वाढत चालली म्हणजे देव विटाळतो ही कल्पना लयाला जाईल. वैदिक मंत्रांनीं देवाची प्राणप्रतिष्ठा झाली असली किंवा न झाली असली तरी, भक्ताला त्याच्या भावनेप्रमाणें देवतेपासून फलें मिळतातच. पुराणांतरीं वृक्ष, पाषाण, प्रतिमा इत्यादिकांवर दृढ श्रद्धा ठेवून उद्धरून गेल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. आजसुद्धां पर्वत, गुहा, डोंगर, दऱ्यांमधून असलेले देव नवसास पावतात ! त्यांची प्राणप्रतिष्ठा अगर अर्चा क्वचितच झालेली असावी. तेव्हां गाभाऱ्याबाहेरून अस्पृश्यांना देवदर्शन होण्यास कोणत्याहि तऱ्हेचा शास्त्रदृष्ट्या दोष नाहीं. शेठ जमनालाल बजाज यांनीं आपलें श्रीलक्ष्मीनारायणाचें मंदीर मोकळें केल्यावर अनेक पंडितांनीं त्यांच्याकडे अभिनंदनपर अभिप्रायपत्रें पाठविलीं. त्यांत श्रीक्षेत्र काशी येथील म. म. प्रमथनाथ, तर्कभूषण भट्टाचार्य, राधाप्रसादशास्त्री, कालीप्रसाद शर्मा मिश्र, वामदेव शर्मा, अंबिकाप्रसादशास्त्री, आनंद शंकर ध्रुव, अशी बडी बडी मंडळी आहेत. त्याचप्रमाणें पंडित मदनमोहन मालवीय, श्री. चिंतामणराव वैद्य, वे. शा. सं. मराठेशास्त्री प्रभृतींना धर्मशास्त्रदृष्ट्या ही गोष्ट संमत आहे इतकें सांगितलें म्हणजे पुरे.

अस्पृश्यांचा गाभाऱ्याबाहेरून दर्शनाकरितां देवालयप्रवेश धर्मशास्त्रदृष्ट्या संमत आहे. अत्रिस्मृतींतील पुढील दोन वाक्यें संवत्सरप्रदीप नांवाच्या निबंधग्रंथांत उध्दृत केलीं आहेत.

**देवयात्राविवाहेषु यज्ञप्रकरणेषु च ।**
**उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ॥**
**विष्ण्वालयसमीपस्थान् विष्णुसेवार्थमागतान् ।**
**चण्डालान्पतितान्वाऽपि न स्पृष्ट्वा स्नानमाचरेत् ॥**

देवतांच्या यात्रा, विवाह, यज्ञप्रसंग व सर्व तऱ्हेचे उत्सव अशा प्रसंगीं स्पर्शास्पर्शदोष नाहीं. विष्णुमंदिराजवळ असलेल्या व विष्णुसेवेकरितां आलेल्या चांडाळ, पतित इत्यादिकांचा स्पर्श झाल्यास स्नान करूं नये. तसेंच बृहस्पतीस्मृतींतील पुढील वाक्यें अनेक निबंधग्रंथांत प्रसिद्ध आहेत.

**उत्सवे वासुदेवस्य स्नायाद्योऽशुचिशंकया ।**
**तादृशं कल्मषं दृष्ट्वा सचैलं स्नानमाचरेत् ॥**

वासुदेवाच्या उत्सवांत विटाळ झाला अशी शंका येऊन जो स्नान करितो त्या पापी पुरुषाच्या दर्शनाबरोबर सचैल स्नान करावें.

जे लोक अस्पृश्यांच्या देवालयप्रवेशाविरुद्ध आहेत, त्यांना आपल्या देवालयांत मुसलमान आलेला चालतो हें मोठें विचित्र आहे. पुष्कळ देवालयांच्या सभामंडपांतच नव्हे, प्रसंगीं गाभाऱ्यांतहि गोमांसभक्षक म्लेंच्छ इलेक्ट्रिक फिटिंग करण्याकरितां, ग्यासबत्ती लावण्याकरितां, रंगसफेती देण्याकरितां जात असतो. उत्सवांमध्यें कित्येक मोठ्या देवळांच्या सभामंडपांत मुसलमानांचीं दुकानें ऊद, कापूर, साखर, पिंजर, फुलें, माळा इत्यादि विकण्याकरितां असतात. सभामंडपांत मुसलमान सुतार, गवंडी, गवई, बँडवाला या नात्यानें कधींहि गेला नसेल असें एकादें तरी देवालय शिल्लक आहे कीं नाहीं याची वानवाच आहे, पेटीवाला व तबलेवाला, मुसलमान पुष्कळ हरिभक्तपरायणांना कीर्तनांत चालतो.

तात्पर्य, शास्त्रविरुद्ध धडधडीत अनाचार पुष्कळ देवालयांत मुसलमानांच्या प्रवेशानें जेथें राजरोस होत आहे तेथें जो हिंदु जो आपल्या संस्कृतीचा तो आल्यानें भ्रष्टाकार होईल ही समजूतच वेडगळ आहे. देवळें भ्रष्ट करण्याचें काम मुसलमानांनींच केलें आहे. अर्थात् अस्पृश्यांच्या प्रवेशानें तेथें अधिक भ्रष्टता न येतां आलें तर पावित्र्यच अधिक येईल. हें लक्षांत ठेवून प्रत्येक देवालयाच्या मालकानें आपलें देवालय दर्शनापुरतें अवश्य खुलें करावें. म्हणजे अस्पृश्यतेचें उच्चाटण झालें असें समजावें.

आमच्या मतें अस्पृश्यतानिवारणाची ही शेवटची पायरी स्पृश्यांनीं ओलांडावी व त्यांचा उन्नतीचा मार्ग मोकळा करून द्यावा. अस्पृश्यतानिवारणामध्यें सहविवाह व सहभोजन हीं येतात असें डॉ. आंबेडकर व इतर खुशाल म्हणोत ! परंतु, जाति मोडणाऱ्या अनेकांमध्यें एक आंबेडकर आहेत एवढेंच ध्यानांत ठेवून **त्या सर्वांच्या प्रतिकारास आपण सज्ज झालें पाहिजे**. जाति मोडण्याची भाषा कांहीं आजची नाहीं व ती आंबेडकरच बोलतात असें नाहीं. तेव्हां तेवढ्यामुळें बुजून जाऊन अस्पृश्यतेचें म्हणजे विटाळाचें उच्चाटण करण्यास स्पृश्यांनीं विलंब लावणें हें मात्र उचित नव्हे. स्पृश्यांनीं आपलें कर्तव्य करावेंच. प्रतिपक्षाला आपलें मर्म मुळींच न सांपडेल अशी वर्तणूक व जाति मोडण्याच्या चळवळीला मुरड घालून पोटजातींच्या एकीकरणाची चळवळ जोरानें चालवावी. सर्व दृष्टींनीं पोटजातींचें एकीकरण करणें अवश्य आहे हें पुढें एका प्रकरणांत साधार सांगावयाचें आहे.

---

# प्रकरण पांचवें



## समाजबलविचार

### चढाईच्या शुद्धिकार्यांचें महत्त्व

अस्पृश्यतानिवारणाची जशी अत्यंत आवश्यकता आहे, तशीच शुद्धि-कार्याची आवश्यकता आहे. किंबहुना शुद्धि ही अस्पृश्यतानिवारणाशीं अत्यंत संबद्ध आहे. अस्पृश्यतेच्या प्रश्नाला जसें महात्मा गांधींनीं चालन दिलें तसेंच स्वामी श्रद्धानंदजींनीं शुद्धिकार्याला राष्ट्रीय स्वरूप आणलें. महाराष्ट्रांत कै. वा. गजानन भास्कर वैद्य यांनीं पहिल्यानें हिंदु मिशनरी या नात्यानें हें कार्य सुरू केलें. प्रथम या कार्याबद्दल समाज साशंक होता. पण तो आतां उत्सुक झाला आहे. असहकारितेंत मोपल्यांचें बंड उद्भवलें. त्या बंडांत त्यांनीं पुष्कळ हिंदूंना जुलमानें मुसलमान केलें, आणि त्या वेळींच त्या तमोमय बंडांतून शुद्धिसूर्याचा उदय झाला. हा शुद्धिसूर्य मालकाना रजपूतांवर जेव्हां प्रकाशमान झाला तेव्हांच त्याचे किरण सर्व हिंदुस्थानभर पसरले. हुतात्मा स्वामी श्रद्धानंदजी आणि शुद्धिकार्याचा पुरस्कार करणारा आर्यसमाज यांनीं लोकसमाजाची वृत्ति बदलून सोडली आहे. डॉ. कुर्तकोटींच्या हिंदुधर्म-परिषदेनें महाराष्ट्रांत बरेंचसें लोकमतपरिवर्तनाचें कार्य याहि बाबतींत केलेलें आहे. स्थानिक हिंदु-सभांनीं व धर्मभास्कर विनायकमहाराज, पांचलेगांवकर महाराज यांनींहि बरींच शुद्धिकार्यें घडविलीं आहेत. हें सर्व कार्य लक्षांत घेतलें तर शुद्धि हा कल्पवृक्ष आहे, ही अमरवल्ली आहे, हिंदुसमाजाला जगविणारी ही कामधेनु आहे, असेंच आज वाटूं लागलें आहे. हिंदुसमाजरूपी हौदाला जीं दोन छिद्रें पडलीं होतीं, जीं दोन क्षतें होतीं त्यांतूनच आतां बाहेर जाणारें पाणी पुन्हां आंत येऊं लागलें आहे ही आश्चर्याची गोष्ट आहे. आजपर्यंत हिंदुसमाजरूपी हौदांतून सारखें पाणी बाहेरच जात होतें, त्यामुळें तो लवकरच रिकामा होणार अशी भीति वाटत होती. परंतु आतां बाहेर पाणी जाणाऱ्या नळांतूनच तें आंत येऊं लागल्यामुळें कसलीच भीति राहिली नाहीं.

हिंदुसमाजाचें रक्षण करण्याकरितां हिंदुसमाजाची संख्या जी घटत आहे तें बंद केलें पाहिजे. शंभर कोटी हिंदु, साठ कोट हिंदु एका काळीं होते. या पूर्वीच्या गोष्टी जरी सोडून दिल्या तरी ३० कोट हिंदूंची संख्या घटत घटत २२ कोटपर्यंत आली आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. जी संख्या घटली ती कांहीं स्वखुषीनें घटली नाहीं; जे लोक परधर्मांत गेले ते कांहीं विचार करून हिंदु धर्मांतलीं तत्त्वें नापसंत म्हणून गेले अशांतला प्रकार मुळींच नाहीं. छल, बल, छद्म, अपकृत्य इत्यादि कारणांनीं आणि दुष्काळ, अज्ञान या गोष्टींचा फायदा घेऊन हिंदुसमाजाची संख्या मुसलमानांनीं, ख्रिश्चनांनीं कमी केली आहे. ख्रिश्चन व मुसलमान यांनीं हिंदुसमाजांतून नेलेली संख्या परत हिंदु धर्मांत आणलीच पाहिजे. ‘ जशास तसें ’ ह्या न्यायानें त्यांनीं जे उपाय अवलंबिले तेच किंवा त्यापेक्षां विशेष उपाय योजून चढाईचें शुद्धिकार्य प्रारंभिलें पाहिजे. हिंदुसमाजाला जिवंत ठेवावयाचें असेल तर शुद्धि, चढाईची शुद्धि, आत्यंतिक शुद्धि यावांचून गत्यंतर नाहीं.

पुष्कळ हिंदु लोक अगदीं अडाणी व भोळे म्हणून व कांहीं फार शहाणे म्हणून, अद्याप शुद्धिकार्याचें महत्त्व त्यांना समजत नाहीं. हिंदूंना शुद्धीचें महत्त्व न कळलें तरी तें अहिंदूंना मात्र उत्तम कळत आहे. ख्रिश्चनांना वाटतें कीं, जोरानें शुद्धीचा पुरस्कार झाला तर आमच्या नाड्या आंखडतील, संस्था बुडतील, व आमचे प्रयत्न व्यर्थ होतील ! शुद्धिकार्यामुळें मुसलमानांचें तर धाबें दणाणून गेलें आहे. कारण त्यांनीं कुटिल मार्गांनीं हिंदूंची संख्या घटविलेली आहे. अब्दुल रसीदनें स्वामी श्रद्धानंदांची हत्या वेडेपणांत खास केलेली नाहीं. वेडेपणांत हत्या करण्याजोगे रस्तोरस्तीं व गल्लोगल्लीं संन्याशी पुष्कळ पडलेले होते. पण या संन्याशांपेक्षां श्रद्धानंद हा त्याला आपल्या इमानाचा शत्रू वाटला ! कारण त्यानें ज्या शुद्धीचा पुरस्कार केला ती मुसलमानांना झोंबली, त्यांच्या वर्मी लागली, व तिनें त्यांच्या वर्मावर आघात केले. म्हणूनच आखिल मुसलमानांची मनोवृत्ति अबदुल रसीदच्या रूपानें प्रगट झाली व तिनें श्रद्धानंदांची हत्या करून हिंदुसमाजाला **जीवनाचें आव्हान केलें.** भोळ्याभाबड्या हिंदूंनो, आणि दीर्घशहाण्या हिंदूंनों, हें आव्हान हिंदुस्थानांतील पीठस्थ शंकराचार्यांना उमगलें, लाला लजपतराय, डॉ. मुंजे, पंडित मालवीय, भाई परमानंद, बॅ. सावरकर इत्यादिकांना

तें समजलें म्हणूनच ते प्राणपणें हिंदु संघटणामध्यें पडत आहेत. स्वतःला जें समजत नाहीं तें आताकडून समजून घ्या व शुद्धिकार्य पुढें चालवा. तानाजी मालुसरा पडला व सिंहगड हस्तगत झाला. श्रद्धानंदजी गेले व शुद्धीचा विजय झाला, असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. श्रद्धानंदजींची हत्या करणाऱ्यानें जे शब्द उच्चारले ते सर्व हिंदूंनीं लक्षांत घेऊन, शुद्धिकार्याचा सपाटा चालविला पाहिजे. एका पवित्र कार्याकरितां, हिंदुसमाजाच्या उद्धरणाकरितां एका कर्मयोगी संन्याशानें आपल्या रक्ताचा सडा शिंपडला म्हणूनच प्रत्येक हिंदूनें कृतज्ञतेनें मरणापूर्वी चार दोन तरी शुद्धिकार्यें केलीं पाहिजेत.

धर्मांचा उपदेश प्रत्येकानें करावा. जगांतील सर्व धर्मांची माहिती कोणीहि पुढें मांडावी व जगांतील सर्व धर्म चांगले आहेत असें निःपक्षपाती बुद्धीनें म्हणावें. किंवा जो धर्म चांगला असेल, श्रेष्ठ असेल, असें मनुष्याच्या बुद्धीला पटेल तो त्यानें स्वीकारावा असेंहि सांगावें. चांगलें पाणी प्या, चांगल्या हवेंत राहा, असें म्हणणें व अमुकच विहिरीचें पाणी प्या, अमुकच ठिकाणीं राहा, असें म्हणणें निराळें. पाद्री व मौलवी यांनीं, आपल्या धर्मांत आल्यानेंच मोक्ष व इतर धर्मांमध्यें राहिल्यास नरक अशी घातुक विचारसरणी उत्पन्न केलेली आहे.

हिंदुसमाजांतहि कांहीं घातुक अशा कल्पना आहेत. मनुष्य खाऊन बाटतो, पिऊन बाटतो, असल्या बाटण्याच्या व सोंवळ्याओंवळ्याच्या खुळचट कल्पना समाजांत आहेत. हिंदु आईबापांच्या पोटीं जो जन्मला तो हिंदु, ही कल्पना फार चांगली आहे. पण त्याबरोबरच हिंदु आईबापांच्या पोटीं एकदां जन्मल्यावर मनुष्य खाण्यानें, पिण्यानें अगर कशानेंहि बाटत नाहीं, इतकेंच नव्हे तर, तो जन्मोजन्मीं हिंदु राहतो; ही जोरदार कल्पना हिंदुसमाजांत यावयास पाहिजे. तसेंच अज्ञानानें, जुलमानें, छलबलानें धर्मांतर होत नाहीं, हेंहि हिंदुसमाजाला समजाऊन सांगितलें पाहिजे. हिंदुसमाजांतील ही घातुक विचारसरणी नष्ट केली म्हणजे मौलवी व मिशनरी यांच्या वरील विचारसरणीचा प्रतिकार आपोआपच होईल.

वास्तविक धर्म हा विषय जुलमानें व जबरदस्तीनें लादण्याचा नाहीं, छल, बल, छद्म, अपकृत्य इत्यादींनीं स्वीकारण्याचा नाहीं किंवा अज्ञानानें गमतीखातर पत्करावयाचाहि नाहीं. धर्म हा अत्यंत पूज्य विषय असून तो समाधानाकरितां अनुष्ठेय आहे, परलोकप्राप्तीकरितां श्रद्धेय आहे आणि अभ्युदयाकरितां आचरणीय आहे. परंतु या धर्माची थट्टा या मिशनऱ्यांनीं व मुसलमानांनीं इतकी केली आहे

व करीत आहेत कीं, ती सांगतां पुरवणार नाहीं. धर्माचा स्वीकार विचारपूर्वक मनानें करावयाचा असतो ही गोष्ट त्यांच्या गांवींहि नाहीं. धर्म म्हणजे एक बाजारांतील वस्तु, धर्म म्हणजे एक थट्टेचा विषय, अशी स्थिति त्यांनीं केलेली आहे. काय म्हणे जुलमानें शेंडी छाटली, तोंडांत मांस घातलें, अंगावर बाप्तिस्म्याचें पाणी छेडलें कीं, एकदम धर्मांतर होतें ! कोण हा जुल्म व काय हें तर्कज्ञान ! ठीक आहे, जर शेंडी छाटून मुसलमान होतां येतें तर **दाढ्या बोडून हिंदूहि करतां** येतें, हिंदु मुलींना इजारी नेसविल्या कीं, त्या जर मुसलमान होतात तर **मुसलमान बायांना साड्या नेसविल्यास** त्या कां हिंदु होऊं नयेत ? जर कुराण मानल्यानें मुसलमान व बायबल मानल्यानें ख्रिश्चन होतां येतें तर, **गीता मानून हिंदु कां होतां येऊं** नये ? जर कुराणांतला कलमा पढल्यानें मुसलमान होतां येतें तर, गीतेचा श्लोक म्हणतांच हिंदु कां होतां येऊं नये ? नुसतें बाप्तिस्म्याचें पाणी अंगांवर पडलें किंवा लांबून फेंकलें असतां जर मनुष्य ख्रिश्चन होऊं शकतो तर **गंगेचें पाणी अंगावर पडतांच कोणीहि मनुष्य हिंदु कां न व्हावा** ? शंकराचार्यांनीं गंगेचे हौदचे हौद भरून तें पाणी सर्व जगभर शिंपडावें व जगाला हिंदु करून टाकावें ! ठाणें जिल्ह्यांतील ओरपी* लोक हे पावाचा तुकडा पडलेल्या विहिरींतील पाणी पिऊन व सामवेदी ब्राह्मण हाडकें टाकलेल्या निर्मळच्या तलावांतील पाणी पिऊन म्हणे ख्रिश्चन झाले आहेत ! तेव्हां जगांतील विहिरींत पुरणपोळ्या टाकून त्यांतील **पाण्यानें जगाला हिंदु**

* पोर्तुगीजांचा बाटविण्याचा घाऊक व्यापार कसा चालला होता याची माहिती—अत्यंत विश्वसनीय माहिती—सरकारामार्फत प्रसिद्ध झालेल्या मुंबई इलाख्याच्या गॅझेटियरच्या तेराव्या व्हॉल्यूमच्या पहिल्या भागांत आढळते. पावबिस्कुटांचे आणि मांसाचे तुकडे विहिरींत टाकून बाटविल्याचा उल्लेख पान २०१ मध्यें आला आहे. त्याचें मराठी भाषांतर असें आहे. "उरप व इतर जातींची अशी गोष्ट सांगतात कीं, विहिरींत मांसाचे तुकडे टाकून त्यांच्या वाडवडिलांस ख्रिस्ती बनविण्यांत आलें. त्याचप्रमाणें ओरिएंटल ख्रिश्चन स्पेक्टेटरमधील लेखक म्हणतो कीं, पोर्तुगीजांनीं पावबिस्किटें असंख्य लोकांच्या तोंडांत जुलमानें कोंबलीं. कांहीं प्रसंगीं जबरदस्तीहि करण्यांत आली असली पाहिजे. परंतु पोर्तुगीज लोकांच्या माहितीवरून असें दिसतें कीं, बाटविण्याच्या कामीं आर्जव व लालूच यांचाच अवलंब करण्यांत आला होता."

करून कां घेऊं नये ? शरिराच्या एखाद्या भागावर थोडा विकार केल्यानें जर मनुष्य मुसलमान होतो तर, त्याच माणसाचे कान टोंचून त्याला हिंदुधर्मात घेण्यास हरकत कोणती ? हिंदुधर्म जगांत ह्याच उपायानें वाढवावयास नको काय ? धर्म स्वीकारण्याचा व वाढविण्याचा परधर्मीय लोक जो उपाय अंमलांत आणीत आहे तोच स्वीकारला पाहिजे. या परधर्मीयांनीं नुसत्या पाण्यावर, अन्नावर व हजामतीवर धर्म आणून ठेवला आहे आणि थट्टा चालविली आहे. त्याच उपायांनीं त्यांना गप्प बसविलें पाहिजे. गंगेचें पाणी शिंपडावें, शेंडी राखावी व हातांत गीता देऊन भगवान् श्रीकृष्णाच्या नांवाचा जयजयकार करण्यास सांगावें म्हणजे आटपलें. याच पद्धतीनें एकजात हिंदु करून घेण्याचा धडाका लाविला पाहिजे.

आज हिंदुस्थानांत जे मुसलमान व ख्रिश्चन आहेत ते सर्व मूळचे हिंदूच असल्यामुळें त्यांना एकजात हिंदु करून टाकलें पाहिजे. ज्यांनीं विचार करून परधर्माची दीक्षा घेतली असेल तेवढे सोडून बाकीच्यांना प्रायश्चित्त देऊन हिंदु बनविलें पाहिजे. हिंदुधर्मांत प्रायश्चित्त नाहीं असें पापच नाहीं. अल्प प्रायश्चित्तानें ख्रिश्चन व मुसलमानांना हिंदुसमाजांत आणण्याचा हिंदूंनाच हक्क आहे. कारण हे लोक मूळचे हिंदु असल्यामुळें ते हिंदूंच्या खिशांतील कण आहेत व हिंदूंच्या तिजोरींतील धन आहेत. म्हणून अशांना शुद्ध करण्याचा **जन्मसिद्ध हक्क फक्त हिंदूंचाच** आहे.

जुलूमजबरदस्तीनें धर्मांतरच काय, पण कोणताहि व्यवहार होऊं शकत नाहीं.

**बलाद्दत्तं बलाद्भुक्तं बलाद्यच्चापि लेखितम् ।**
**सर्वान्बलकृतानर्थानकृतान्मनुरब्रवीत्** ॥ १६८ ॥ मनु. अ. ८

भगवान् मनु म्हणतात, ' बलात्कारानें दान घेतलें, भोग घेतला किंवा कांहीं लिहून घेतलें तर हे सर्व व्यवहार न केले असेंच समजावें. ' म्हणून जुलूमजबरदस्तीनें भ्रष्ट झालेल्या सर्व लोकांना शुद्ध करून घेण्यास मुळींच हरकत नाहीं. शास्त्र तर औदार्यानें असें सांगतें कीं, स्त्रीवर जर बलात्कार झाला तर ती रजोदर्शनानंतर शुद्ध होते, फार काय ती त्यामुळें गरोदर राहिली तर बाळंपणानंतर शुद्ध होते, फक्त उपजलेलें मूल दुसऱ्याला देऊन टाकिलें म्हणजे आटोपलें. कारण त्यामध्यें स्त्रीचा दोष मुळींच नाहीं. नवरा, राजा, धर्मगुरु व समाज यांच्या दौर्बल्यामुळें अबलांवर जे अत्याचार होतात, त्यांत त्यांचा काय दोष ? पण हिंदु-

समाज आपल्या दुबळेपणाबद्दल स्त्रियांना जातिबाह्य करितो, हा केवढा गाढवपणा ? या गाढवपणाचा फायदा मुसलमान घेतात. हिंदुसमाजावर जे लांडगे आज चरत आहेत ते केवळ हिंदूंच्या भोळेपणानेंच होत. हा भोळेपणा नष्ट करण्याकारितां समाजाला देवलऋषीचे स्त्रीविषयक वरील विचार पुढील श्लोकांतून शिकविले पाहिजेत.

असवर्णेन यो गर्भः स्त्रीणां योनौ निषिच्यते।
अशुद्धा सा भवेन्नारी यावच्छल्यं न मुञ्चति ॥
विनिःसृते ततः शल्ये रजसो वाऽपि दर्शने ।
तदा सा शुध्यते नारी विमलं काञ्चनं यथा ॥
स गर्भो दीयतेऽन्यस्मै स्त्रयं ग्राह्यो न कर्हिचित् । देवल

सामान्य जनतेला हें शास्त्र व युक्तिवाद पूर्ण पटविला म्हणजे ती जनता शुद्ध केलेल्या स्त्रियांशीं व इतरांशीं कोणताहि व्यवहार करण्यास मागें पुढें पाहाणार नाहीं. प्रत्येक जात शुद्ध केलेल्या माणसांस जेव्हां आपल्या जातींत ओढण्याचा प्रयत्न करूं लागेल तेव्हांच शुद्धिकार्याचा पूर्ण विजय झाला असें होईल.

हिंदुसमाजांत जशास तसें हें वर्तन करण्याची वृत्ति नाहीं, हें फार वाईट आहे. उदाहरणार्थ, ठाणें जिल्ह्यांतील सामवेदी ब्राह्मणांची संख्या केवळ ही वृत्ती नसल्यामुळें घटलेली आहे. या सामवेदी ब्राह्मणांपैकीं पुष्कळ ब्राह्मण वसईजवळच्या निर्मळच्या यात्रेस पूर्वी एका प्रसंगीं गेले. पाद्र्यांनीं लबाडीनें त्या तलावांत गाईंचीं हाडकें न कळत टाकून तो भ्रष्ट केला. यात्रेला गेलेले हे ब्राह्मण तळ्याचें पाणी प्याले. पाद्रयांना हें वर्तमान समजतांच त्यांनीं त्या ब्राह्मणांना खरी स्थिति सांगून "तुम्ही भ्रष्ट झालां" असें सांगितलें. भोळ्या बिचाऱ्या ब्राह्मणांनीं तें खरें मानलें व सुमारें ४००० सामवेदी ब्राह्मण ख्रिस्ती होऊन बसले. असल्या अडाणीपणाच्या गोष्टी आजवर फार झाल्या. यापुढें त्या चालू ठेवणें म्हणजे हिंदुसमाजाचें मरण जवळ आणण्यासारखें आहे.

शुद्धीच्या अभावीं हिंदुसमाजाचा ऱ्हास कसा होत आहे हें आतां पाहूं. सन १८७२ सालापासून हिंदुसमाजाचा ऱ्हास सारखा कसा होत आहे हें अनेक विद्वानांच्या विधानांवरून सिद्ध होतें. रा. यू. एन्. मुकरजी म्हणतात, "१८७२ ते १९०१ सालापर्यंत बंगाल्यांतील हिंदूंची लोकसंख्या १७१ लक्षांची १९४ लक्षांपर्यंत गेली. परंतु मुसलमानांचें प्रमाण मात्र तेवढ्याच मुदतींत

१६७ लक्षांचें २२० लक्षांपर्यंत गेलें." मॉडर्न रिव्ह्यूचे संपादक श्री. रामानंद चतरजी यांनीं सुरत येथें हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावरून असें घोषित केलें कीं, "१८८१ ते १९२१ सालापर्यंत म्हणजे ४० वर्षांत हिंदूंची संख्या १७७ लक्षांनीं कमी झाली." या हिशेबानें दरसाल सुमारें ४ लक्षांनीं हिंदूंची संख्या घटत आहे असें ठरतें. १८८१ सालीं दर दहा हजारीं हिंदूंचें प्रमाण ७४३२ होतें. तें १९२१ सालीं ६८४१ वर आलें. म्हणजे हजारीं ६०लोकांची संख्या कमी झाली. पंजाब प्रांताचा खानेसुमारीचा अधिकारी १९२१ च्या रिपोर्टीत म्हणतो कीं, "गेल्या दहा वर्षांत ४० हजार हिंदु मुसलमान झाले व १ लक्ष २० हजार हिंदु ख्रिस्ती झाले." या रिपोर्टांतील अंदाजाप्रमाणें १९११ ते २१ या दहा वर्षांत एकंदर ७ लक्ष लोक ख्रिस्ती झाले. म्हणजे प्रत्येक दिवशीं १९० लोक ख्रिस्ती होत आहेत असा अर्थ होतो. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण शर्मा यांनीं औंध येथील वैदिकधर्म मासिकांत पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे. आंकडे लक्षांचे आहेत.

| | १८८१ | १८९१ | १९०१ | १९११ | १९२१ |
|---|---|---|---|---|---|
| हिंदु | १८७९ | २०७१ | २०७१ | २१७५ | २१६२ |
| मुसलमान | ५०७ | ५७३ | ६२४ | ६६६ | ६८७ |
| ख्रिस्ती | १८ | २२ | २९ | ३८ | ४७ |

या आंकडयांवरून पहिल्या दहा वर्षांत १०० चे ११० हिंदु, ११४ मुसलमान व १२२ ख्रिस्ती अशी वाढ झाली. दुसऱ्या दहा वर्षांत १०० चे १०० च हिंदु, १०८ मुसलमान व १२७ ख्रिस्ती अशी वाढ झाली. तिसऱ्या दहा वर्षांत १०० चे १०५ हिंदु, १०६।। मुसलमान व १३२।। ख्रिस्ती अशी वाढ झाली. आणि शेवटच्या दहा वर्षांत १०० चे ९९।। हिंदु, १०५ मुसलमान व १२२।। ख्रिस्ती अशी वाढ झाली. म्हणजे हिंदु जातींचा ऱ्हास सारखा होत असून अहिंदूंची संख्या सारखी वाढत आहे हेंच यावरून स्पष्ट होत नाहीं काय ?

डोळस असून अंध बनलेल्या शहाण्यांना हिंदु लोक फक्त गेल्या दहा वर्षांत कसकसे बाटले आहेत हें समजावें म्हणून शिरगणतीच्या सरकारी प्रतिवृत्तावरून कांहीं जातींचे आंकडे देतों. त्यावरून पुढील अनुमानानें निघतात कीं, १९११ सालापेक्षां १९२१ सालीं हिंदूंची संख्या १० वर्षांत १ कोट १२ लक्षांनीं कमी झालेली आहे. हिंदुसमाजाच्या ८५ जातींपैकीं ५२ जातींचा ऱ्हास मोठया

वेगानें होत आहे. ११२ लाख हिंदु लोक हिंदुसमाजांतून गेले असल्यामुळें तितकीच ख्रिश्चन व मुसलमान यांची संख्या वाढलेली आहे.

| जात | सन १९११ | सन १९२१ | १० वर्षांत किती घटली |
|---|---|---|---|
| १ ब्राह्मण | १४५९५७०८ | १४२५४९९१ | ३४०७१७ |
| २ अहीर | ९५७८४८६ | ९१६२८६१ | ४१५६२५ |
| ३ सोनार | १२६२९७८ | ११३७६११ | १२५३६७ |
| ४ माळी | २०३५८५३ | १८७५६१० | १६०२४३ |
| ५ लिंगायत | २९७६६३० | २७३८२१४ | २३८७१६ |
| ६ हजाम | ३०१३३९९ | २९०५७२४ | १०७६७५ |
| ७ लोहार | २०७०३७२ | १५४६३०८ | ५२४०६४ |
| ८ कुणबी | ४५१२७२७ | ३२२९०१८ | १२८३७०९ |
| ९ कोळी | ३१७१७९८ | २४९९०१४ | ६७२७८४ |
| १० कसई | ९६२१२३ | २८५७५८ | ६७६३६५ |
| ११ महार | ३३४२६८० | ३००२५१६ | ३४०१६४ |
| १२ चांभार | ११४९३७३३ | ११२६३६४८ | २३००८५ |
| १३ डोंब | ९२५८२० | ४२४६५० | ५००८७० |

हिंदूंच्या प्रमुख जातींपैकीं ५२ जाती सारख्या सर्व हिंदुस्थानभर घटत आहेत. महाराष्ट्रीय वाचकांना परिचित असलेल्या वरील तेरा जातींचेच आंकडे येथें दिले आहेत. त्यांवरून ब्राह्मणापासून महारापर्यंतच्या सर्व जातींवर परकीयांचे कसे हल्ले चालले आहेत हें स्पष्टपणें कळून चुकेल. वरील आंकडे डोळे उघडून वाचावेत म्हणजे शुद्धीचें महत्त्व चांगलें ठसेल. हिंदुसमाजांतील सर्व जातींनीं आपापल्या जाती कमजास्तपणें परधर्मांत समाविष्ट होत आहेत हें पाहून तो प्रवाह थांबविण्याकरितां यापुढें बद्धपरिकर होण्यास क्षणाचा विलंब लावितां कामा नये.

वर दिलेल्या आंकड्यांवरून ख्रिश्चन व मुसलमान यांची संख्या वाढत आहे असें सिद्ध होतें. ही संख्या कांहीं उगाच सुखासुखी वाढत नाहीं. प्रत्येक ख्रिश्चन व प्रत्येक मुसलमान स्वतः धर्मप्रचारक व रक्षक बनून ती संख्या वाढविण्याचा यत्न करितो. हें हिंदूंनीं विशेष लक्षांत ठेवावें. सबंध हिंदुस्थानांत इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, स्वीडन, नॉर्वे व कानडा येथील अनेक मिशनें असून त्यांच्या ख्रिस्तीधर्मप्रसाराच्या सुमारें ७०० संस्था आहेत. या सर्व संस्थांवर

त्यांचे अंदाजीं दरसाल ५०।६० कोट रुपये खर्च होत आहेत. उभ्या हिंदुस्थानांत ७०१० नेटिव्ह लोक ख्रिस्ती धर्माचा प्रसार करितात. सुमारें १९००० पाद्री बाहेरचे असून त्यांत २१३१ युरोपियन पुरुष आहेत, १४८१ विवाहित युरोपियन स्त्रिया आहेत, २४०८ कुमारिका आहेत व इतर दुसरे लोक आहेत. ख्रिस्ती धर्मोपदेशक तयार करण्याच्या शाळा ६१ असून १४१ अनाथालयें आहेत. हातकाम शिकविणारीं १७० शिल्पविद्यालयें, माध्यमिक शिक्षण देणारीं ६१७ हायस्कुलें, मोठ्या लोकांना साक्षर करणाऱ्या रविवारच्या शाळा १५८२० व शेतकी शिक्षण देणाऱ्या शाळा ९८ आहेत. वाचकहो, ख्रिश्चनांचे केवढे दांडगे प्रयत्न चालले आहेत हें काळजीपूर्वक पाहा व त्यापासून बोध घ्या. ५० कॉलेजें, ९४ ट्रेनिंग स्कूलें, ४३ छापखाने, ९९ वृत्तपत्रें ४०८ दवाखाने अशा संस्था त्यांनीं चालविल्या असून सुमारें दीड हजार डॉक्टर्स व नर्सेस आणि पांच हजार शिक्षक व शिक्षकिणी काम करीत आहेत. कॉलेज व शाळा यांतील हिंदु विद्यार्थ्यांची संख्या जवळजवळ साडेपांच लक्ष असून त्यांमध्यें २ लक्षांपर्यंत नुसत्या मुलीच आहेत. सर्व संस्थांच्या सभासदांची संख्या ८ लक्ष असून वर्गणी सुमारें १९ लक्ष रुपये गोळा होते. ख्रिश्चनांचे हे प्रयत्न हृदय विदारण करण्यासारखे नाहींत काय ? हिंदु लोक नुसती शुद्धि-शुद्धि व पतितपरावर्तन असें म्हणूं लागले, पण ख्रिश्चन मिशनरी मात्र दसपट जोरानें आपला बाटविण्याचा उद्योग करावयास बद्धपरिकर झालेले आहेत.* एकट्या हैद्राबाद संस्थानांत त्यांचे किती भयंकर यत्न चालले आहेत हें पाहा.

प्रथम १८७९ सालीं त्यांनीं तेथील पाहाणी केली व चार वर्षांत ११० लोक बाटविले. पुढें प्रगती करीत करीत १९२६ सालीं त्यांनीं आपलें कार्यक्षेत्र १६००० चौरस मैलांच्या टापूपर्यंत वाढविलें. आज त्या टापूंतील ६१४ गांवीं १२९५ प्रचारक काम करीत आहेत. त्या प्रचारकांत १२३१ प्रचारक हिंदी असून त्यांचीं मुख्य केंद्रें वीस ठिकाणीं आहेत. ४६० शाळा एकट्या हैद्राबाद संस्थानांत त्यांनीं चालविलेल्या आहेत. अशा अनेक उपायांनीं ख्रिस्ती लोकांनीं हिंदुसमाजांतील खालच्या थरांना आत्मसात् करण्याचा सपाटा चालविला आहे. निरक्षरांना साक्षर, निर्गुणांना सगुण, साक्षरांना सुविचारी, करण्याचे भगीरथ प्रयत्न

* ऑल-इंडिया ख्रिश्चन असोसिएशनमार्फत त्यांची वार्षिक कॉन्फरन्स भरते त्या वेळीं ते दसपट जोरानें काम करा असले ठराव करितात.

त्यांनीं चालविले आहेत व आपली लोकसंख्या वाढविण्याचा यत्न ते करीत आहेत. हा काल लोकशाहीचा आहे. लोकशाहीच्या झगडयांत आपलें वर्चस्व असावें, आपले प्रतिनिधि अधिक असावेत, लोकसंख्येच्या मानानें प्रतिनिधिबल वाढावें, अशा चळवळी हिंदुस्थानांत चालू आहेत. जगांतहि निरनिराळे वर्ग या प्रचंड स्पर्धेत उत्पन्न होत असून ते आपापलें अस्तित्व टिकविण्याचे आटोकाट प्रयत्न करीत आहेत. हिंदूंनो ! मिशनऱ्यांचें अनुकरण तुम्ही करणार नाहीं काय ? हिंदुसमाजाकरितां अनाथालयें, विधवाश्रम, रुग्णगृहें, अर्भकालयें इत्यादि काढावयास नकोत काय ?

मिशनऱ्यांप्रमाणें मुसलमानांचेहि यत्न चालू असून ते पाहिजे त्या प्रकारांनीं आपली संख्या वाढविण्यामध्यें महत् पुण्य आहे अशा समजुतीनें वागत आहेत. मुसलमान पुढारी, मौलवी, संस्थानिक, गुंड व फकीर हे सर्व तनमनधन खर्च करून उद्योग करीत आहेत. प्रत्येक मुसलमान हा धर्माचा सैनिक व प्रचारक बनला आहे. प्रत्येकानें हिंदूंना मुसलमान करण्याचा जणूं विडाच उचलला आहे. दिल्लीच्या हसन निझामींना म्हणे एक कोट रुपये या कार्याकरितां मिळणार आहेत. निझामीच्या युक्त्या, त्याचे डाव, त्याचीं कारस्थानें हीं सर्व **धोक्याची घंटा** या पुस्तकांत वाचलीं कीं लखकन् प्रकाश पडतो ! प्रत्येक हिंदूनें तें पुस्तक वाचावें. ख्रिश्चन मिशनरी अनेक पद्धतशीर उपायांनीं आणि मुसलमान लोक रानटी उपायांनीं हिंदुसमाजाची संख्या घटवीत आहेत. मुसलमानांच्या आडदांड हालचालीकडे पाहिलें तर तिकडून हिंदुसमाजावर जोराचे आघात होत आहेत असें दृष्टीस पडतें. आगाखानी पंथाचा प्रसार वरच्या वर्गांत जारीनें होत आहे; तर पीरजादे पंथ खालच्या लोकांत झपाट्यानें प्रसरत आहेत. सोफी पंथाची दीक्षा पुष्कळ हिंदु लोक एकसारखे घेत आहेत. निजामसरकार आपल्या राज्यांत हिंदूंना मुसलमान करण्याकरितां दरसाल १३ लाख रुपये खर्च करितें; तर भोपाळची बेगम अहिंदूंना हिंदु करणें म्हणजे खुषीनें हिंदु धर्मांत घेणें हा कायद्यानें गुन्हा आहे असें ठरविते व याप्रीत्यर्थ बरासचा पैसाहि संस्थानच्या तिजोरींतून खर्च करिते. हसन निजामी, डॉ. किचलू, अलीबंधू, फार काय पण बॅरिस्टर जीनासुद्धां मुसलमान धर्माच्या व समाजाच्या वृद्धीकरितां आपापल्या परीनें जारीनें उद्योग करीत आहेत. त्याच्या उलट हिंदु संस्थानिक काय करितात ? संस्थानिकांत कुणाला घोडयांचा तर कुणाला मोटारींचा शोक ! कुणी आळसांत

तर कुणी नुसत्या स्नानसंध्येंत आयुष्याचे दिवस कंठीत आहेत असें दिसतें. बरेच पुढारी बोलण्यापेक्षां अधिक कांहीं करीत नाहींत. त्यांतल्यात्यांत हिंदुसमाजाविषयीं चांगला उद्योग एकटा आर्यसमाज सांगण्यासारखा करीत आहे ही अभिमानाची व समाधानाची गोष्ट आहे. आर्यसमाज हा आर्यांच्या विजिगीषु स्वभावाप्रमाणें जोरानें व धडाडीनें कार्य करीत आहे, तसेंच यापुढें सर्व हिंदूंनीं करावयास पाहिजे.

ख्रिश्चन व मुसलमानांप्रमाणें इंग्रजसरकारहि हिंदुसमाजाचा ऱ्हास करण्यास टपून बसलें आहे. शिरगणतीचे अधिकारी अलिप्तपणा न ठेवतां मुसलमान-पक्षपाती होतात व कांहीं हिंदु जातींना अनेक कारणें दाखवून 'अहिंदु' सदरांत ढकलीत असतात. ब्राह्मणांचें वर्चस्व नाकबूल करणें, ब्राह्मणादि जातींकडून मंत्रोपदेश न घेणें, वेदप्रामाण्य नाकबूल करणें, मोठमोठ्या हिंदु देवतांना न भजणें, ब्राह्मणांकडून पौरोहित्य न करवून घेणें. स्पृश्य हिंदूंनीं कांहींचा विटाळ न मानणें, असल्या सबबींवर हिंदुत्वांतून कांहीं लोकांना सरकारी अधिकारी बाहेर काढीत असतात. हिंदु पुढाऱ्यांनीं व जनतेनें याबद्दल आंदोलन करून 'पितृभू व पुण्यभू, जो हिंदुस्थानाला मानतो तो हिंदु' अशी व्याख्या सरकारमान्य करून घेतली पाहिजे. म्हणजे हे अधिकारी थंड बसतील. हिंदु समाजाचे हे शत्रुत्रय लक्ष्यांत घेऊन व वैदिक परंपरा पाहून विश्वाला आर्य करण्याची वृत्ति हिंदु जातींमध्यें उत्थान पावली पाहिजे. कास्पियन समुद्रकांठीं काश्यप ऋषीनें आर्यीकरण केलें, तर देवल ऋषीनें आरबी समुद्रावर आर्यीकरणाचा आखाडा उघडला. त्याप्रमाणें जगांत आर्यपुत्र गेले पाहिजेत व सर्व मानवांना त्यांच्या कल्याणाकरितां हिंदू केलें पाहिजे. **हिंदूकरण म्हणजे अल्पाला मोठें करणें होय.** इतर धर्मीय लोक अल्प आहेत, कारण त्यांना सर्व जगांत एक परब्रह्म आहे, सर्वत्र ईश्वर आहे, मनुष्य ईश्वर आहे, हें तत्त्वज्ञान माहीत नाहीं. म्हणून त्यांचेकडून अपरमित अन्याय घडतात व मनःशांतीचा लेशहि त्यांना मिळत नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांना आधिभौतिक सुखें परिचित आहेत, परंतु आत्म-सुख, आत्मानंद यांची त्यांना जाणीव नाहीं. एतदर्थ शेजारी व मी, पिंड व ब्रह्मांड यांत एकच तत्त्व असून तें शुद्ध, मंगल व आनंदयुक्त आहे, असा साक्षात्कार जगाला घडविला पाहिजे.

जगांत मनःसमाधानाचें साधन तत्त्वज्ञान हेंच होय. आजवर जगांत अनेक तत्त्ववेत्ते होऊन गेले, त्यांनीं आपापल्या परीनें पुष्कळ तत्त्वविचार केलेला

आहे. परंतु उपनिषदांतील वैदिक तत्त्वज्ञान हें सर्व जगामध्यें श्रेष्ठ आहे. श्रीमत् शंकराचार्यांनीं शास्त्रीय परिभाषेंत तर्ककुशल पद्धतीनें जें अद्वैत तत्त्वज्ञान जगांपुढें ठेविलें तें पाहून सर्व जग मान डोलावतें. एक काल असा होता कीं, पृथ्वींतील सर्व मानव हिंदुस्थानांत येऊन अक्कल शिकून जात असत. आज सर्व मानव ज्ञानाकरितां येथें येत नसले तरी पोटाकरितां येथें येतातच, म्हणून त्यांना येथें व त्यांच्या देशांतहि जाऊन हें तत्त्वज्ञान शिकविणें हें हिंदुसमाजाचें कर्तव्य आहे. हिंदु तरुणांनीं हें विशेषत: लक्षांत ठेवावयास पाहिजे.

शुद्धिकार्य हें केवळ संख्याबलाकरितां आहे, यांत धर्माचा कांहीं संबंध नाहीं, असें म्हणून पुष्कळ लोक शुद्धीची हेटाळणी करितात. परंतु हिंदुसंघटनेच्या क्षेत्रांतील शुद्धी हें महत्त्वाचें कार्य आहे हें ते विसरतात. आम्ही तर असें म्हणतों कीं, हिंदुसंघटना म्हणजे हिंदुसमाजाची पुनर्घटना. अर्थात् लोकशाहीला उपयुक्त अशा त्या पुनर्घटनेंत संख्येचाहि प्रश्न येतो. लोकशाही ही संख्येवरच अवलंबून आहे, आणि संख्या वाढविणें हें ईशसंकल्पाविरुद्ध नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वरच जेथें म्हणतो कीं, "एकोऽहं बहु स्याम्।" एकाचे पांच, पांचांचे पन्नास, म्हणजे बहु व्हावें, तेथें इतरांनीं तें केलेंच पाहिजे याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. श्रीरामाला वानरगण, कृष्णाला गोपालगण व शिवाजीमहाराजांना मावळे यांची संख्या पाहिजे होती ना? मनुष्य लग्न करून संख्याच वाढवीत असतो. धान्याचा कण कणीस देऊन संख्येंतच भर घालतो. केळ व्याली, गाय व्याली, म्हशीला रेडकूं झालें, बाईला मूल झालें कीं आनंद होतो याचें कारण सृष्टिक्रम चालविण्याला संख्याबलानें प्रतिनिधि उभा राहिला हें होय. संख्येला नाकें मुरडणारे स्वतः संख्याच वाढवितात. होमरूललीगचे लक्ष सभासद व्हावेत, कॉंग्रेसचे कोट सभासद पाहिजेत, खादीवाले ५ कोट लोक पाहिजेत, एक लक्ष सत्याग्रही पाहिजेत, १० लक्ष लोक तुरुंगांत गेले पाहिजेत, एक कोट रुपये जमले पाहिजेत, १० लाख तरी पाहिजेतच, या सर्व वाक्यप्रयोगांवरून संख्याबलाकडे जगाचा नैसर्गिक कल आहे, नव्हे संख्यावृद्धि हा जगाचा स्वभाव आहे असें म्हणावयास नको काय? हिंदु लोकहि या निसर्गप्रेरित जीवितस्वभावाप्रमाणें वागत आहेत. शुद्धिकार्य चढाईनें करून मूळचे जे सात कोट हिंदु हल्लीं अर्धहिंदु बनले आहेत त्यांना पूर्ण हिंदु करण्याचा त्यांचा यत्न आहे. या स्तुत्य उद्योगाला मदत करितां आली तर करावी, निदान विघ्नें तरी बुद्धिभेद उत्पन्न करून आणूं नयेत असेंच आक्षेपकांना सांगितलें पाहिजे.

पुष्कळ हिंदु पुढाऱ्यांना अद्याप हिंदु बाटतात कसें हेंच कळत नाहीं, असें ते म्हणतात. पण या जाणत्यांना हें सांगणें म्हणजे सूर्याला दिवटी दाखविण्यासारखें आहे. इंग्रजांनीं आपलें राज्य घेतलें कसें ? असें शेवटचे रावबाजी ब्रह्मावर्ती गेल्यावर म्हणे विचारीत असत ! स्नान, संध्या, जप, तप, होमहवन होत असतांना राज्य कसें गेलें हें कांहीं त्यांना कळत नसे. राज्य गेलें कसें व हिंदु बाटले कसे हें कळत नसलें तरी राज्य गेलें खास व हिंदु बाटले हें पण अगदीं निश्चित ! राज्य जाण्याचें व हिंदु बाटण्याचें कारण एकच, अगदीं एकच, तें काय तर मूर्खपणा ! मूर्खपणानें बाटलेल्या हिंदूंना शुद्ध करण्याचें कार्य आणि अर्धहिंदूंना पूर्ण हिंदु करण्याचें कार्य खरें शहाणपणाचें आहे. तें न करितां जर आपण विचिकित्सा करीत बसलों तर "**वयं तत्त्वान्वेषी मधुकरहस्तास्त्वं खलु कृती**" असें म्हणण्याचा प्रसंग येईल. हिंदु लोक हे अज्ञानानें बाटले, धर्मभोळेपणानें बाटले, छलानें बाटले, बलानें बाटले, खाऊन बाटले, पिऊन बाटले, संभोग करून बाटले, छद्मानें बाटले, फार काय पण अपकृत्यानेंहि बाटलेले आहेत. परंतु यांतील एकाहि कारणानें धर्मांतर होत नाहीं हें सांगण्याकरितांच शुद्धिकार्य करावयाचें आहे. छल, बल, छद्म, अपकृत्य, खाणें, पिणें, संभोग हीं धर्मांतराचीं कारणें नव्हेत. मनानें विचारपूर्वक धर्म स्वीकारला तरच धर्मांतर होतें हें शास्त्र अडाणी हिंदुसमाजाला शिकवावयाचें आहे.

या कार्याला शास्त्रीय आधार शोधीत बसण्याची जरूर नाहीं. कारण वेदकालापासून तों पेशवाईच्या अखेरपर्यंत वेळोवेळीं शुद्धिकार्यें झालेलीं आहेत. फक्त आजच्याप्रमाणें त्या कार्याला पूर्वीं राष्ट्रीय स्वरूप नव्हतें इतकेंच. सामवेद व अथर्ववेद यांमध्यें आर्यांनीं व्रात्यांचें शुद्धिकार्य केल्याचा उल्लेख आहे. त्या संस्कारास व्रात्यस्तोम म्हणतात. 'व्राते भावः व्रात्यः' म्हणजे संघ करून राहणारे लोक अशी कल्पना केली तर ती बरीच सयुक्तिक ठरणार आहे. वेदभाष्यकार सायनाचार्य यांनीं अथर्ववेदांतील या व्रात्य कांडाची पुढीलप्रमाणें स्तुति केली आहे. '**अत्र काण्डे व्रात्यमाहिमा प्रपंच्यते । व्रात्योऽधिकारी व्रात्यो महानुभावो व्रात्यो देवप्रियः । न पुनरेतत् सर्वं व्रात्यपरं प्रतिपादनम् ॥ अपि तु कंचिद्विद्वत्तमं महाधिकारं पुण्यशीलं विश्वसंमान्यं कर्मपरैर्ब्राम्हणैर्विद्दिष्टं व्रात्यमनुलक्ष्य वचनम् इति मंतव्यम् ॥**' या व्रात्य प्रकरणावरून व "**कृण्वतो विश्वमार्यम्**" या वेदवाक्यावरून वैदिक आर्यांची शुद्धिकार्याबद्दलची वृत्ति कशी होती हें समजतें.

शास्त्रदृष्ट्या विचार केला तर शास्त्राची पतितपरावर्तनाला अथवा धर्मभ्रष्टाच्या शुद्धिकरणाला पूर्ण संमति आहे असें उघड दिसतें. कारण मनुष्य हा स्खलनशील प्राणी असून अनेक कारणांनीं त्याला पातित्य येतें. अनेक पतननिमित्तांपैकींच असत् शास्त्राचा स्वीकार हें एक निमित्त आहे. म्हणजे तें एक उपपातक आहे. इतर उपपातकांना जशीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, तसेंच असत्शास्त्रस्वीकारालाहि सांगितलेलें प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतां येतें, असें शास्त्रमत आहे. कांदा, लसूण, गाजर, वांगें, मुळा असले पदार्थ बुद्धिपुरःसर खाल्ले असतां पातित्य येतें. विहीत कर्म न करणें, निंद्य कर्मांचा स्वीकार करणें, इंद्रियनिग्रह न करणें यांमुळें मनुष्य पतित होतो. मांस, लाख, लवण, दूध, तीळ, तेल, दहीं, मध इत्यादि जे पदार्थ ब्राह्मणांनीं विकूं नयेत असें म्हटलें आहे तें विकल्यानें पातित्य येतें. पतितसंसर्गानें पातित्य येतें. त्यांची निवृत्ति ज्या प्रकारच्या प्रायश्चित्तानें होते तसलींच प्रायश्चित्तें देऊन धर्मभ्रष्टालाहि शुद्ध करून घेण्यास हरकत नाहीं.

पतिताचा सहवास घडल्यानेंहि पातित्य येतें, असें अनेक स्मृतिकारांचें म्हणणें आहे, तें असें—

हारित—**संवत्सरेण पतति पतितेन सहाचरन् ।**
**याजनाध्यापनाद्यौनादेकशय्यैक भोजनात् ॥**
कूर्मपुराण—**अज्ञानादथवा मोहात् कुर्यादध्यापनं द्विजः ।**
**संवत्सरेण पतति सहाध्ययनमेव च ॥**
**संवत्सरं तु पतितैः संसर्गं कुरुते तु यः ।**
**यानशय्यासनैर्नित्यं जानन्वै पतितो भवेत् ॥**
देवल—**संवत्सरेण पतति पतितेन सहाचरन् ।**
**भोजनासनशय्याभिः कुर्वाणः सार्वकालिकम् ॥**

अध्यापन, सहासन, संभाषण, सहयान, सहपान, सहभोजन, सहशयन, इत्यादि अनेक कारणांनीं पातित्य येऊं शकतें. याज्ञवल्क्यस्मृतीमध्यें आपद्धर्म प्रकरणांत अनेक पतननिमित्तें सांगितलेलीं आहेत व मनुस्मृति, अध्याय ११, यामध्यें उपपातकांची मोठी यादी दिली आहे. त्यांतील शेवटचे दोन श्लोक येथें देतों.

**अनाहिताग्निता स्तेयमृणानामपनक्रिया ।**
**असच्छास्त्राधिगमनं कौशीलव्यस्य च क्रिया ॥ ६४ ॥**

**धान्यकुप्यपशुस्तेयं मद्यपस्त्रीनिषेवणम्।**
**स्त्रीशूद्रविट्क्षत्रवधो नास्तिक्यं चोपपातकम् ॥ ६५ ॥**
मनुः अ. ११

अग्निहोत्र न ठेवणें, चोरी करणें, ऋणत्रयें न फेडणें, असच्छास्त्राचा म्हणजे श्रुतिस्मृति-विरुद्ध शास्त्राचा स्वीकार करणें, नृत्य, गीत, वाद्य यांचें सेवन करणें, धान्य, धातु, पशु हीं चोरणें, मद्यपी स्त्रीशीं गमन करणें, स्त्रिया, शूद्र, वैश्य, क्षत्रिय यांना मारणें, अदृष्टावर विश्वास न ठेवणें हीं सर्व उपपातकें होत. या उपपातकांना संतपन कृच्छ्र, पर्णकृच्छ्र, तप्त, पाद, प्राजापत्य, अतिकृच्छ्र, सौम्यकृच्छ्र, पराक, चांद्रायण इत्यादि प्रायश्चित्तें सांगितलेलीं आहेत. त्यांपैकीं एखादें प्रायश्चित धर्मभ्रष्टाला द्यावें व शुद्ध करून घ्यावें. प्रायश्चित्त हें द्रव्याच्या प्रतिनिधीनेंहि करतां येतें व ती दक्षणा रुपाया सव्वा रुपायापेक्षां अधिक होत नाहीं. तेव्हां मुसलमान व ख्रिश्चन धर्माचा ज्यांनीं जुलमानें स्वीकार केला असेल त्यांना त्यांची इच्छा असल्यास वर सांगितल्याप्रमाणें अल्पप्रायश्चितानें शुद्ध करून घेतां येतें असेंच शास्त्रमत आहे.

शुद्धीचा विचार प्रामुख्यानें देवलस्मृतीमध्यें केलेला आहे. देवलस्मृतीच्या पूर्वकालीं म्हणजे बौद्ध धर्माच्या अमदानींत मतांतराला पूर्ण स्वातंत्र्य होतें. आणि कोणी बौद्ध झाला अगर चार्वाक बनला तर तो समाजबाह्य झाला, असें समजलें जात नसे. मतांतराबरोबर समाजांतर करण्याची क्रिया आधीं मुसलमानांपासूनच रूढ झाली. त्या क्रियेचा प्रतिकार सिंध देशांतील देवाल बंदरांतील देवलऋषींनीं इ. स. ७२१ मध्यें केला. इतिहासाचार्य राजवाडे हे येथील एकमास वास्तव्यांत देवलस्मृतीचा हाच काल असावा असें म्हणाले होते. देवलस्मृति केवळ शुद्धिकार्याकरितांच अवतीर्ण झाली असून तिचा नुसता प्रारंभ पाहिला तरी सर्व शंका निर्मूल होतात. देवलस्मृतींत 'म्लेंच्छैश्च नीता' 'म्लेंच्छान्न' 'म्लेंच्छीकृत' असे पुष्कळ प्रयोग आहेत, त्यांवरून महंमद कासमच्या स्वारीनंतर ही शुद्धिस्मृति झाली असें म्हणावें लागतें.

## देवलस्मृतीचा प्रारंभ

**सिंधुतीरे सुखासीनं देवलं मुनिसत्तमम्।**
**समेत्य मुनयः सर्वे इदं वचनमब्रुवन् ॥ १ ॥**

भगवन् म्लेंच्छनीता हि कथं शुद्धिमवाप्नुयुः ।
ब्राह्मणाः क्षत्रियाः वैश्याः शूद्राश्चैवानुपूर्वशः ॥ २ ॥
कथं स्नानं कथं शौचं प्रायश्चित्तं कथं भवेत् ।
किमाचारा भवेयुस्ते तदाचक्ष्व सविस्तरम् ॥ ३ ॥

असा हा या स्मृतीचा आरंभ असून पुढें ८०।९० श्लोकांत या विषयाचा औदार्यानें विचार केला आहे. तो इतका कीं दहापासून वीस वर्षांपर्यंत

गृहीतो यो बलान्म्लेंच्छैः पञ्च षट् सप्त वा समाः ।
दशादि विंशतिर्यावत् तस्य शुद्धिर्विधीयते ॥ ५३ ॥

भ्रष्ट झालेल्यांची शुद्धि करण्याची अनुमति ही स्मृति देते. काशिकर पंडित मात्र या स्मृतीचा एक वर्षाच्या आंत पूर्वजातींत प्रवेश, चार वर्षांच्या आंत अहिंदुत्वनिराकरण व पुढें मरण इतका कृपणतेनें अर्थ करितात. पण तो अयोग्य आहे.

पतित कन्येविषयीं शास्त्र असें आहे:—

कन्यां समुद्वहेदेषां सोपवासामकिञ्चनाम् ।२६१।–याज्ञवल्क्य

या श्लोकावर विज्ञानेश्वरांनीं टीका करितांना वृद्धहारिताचें वचन स्पष्टीकरणार्थ दिलेलें आहे.

पतितस्य तु कुमारीं विवस्त्रामहोरात्रोपोषितां प्रातः
शुक्लेनाहतेन वाससाऽच्छादितां नाहमेतेषां
न ममेति त्रिरुच्चैरभिदधानां स्वगृहे वोद्वहेत् ॥

तसेंच वसिष्ठाचेंहि एक वचन आहे.

पतितपुत्रः पतितो भवत्यन्यत्र स्त्रियः
सा हि परगामिनी तामरिक्थामुपेयात् ।

या दोन्ही वचनांचा आशय असा आहे कीं, पतिताची कन्या ही पतित नाहीं. ती दुसऱ्याच्या घरीं नांदावयाला जाण्याची असल्यामुळें तिच्याशीं तीर्थावर अगर घरींहि लग्न लावावें. मात्र बापाकडून कांहीं द्रव्य घेऊं नये किंवा तिजजवळ बापाकडील वस्त्रपात्र, द्रव्य कांहीं असतां कामा नये. तिनें उपास करावा. दुसऱ्यानें दिलेलें शुभ्रवस्त्र नेसावें आणि माझा व पतित बापाचा कांहीं संबंध नाहीं असें त्रिवार म्हणावें, म्हणजे ती वरण्यास योग्य होते.

पतित संततीबद्दल शास्त्रप्रमाणें पुढील आहेत.

" **अथ पतिताः समवसाय धर्मांश्चरेयुरितरेतर याजका इतरेतराध्यापका मिथो विवदमानाः पुत्रान्संनिष्पाद्य ब्रूयुर्विप्रव्रजतास्मभ्यमेवमार्यान् संप्रतिपत्स्येति** ॥ —बौधायन धर्मसूत्र

ज्यांनीं प्रायश्चित्त घेतलेलें नाहीं, अशा पतितांनीं आपला संघ करून पतितांनीं विहित अशा धर्मांचें आचरण करावें. त्यांनीं परस्परांतच यजन, अध्यापन व विवाह करावेत. पुत्र निर्माण करून त्यांना असें सांगावें कीं, आमच्या पासून वेगळे व्हा व अशा रीतीनें शुद्ध होऊन आर्यांत जाऊन मिसळा.

हेंच वचन आपस्तंब धर्मसूत्रांतहि आलें आहे. वृद्धहारित धर्मसूत्रांत असेंच म्हटलें आहे. वासिष्ठ व हारित यांच्या मतानें पतितपुत्र पतित होतो. बौधायनानें पतितपुत्राचा शुद्ध जातींत समावेश करण्याच्या वेळीं पुढील प्रायश्चित्त सांगितलें आहे.

**अशुचिशुक्रोत्पन्नानां तेषामिच्छतां**
**प्रायश्चित्तिः पतनीयानां तृतीयोंऽशः ।**

पतिताच्या शुक्रापासून उत्पन्न झालेल्या पुत्रांना इच्छा असल्यास त्रैवार्षिक व्रताच्या तृतीयांश प्रायश्चित्त द्यावें. तसेंच आपस्तंब धर्मसूत्रांत पतितास द्वादशवार्षिक व्रतरूप प्रायश्चित्त सांगितल्यानंतर असें म्हटलें आहे—

**ततः शुद्धिः अथसंप्रयोगस्यादार्यैः ।**

हें प्रायश्चित्त केल्यानंतर पूर्ण शुद्धि होते, आणि पुढें शुद्ध आर्यांशीं व्यवहार्यता पूर्णपणें येते. हें सूत्रकारांचें धोरण लक्षांत ठेवून तदनुसारी प्रायश्चित्तें, देश, काळ, वय, शक्ति हीं पाहून द्यावींत व शुद्धिकार्याचा धडाका चालवावा. शुद्धिकृतांशीं अगदीं मोकळ्या मनानें सर्व व्यवहार अवश्य केले पाहिजेत, म्हणजेच केलेली शुद्धि पचते.

शुद्ध केलेल्या मनुष्याचा कोणत्या जातींत समावेश करावयाचा असा प्रश्न पुढें येतो. त्याचें उत्तर हेंच कीं, जी जात त्याला आपल्या मध्यें संतोषानें घेत असेल व शुद्धिकृताला तेथें जाणें पसंत असेल तर त्या जातींत त्याचा समावेश करावा. हिंदुसमाजांतील जातींत पतिताचा समावेश होत नसेल तर आर्यसमाजांत त्याला दाखल करावें. आर्यसमाज हा हिंदूंचा मोठा बालेकिल्ला आहे.

मुसलमानांचा राग सर्व हिंदूंमध्यें आर्यसमाजावरच अधिक आहे. याचें कारण, तो समाज त्यांना जेथें तेथें पुरून उरत आहे. सबंध हिंदुस्थानांत मिशनरी, मौलवी यांना तोडीस तोड फक्त आर्यसमाजानें दिली आहे. पंजाबांत हिंदूंचें अस्तित्व आर्यसमाजानें ठेवलें आहे. श्रद्धानंदजींची हत्या ते आर्यसमाजी व चढाईचें शुद्धिकार्य करणारे म्हणूनच झाली. यांच्या तोडीचे १०।१५ वीर आर्यसमाजानें आजवर बळी दिलेले आहेत. आर्यसमाजाच्या प्रचारकांचे व मुसलमानांचे तंटे नित्य होत असतात. व्याख्यानाच्या भरांत मुसलमान म्हणतात, " हे कृष्ण, तुझको गीता जलाने पडेगी. " त्याला आर्यवीर उत्तर देतात, " इस्लाम, तुझको चोटी ( शेंडी ) रखानी पडेगी. " आम्हांलाहि एक दोन वेळां हेंच वाक्य सांगावें लागलें. हल्लीं सर्व मुसलमान ज्या तांबडया तुर्क टोप्या घालतात त्यांवर शेंडी ( गोंडा ) आलीच आहे. फक्त आतां टोपींतून खालीं डोक्यावर ती उतरावयाची राहिली आहे. मुसलमान प्रचारक म्हणतात, " इस्लाम, तुझको तलवार उठानी पडेगी. " आर्यपुत्र उत्तर देतो, " मक्केमें विष्णुका मंदिर बनेगा। और अलम् इस्लाम तो डूब जायेगा।" या वाग्युद्धावरून उभयपक्षांच्या अंतःकरणवृत्ती कशा आहेत हें समजून कार्यास लागलें पाहिजे.

महाराष्ट्रांत आर्यसमाजाबद्दल बराच विपरीत ग्रह अद्यापि कुठें कुठें आहे. परंतु, महाराष्ट्रियांनीं या वेळीं सर्वांत पुढें असणाऱ्या या धर्मबंधूंना साह्य केलेंच पाहिजे. मतमतांतरें असणारच, परंतु त्यामुळें कार्यहानि होऊं देतां कामा नये. महाराष्ट्रियांनीं आर्यसमाजी व्हावें असें कोणीहि म्हणणार नाहीं. परंतु हिंदुसभा व शुद्धिसभा या दोघींनीं सख्या बहिणींप्रमाणें वर्तन ठेवून जितके अर्धहिंदु लोक पूर्ण हिंदु करितां येतील तितके केले पाहिजेत. हिंदुसभा व शुद्धिसभा हीं दोन दुकानें समजून आलेलें गिऱ्हाईक न घालवितां हिंदुसमाजांत पचवून टाकलें पाहिजे. कारण मुसलमान हिंदूंना बाटवितांना धर्म, शास्त्र अगर माणुसकीहि पाहात नाहींत. मग शास्त्राचें बंधन केवळ हिंदूंनाच कशाला? जसें जमेल तसें शुद्धिकरण केलें पाहिजे. नाहीं तर आमचें शास्त्र त्यांच्या पथ्यावर पडेल!

देवलस्मृति ही केवळ शुद्धिकार्याकरितां उत्पन्न झालेली आहे. त्यानंतर भक्तिविजय या लोकपरिचित ग्रंथांत बाहिरंभटाचें शुद्धिकरण पैठणच्या ब्राह्मणांनीं केलें असें अ. ४४ मध्यें आख्यान आहे. जगद्गुरु नित्यानंद सरस्वति यांच्या ज्योतिर्मठाच्या सहीशिक्क्यानिशीचें शके १७९१ चें शुद्धिकार्याबद्दलचें

आज्ञापत्र आहे. उत्तर कोंकणांतील यजुर्वेदी ब्राह्मणांनीं हजारों शुद्धिकार्यें केल्याचीं कागदपत्रें मिळतात. संभाजी राजे यांच्या वेळचें एक आज्ञापक कित्येक सह्यांनिशीं इतिहासाचार्य राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेलें आहे. पेशव्यांच्या रोजनिशीमध्यें ब्राह्मण व मराठे यांना शुद्ध करून घेतल्याचीं प्रकरणें ३७३।३९९।२८४ अशीं आहेत. पारसनिसांनीं पेशवेदप्तरांतील जी यादी प्रसिद्ध केली आहे, तीमध्यें इ. स. १८१५-१६ सालीं शेवटच्या बाजीरावांनीं वसईप्रांतांत पळतां पळतां शुद्धि-कार्याला हुकूम दिलेले आहेत. छत्रपति शिवाजी महाराज यांनीं बजाजी निंबाळ-करांना शुद्ध करून घेऊन त्यांच्याशीं सोयरीकहि केली ! वसईप्रांतांत फिरंग्यांशीं टक्कर देण्याचें कार्य निर्मळच्या आसपासच्या ब्राह्मणांनीं केलें त्यांपैकीं फक्त शेवटचे दोन उतारे देऊन व शुद्धिकार्याची रूपरेषा देऊन हें प्रकरण संपवितों.

## निंबाळकरांची शुद्धि

फलटणचे बजाजी नाईक निंबाळकर यांस आदिलशहानें पकडून मुसलमान झाल्यास मोठी जहागीर देऊं, नाहीं तर असलेलें वतनहि जप्त करूं अशी धमकी दिली. ४०० वर्षें उपभोगिलेलें वतन बुडवून पोराबाळांच्या अन्नांत माती काल-विण्याचें धाडस बजाजीच्यानें होईना. म्हणून त्यानें शहा जर आपली मुलगी देत असेल तर मी मुसलमान होतों, असें कबूल केलें. त्याप्रमाणें लग्न होऊन बजाजी मुसलमानहि झाला. निंबाळकरांचा भोसले घराण्याशीं फार जुना ऋणानुबंध होता. त्यामुळें त्यानें अप्रशस्त कृत्य केल्याचा पस्तावा झाल्याचें मातुःश्री जिजा-ईस कळविलें. तें ऐकून मातुश्री जिजाईस फार वाईट वाटलें. कारण पिढीजाद संबंध असलेल्या या निंबाळकरांच्या घराण्यामुळेंच शहाजी व शिवाजी एवढ्या योग्यतेस चढले होते. तिनें समस्त मराठा मंडळ बोलावून " आपत्प्रसंगामुळें नाइकांकडे कांहीं दोष नाहीं, " असें जाणून शास्त्राधारें त्यास शुद्ध करून गोतांत घेतलेंच; शिवाय निंबाळकरांविषयीं कोणताहि किंतु मनांत येऊं नये म्हणून शिवाजीची मुलगी सखूबाई ही जिजाईनें निंबाळकरांच्या थोरल्या मुलास दिली.

## वसईभागांतील शुद्धिकरण

" बाटून ख्रिस्ती झालेल्या हिंदु लोकांस परत स्वधर्मांत घेण्याचे अनेक प्रयत्न तत्कालीन ब्राम्हणांनीं केलेले आहेत. अशा लोकांस आपल्या पिढीजाद धर्मांत परत येण्याबद्दल ते उपदेश करीत, इतकेंच नव्हे तर गोकुळअष्टमी वगैरे सारख्या मोठ्या मेळ्यांच्या दिवशीं बाटलेल्या लोकांस समुद्रस्नान अगर गंगास्नान

घालून शुद्ध करून घेत. अशा पवित्र दिवशीं गंगास्नान केल्यानें सर्व पातकांचें जसें क्षालन होतें, तसें ख्रिस्तधर्म स्वीकारून व्हावयाचें नाहीं, असा शास्त्राधार ते सर्व लोकांस पटवीत. ही ब्राह्मणांची युक्ति पाहून पाद्र्यांचें पित्त खवळून जाई. त्यांचा उद्योग बंद पाडण्याकरितां ठाणें, वसई, मुंबई वगैरे ठिकाणच्या खाड्यांच्या व समुद्राच्या कांठीं त्यांनीं खांबांवर जिकडे तिकडे क्रूस रोवून ठेविले. असें झालें म्हणजे क्रूस रोंविलेला नसेल अशा ठिकाणीं जाऊन ब्राह्मण आपला मेळा भरवीत. शेवटीं ख्रिस्त्यांच्या जाचास त्रासून त्यांनीं वसई नजिक रानांत एक तलाव शोधून काढला. तेथें कांहीं दिवस ब्राह्मणांचें शुद्धीकरण गुप्तपणें चालू होतें. पुढें तें उघडकीस आल्यावर पोर्तुगीज शिपायांनीं ब्राह्मणांवर हल्ला करून त्यांस हुसकून दिलें, त्या वेळीं एक बैरागी एकदां ख्रिस्ती होऊन पुनः हिंदु झालेला निर्भयपणें ( पाद्र्यांच्या ) फौजेच्या समोर एकटा उभा राहिला. तेव्हां तर त्या ख्रिस्त्यांचें पित्त जास्तच खवळून त्यांनीं त्या जागेचा विध्वंस केला. व गाई मारून त्यांचें मांस व रक्त तलावांत व बाजूस शिंपडून ती जागा अपवित्र केली. " ( ऑगष्ट १५६४, ब्रिटिश रियासत, पान २८३-२८४ ).

## शुद्धिसंस्काराची रूपरेषा

ज्या साधकाला शुद्ध व्हावयाचें असेल त्याची चौकशी गांवांतील चार दोन शिष्टांनीं करावी आणि पश्चात्ताप झाल्याचें दिसल्यास मिळालेल्या माहितीवरून शास्त्रानुरोधानें प्रायश्चित्त ठरवावें. एकादशी, पूर्णिमा, अमावास्या, अशा पर्वकाळीं धर्मभ्रष्टानें गांवांतील शिष्टांची शुद्धी करण्याबद्दल प्रार्थना करावी. मला पश्चात्ताप झाला आहे, मजवर अनुग्रह करा, आपण सांगाल तें प्रायश्चित्त घेईन, अशी प्रार्थना करून नमस्कार करावा. सभ्यांनीं त्यांना उपदेश करण्यास सांगावें. नंतर विहीर, नदी, ओढा अशा ठिकाणीं जाऊन धर्मभ्रष्टाकडून संकल्प सोडवावा. देश कालांचा उच्चार करून अमुक मत ( माहंमदीय मत ) स्वीकारजन्य पातित्या-**भक्ष्यभक्षणापेयपानागम्यागमनादिदोषनिरासार्थं आचार्योपदिष्टं कृच्छ्र त्रयं प्रायश्चित्तं करिष्ये**' असा संकल्प सोडावा. नंतर तीर्थविधिप्रमाणें क्षौराचा संकल्प सोडवून आज्ञा देऊन त्याची शेंडी ठेवून क्षौर करवावा. क्षौरानंतर भस्म, गोमय, मृत्तिका हीं शरिराला लावून स्नानें करवावीत. हीं स्नानें झाल्यावर साधकाला पंचगव्य प्यावयास द्यावें. नंतर त्याजकडून यथाशक्ति दंड द्रव्यरूपानें घ्यावा. स्त्रियांना क्षौर नाहीं. त्यांना क्षौराशिवाय सर्व विधी सारखाच. नंतर एक किंवा

दोन ब्राम्हणांनीं ताम्हनामध्यें स्वच्छ पाणी घ्यावें आणि त्याचें मार्जन आंब्याचीं पानें अगर दर्भ यांनीं साधकाच्या अंगावर करावें. पवमान मंत्रांनीं शुद्धि झाल्यावर मग अंग पुसण्यास सांगावें व नवीं वस्त्रें धारण करण्यास द्यावीं. स्त्रियांना कुंकू, बांगड्या, चोळी असे सौभाग्य अलंकार द्यावेत. पुरुषाला गंध लावून त्याच्या गळ्यांत तुळशीची माळ घालावी. पूर्वीचीं नांवें बदलून हिंदु पद्धतीचीं नांवें ठेवावीं; आणि " मित्राय नमः रवये नमः " असें म्हणून सूर्याला पांच नमस्कार घालण्यास सांगावें. ' अकालमृत्युहरणं ' या मंत्रानें तीर्थ द्यावें. नंतर आचार्यांनीं साधकांना ' तुम्ही हिंदु झालां, तुम्ही हिंदु अहांत, सूर्य ही हिंदूंची देवता आहे, गीता हा हिंदूंचा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे, ' असें सांगून गीता हातांत द्यावी. गीतेंतील पुढील श्लोक सर्व साधकांकडून तीन वेळां वदवावेत; आणि त्यांचा अर्थ समजून सांगावा.

## पंचश्लोकी शुद्धिगीता

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।।** अ. ४
**ईश्वरः सर्व भूतांना हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ।।** अ. १८
**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।।**
**अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।** अ. ९

शेवटीं ईश्वराची तुमच्यावर कृपा झाली आहे, तुम्ही निर्भय असा, तुम्हांला कोणाचें भय नाहीं, असें सांगावें, आणि दररोज स्नान, सूर्यदर्शन, गीतेचा एक श्लोक पाठ, इत्यादि आचार सांगावा. शुद्धिकरणाचें सामान्य धोरण येथें दिग्दर्शित केलें आहे. स्थानिक शिष्टांनीं सोयीप्रमाणें इष्ट ते फेरफार करून संस्कार करावा.

---

# प्रकरण सहावें

## समाजबलविचार

### ब्राम्हणब्राम्हणेतर वाद

बृहन्महाराष्ट्रांत हिंदुसमाजाचें सामर्थ्य वाढवावयाचें असल्यास ब्राह्मण-अब्राह्मण वादाला मूठमाती दिल्यावांचून गत्यंतर नाहीं. महाराष्ट्रांत मुसलमान-समाज वंश, संख्या, द्रव्य इत्यादि दृष्टींनीं क्षुद्र असतां जो चढेलखोरपणा जेथें तेथें तो करीत आहे, त्याचें बीज महाराष्ट्रांतील ब्राह्मणअब्राह्मण वादांत आहे. ब्राह्मणांविरुद्ध इतर, मराठ्यांविरुद्ध इतर, अस्पृश्यांविरुद्ध इतर आणि इतरांविरुद्ध इतर असले शेंकडों पक्ष आणि विपक्ष, हिंदुसमाजाला ठार करावयाचें असल्यास पाहिजेच आहेत. राज्यकर्ते व मुसलमान असल्या भेदांची डोळ्यांत तेल घालून वाट पाहात आहेत. अर्थात् अशा आणीबाणीच्या वेळीं महाराष्ट्रांतील ब्राह्मणांनीं व अब्राह्मणांनीं हा तंटा मिटवून ' वयं पंचाधिकं शतं ' या भावनेनें आक्रमणशील होणाऱ्या मुसलमानांना नरम करावयास नको काय ?

हा वाद म्हणजे पूर्वीची शिळी कढी होय. त्या शिळ्या कढीला आतां उतास आणण्याचें प्रयोजन नाहीं. हा वाद पूर्वी कोणत्याहि कारणानें चालू झाला असला तरी आतां ते संकुचित विचार कुठेंहि राहिलेले नाहींत. जोतिबा फुल्यांनीं ब्राह्मणेतरांना ब्राह्मणांच्या गुलामगिरींतून काढण्याचा केलेला प्रयत्न, त्यांचें दीन-बंधु पत्र, श्रीमंत सयाजीराव गायकवाडांनीं व श्रीमंत छत्रपति शाहूमहाराजांनीं केलेली वेदोक्ताची चळवळ, क्षत्रियवैश्यांच्या अस्तित्वाबद्दलचा झालेला वाद, वेदोक्त संस्कार करण्याला शास्त्र्यांनीं व शंकराचार्यांनीं केलेला विरोध, पुराणवाक्यें पुढें करून श्रुतिस्मृतिविरुद्ध स्थापन केलेले सिद्धांत हे सर्व पाहिले म्हणजे हिंदु-समाजाच्या त्या वेळच्या संकुचित मनोवृत्तीची कींव येते, इतकी क्रांति आतां झाली आहे. यास्तव दोन्ही पक्षांनीं तीं पुरलेलीं मढीं उकरून काढून भांडत बसण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. आम्ही या पुस्तकाच्या पूर्वार्धांत कलीचीच हकाल-पट्टी करावी असें म्हटलें आहे. कलीच गेला, तर कलियुगांत क्षत्रिय वैश्य नाहींत

हा सिद्धांतहि उडाला. भारतीय युद्धानंतर ख्रिस्तपूर्व १५० च्या सुमारास समुद्रगुप्तानें जेथें अश्वमेध यज्ञ केला, शेंकडों शिलालेखांत रजपुतांनीं आणि शिलाहारांनीं जेथें आपणांस क्षत्रियोत्तम असें स्पष्टपणें म्हटलेलें आहे, कुमारिल भट्टांच्या ग्रंथांत ८ व्या शतकांतहि क्षत्रिय वैश्य होते, असा जेथें उल्लेख आहे, आंध्रभृत्य राष्ट्रकूट, चालुक्य, यादव आणि भोंसले अशा विविध क्षत्रिय घराण्यांनीं जेथें राज्यें केलीं, तेथें त्यांचा अभाव आहे असें म्हणणें म्हणजे सूर्यानें उगवण्याचें व मावळण्याचें सोडून दिलें आहे असें म्हणण्यासारखें हास्यापद आहे. हल्लीं जर ब्राह्मण अस्तित्वांत असेल तर क्षत्रिय वैश्य हेहि आहेतच. ज्या तोलाचे ब्राह्मण असतील त्याच तोलाचे क्षत्रिय वैश्य आहेत. अर्थात् ते वेदाधिकारीहि आहेत, त्यांचे सर्व संस्कार वेदमंत्रपूर्वक झाले पाहिजेत यांत तिळमात्र शंका नाहीं. आम्ही तर वेदांचा अधिकार आणि संस्कारार्हता हीं सर्व हिंदूंस आहेत असें म्हणतों.

ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद ज्या एका भूमिकेवरून पहिल्यानें उत्पन्न झाला ती भूमिका आतां शिल्लकच राहिली नाहीं. कारण जेथें चातुर्वर्ण्यच नाहीं तेथें इतर गोष्टी कशाला ? हिंदुसमाजांतील पोटजाती या आहार, आचार, संस्कार, उत्पात, धंदा आणि क्रांति इत्यादि कृत्रिम व अनीश्वर कारणांनीं झाल्या आहेत म्हणून त्यांच्या एकीकरणाचा उद्योग करावा. या उद्योगाच्या बुडाशीं एक समजूत ध्येय म्हणून असावी. ती ही कीं, सर्व जाती सारख्याच योग्यतेच्या आहेत, जन्मतः कोणी उच्चनीच नाहींत, सर्वांची समाजाच्या धारणपोषणाला सारखीच आवश्यकता आहे.

लोकसत्ताक राज्यपद्धति, नवीन मतदारसंघ आणि जातवार प्रतिनिधि यांच्या योगानें हा वाद पुनः पुनः रंगाला येऊं लागला आहे. 'फोडा आणि झोडा' ही सरकारची कुटिल नीति असल्यामुळें ब्राम्हणेतर समाज ब्राह्मणांविरुद्ध उठवला जात आहे. मुंबई व मद्रास इलाख्यांतच हा वाद आहे. इतरत्र फार थोडा आहे, किंबहुना नाहीं म्हटला तरी चालेल. ब्राह्मणेतर चळवळींत स्वोन्नतीचा भाग आहे यांत संशय नाहीं, पण त्यांत ब्रह्मद्वेषाचे जे विषारी फूत्कार निघतात त्यांचा अतिरेक होत आहे. ब्रह्म व क्षत्र हे समाजाचे मुख्य दोन घटक आहेत, पण ते आज एकमेकांचे विपक्ष बनले आहेत. म्हणून महाराष्ट्रांत कोणत्याहि हिंदुसमाजविषयक कार्याला स्वरूप येईनासें झालें आहे. ब्रह्मक्षत्रांच्या सख्याबद्दल महाभारतांतील शांतिपर्वांत एका ठिकाणीं सुंदर विचार सांगितले आहेत ते असे.

परस्परस्य सुहृदौ विहितौ समचेतसौ ॥
ब्रह्मक्षत्रस्य संमानात्प्रजा सुखमवाप्नुयात् ॥ ४ ॥
विमाननात्तयोरेव प्रजा नश्येयुरेवहि ।
ब्रह्मक्षत्रं हि सर्वेषां वर्णानां मूलमुच्यते ॥ ५ ॥
यदाहि ब्रह्म प्रजहाति क्षत्रं ।
क्षत्रं यदा वा प्रजहाति ब्रह्म ॥ ६ ॥
एतौ हि नित्यसंयुक्तावितरेतरधारणे ।
क्षत्रं वै ब्रह्मणो योनिर्योनिः क्षत्रस्य वै द्विजाः ॥ ११ ॥

महाभारत—शांतिपर्व

ब्राह्मण-अब्राह्मणांमध्यें इतका सुहृत्पणा असतांना, एकमेकांच्या उखाळ्या-पाखाळ्या काढून गालिप्रदान करणें यांत कोणता शूरपणा आहे? ब्राह्मणांनीं अन्याय केला, भटांनीं देश बुडविला, भिक्षुकांनीं नाना तऱ्हेच्या खोट्या गोष्टी सांगून आम्हांला फसविलें, अज्ञानांत ठेवलें, अमूक म्हणूं नका, तमूक म्हणूं नका असें फर्माविलें. यावरून याज्ञवल्क्य, पराशर, आर्यचाणक्य, शंकराचार्य, रामदास, टिळक, चिपळूणकर हे सगळे ब्राह्मण असल्यामुळें देशाचे दुष्मन् होत असे प्रलाप शिवबांच्या महाराष्ट्रांत आज निघत आहेत! याहिपेक्षां टचटाचित आणि लुसलुशीत मालाची वांटणी लोकसंख्येच्या प्रमाणावर व्हावी असें म्हणून स्त्रियांवर हात टाकण्याला उत्तेजन देण्यांत येत आहे, यासारखा दैवदुर्विपाक कोणता? हिंदुसमाजाला एकीकडून ख्रिश्चनसमाजाच्या जळवा लागून त्या रक्त-शोषण करीत आहेत तर दुसऱ्या बाजूनें मुसलमानसमाज चुडया पेटवून सारखी आग लावीत आहे आणि वरून परकीय सत्ता सर्वांना स्वाहा करीत आहे. अशा स्थितींत ब्राह्मणेतरांनीं ब्राह्मणांना नष्ट करण्याची भाषा बोलणें म्हणजे सापाच्या तोंडांत सांपडलेल्या बेडकीनें माशी गिळण्यासारखेंच आहे. बस, झाला हा वाद पुरे झाला. आतां उभय समाजांतील प्रागतिक विचारांच्या लोकांनीं एक होऊन परस्परांच्या न्याय्य मागण्यांना मान्यता देऊन हातांत हात घालून परधर्मीयांशीं झगडण्याकरितां सिद्ध व्हावें, यांतच शहाणपणा आहे.

मुसलमानांच्या रानटीपणामुळें व धार्मिक अडाणी कल्पनांमुळें हिंदु पुढाऱ्यांना ' स्वराज्य ' बाजूला ठेऊन हिंदुत्वरक्षणाची आज काळजी वाटत आहे. हिंदु पुढाऱ्यांना जें नको तें आज त्यांच्या कपाळीं मुसलमानांनीं आणलें आहे; तेंच

जाज्वल्य ब्रह्मद्वेषामुळें ब्राह्मण पुढाऱ्यांचेहि नशिबीं येईल. कारण ब्राह्मणेतर ब्राह्मणांच्या अस्तित्वालाच जर आव्हान करूं लागले तर त्यांनाहि संघटना करून जिवंत राहाण्याची व्यवस्था करावयास पाहिजे. परंतु आज ब्राह्मणसंघटनापेक्षां हिंदुसंघटनेचा प्रश्न किती तरी दृष्टीनें महत्त्वाचा आहे. कारण हिंदुसमाजाला सर्व बाजूंनीं मुसलमान कसे सतावून सोडीत आहेत तें पाहून तरी दुराग्रही ब्राह्मणांनीं व ब्राह्मणेतरांनीं आतां हा वाद मिटवावा असें यांना आमचें आग्रहाचें सांगणें आहे.

कित्येक ब्राह्मणेतर इतके वहावले आहेत कीं, त्यांना आपल्या पक्षांत मुसलमान, ख्रिश्चन, पारशी, युरोपियन हे सर्व पाहिजे आहेत. ब्राह्मणांविरुद्ध जग उठवून एवढें अवडंबर माजवून ब्राह्मणांना नसतें महत्त्व देण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. बृहन्महाराष्ट्रांत फार तर दहा लक्ष ब्राह्मण आहेत व सबंध हिंदुस्थानांत सुमारें १॥ कोट ब्राह्मण भरतील. ब्राह्मणेतरांना जर फार अडचण होत असेल, तर त्यांनीं या ब्राह्मणांना वसाहतीकरितां हिंदुस्थानांतला एक चांगला सुपीक भाग देऊन मोकळें व्हावें आणि स्वतः स्वराज्य मिळवून जगावर साम्राज्य करावें. पण ब्राह्मणेतर ही कल्पना पुढें न ठेवतां ख्रिश्चन, मुसलमान, युरोपियन यांच्या मदतीनें ब्राह्मणद्वेष उत्पन्न करीत आहेत. ब्राह्मणेतरांनीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, मुसलमानांच्या गळ्यांत गळा घालून त्यांचें केव्हांहि हित होणार नाहीं. ब्राह्मण भट नको, दलाल नको, पुढारी नको, शिंपी नको, असें ब्राह्मणेतर म्हणत असतांना मुसलमानांनीं कारवाई करून ब्राह्मणेतरांचे सर्व धंदे हाणून पाडण्यास प्रारंभ केला आहे. ब्राह्मणेतरांतल्या अठरापगड जातींचे सर्व धंदे हरप्रयत्न करून मुसलमान मारीत आहेत याची जाणीव त्यांना नाहीं. शिंपी, लोहार, सुतार, चांभार, कलाल, मोची, कासार, बागवान, माळी, कल्हईवाला, फेरीवाला इत्यादि शेंकडों उद्योगक्षेत्रें मुसलमान बळकावून ब्राह्मणेतरांवर कुरघोडी करीत आहेत. ब्राह्मणेतरांचा पाठपुरावा मोठ्या दिमाखानें जे मुसलमान करीत आहेत त्याच मुसलमानांच्या समाजांत दर आठवड्याला कित्येक ब्राह्मणेतर स्त्रिया, मुलें व पुरुष जुलमानें धर्मांतर करून प्रविष्ट होत आहेत ! पीरजादेपंथ, सोफीपंथ व आगाखानी सांप्रदाय यांचें बंडहि ब्राह्मणेतर समाजांत सर्वत्र वाढत आहे. मुसलमानसमाज तर बाटविण्याच्या उद्योगांत सर्व हिंदु जातींवर सारखा ताव मारीत आहे, पण त्यांतल्यात्यांत त्याला ब्राम्हणच थोडे मिळतात असें शिरगणतीच्या आंकड्यांवरून सिद्ध होतें.

ब्राह्मणब्राह्मणेतरांवर मुसलमान समाज चांगला चरतो आहे ही गोष्टहि उभयतांच्या ध्यानीं येत नाहीं. मुसलमानांची संख्या बेसुमार कां वाढत आहे ? एका बऱ्हाणपुरासारख्या गांवीं साडेनऊ हजारांचे तेरा हजार मुसलमान दहा वर्षांत कसे झाले ? आगरी, कोळी, भंडारी, घांटी लोकांच्या बायांवर दर आठवड्याला कल्याण-भिवंडी भागांत, मुंबईच्या कामाठीपुऱ्यांत व इतरत्र काय काय प्रसंग येत आहेत, याचें निरीक्षण कट्टर सत्यशोधकी इरसाल ब्राह्मणद्वेष्ट्या पुढाऱ्यांनीं व कट्टर कर्मठ ब्राह्मणांनींहि करावें अशी त्यांना आमची हात जोडून प्रार्थना आहे. ब्राह्मणेतर बायांनीं ब्राह्मणांच्या घरीं भांडीं घासण्यापेक्षां त्या मुसलमान झालेल्या बऱ्या इतके उदात्त विचार ज्यांचे असतील त्यांना लांबून नमस्कार करणेंच बरें. ब्राह्मणेतरांवर पठाण लांडगे सावकाररूपानें झडपा घालीत आहेत व त्यांना गिळत आहेत हें सत्यशोधकी पुढाऱ्यांनीं कधीं बघितलें आहे काय ? ब्राह्मण सावकारांचीं पाळेंमुळें खणून काढा, त्यांच्या घराला आग लावा, असा प्रच्छन्न उपदेश ज्या तमाशांत केला जातो तेथें पठाणांविरुद्ध एक अक्षर तरी सांगण्यांत येतें काय ?* कांहीं झालें तरी ब्राह्मणेतरांना ब्राह्मण सावकार हाच जवळचा आहे. मारवाडी सावकार हा ब्राह्मणापेक्षां अधिक दूरचा व सर्वस्व गिळंकृत करणारा पठाण हा सर्वांत लांबचा आहे. ज्या मुसलमानांच्या गळ्यांत आज ब्राह्मणेतर पडत आहेत त्यांना त्यांत काय भूषण वाटत असेल तें ईश्वर जाणे. पण मुसलमान मात्र ब्राह्मणेतरांचा धर्म, अर्थ, प्राण, अब्रू या सर्व दृष्टींनीं नाश करीत आहेच. भटाभिक्षुकांनीं ब्राह्मणेतरांचें थोडेंबहुत नुकसान केलें असेल व आहे. पण तें मुसलमानांच्या मानानें अत्यल्प आहे अशी साक्ष इतिहास देईल. पण आमचे ब्राह्मणेतरबंधु जेव्हां जागे होतील व हें पाहतील तो सुदिन ! ज्या दिवशीं त्यांच्यामध्यें समाजबंधुत्व येईल तो दिवस भाग्याचा समजला पाहिजे.

हिंदुस्थानांत मुसलमानांनीं कांहीं दिवस राज्य केलें असल्यामुळें आपणहि जेते आहोंत असें त्यांना वाटतें. मुसलमानांचा जेतेपणाचा नक्षा शिखांनीं, रजपुतांनीं व महाराष्ट्रियांनीं उतरविला आहे. महाराष्ट्रांत मुसलमान थोडासा हिंदूंना— त्यांतल्यात्यांत वरच्या जातींना— दबतो. ब्राह्मणसदृश जाती सोडल्या तर मुसलमान

---

* पठाणांच्या तावडींतून गोरगरिबांना वांचविण्याचा उद्योग हुतात्मा पटवर्धनासारखे करितात त्याबद्दल ब्राह्मणेतरांनीं आदर दाखवावयास नको काय ?

हिंदूंवर राज्य करीत आहेत असें सिद्ध होतें. महाराष्ट्राबाहेर जिकडे तिकडे हिंदुसमाजावर मुसलमानांचेंच वर्चस्व दिसून येतें, म्हणून डॉ. मुंजे म्हणतात कीं, 'First there is Mahomedan rule and second the British Rule.' या वाक्यांत पुष्कळ गंभीर व खोल अर्थ भरलेला आहे हें लक्षांत घेऊन सर्व हिंदूंनीं हिंदुसमाजाचें बल वाढविलें पाहिजे. ब्राह्मण-ब्राह्मणेतरांतील संपन्न वर्गानें जवळजवळ आपलें संरक्षण करण्याचा मक्ता मुसलमानांनाच दिल्याचें दिसतें. घोडागाडीवर मुसलमान, टांग्यावर मुसलमान, मोटारड्रायव्हर मुसलमान, शेत व दुकान रखवालदार मुसलमान, तगादा करणारा मुसलमान. सारांश जरा जोराचीं, नेटाचीं, भांडाभांडीचीं, क्षात्रतेजाचीं कामें मुसलमानांकडे सोंपवून आमचे ब्राह्मणेतरबंधु अगदींच गयाळ होत चालले आहेत.

मराठ्यांच्या महाराष्ट्रांत म्हणजे शिवभूपतीच्या महाराष्ट्रांत क्षात्रवृत्तीचें काम पठाणांनीं करावें यासारखी लाजिरवाणी गोष्ट कोणती ? मराठ्यांचा क्षात्रसूर्य मावळला काय ? दुकानें, घरें, शेतें, बायका यांच्या संरक्षणाचें काम महाराष्ट्रांत पठाणांनीं करावें ? ब्राह्मण-ब्राह्मणेतरांनो, जरा जागे व्हा, डोळे ताठ उघडून पहा, म्हणजे तुमच्या राष्ट्रांत मुसलमानी पठाणांचें राज्य झालें आहे असें तुम्हांस दिसेल. श्रीशिवछत्रपतींच्या त्रिशतसांवत्सरिकोत्सव जर यंदां रायगडावर करावयाचा असेल तर महाराष्ट्राच्या रक्षणाची हमी घेऊनच तो साजरा केला पाहिजे. महाराष्ट्रांतील मराठ्यांनीं एक महाराष्ट्रसंरक्षकमंडळ स्थापन करावें. तेथें बृहन्महाराष्ट्रांतील उंच, धिप्पाड, पहिलवान, कणखर लोकांची एक नोंद तयार करावी. व ह्या मंडळानें लोकांना पठाणांच्या जागीं हे ' महाराष्ट्रसंरक्षक ' नेमण्याची युक्तता पटवून द्यावी आणि जेथें जेथें पठाण भरले असतील तेथें तेथें ह्या क्षात्रियांचा भरणा करावा.* मुंबईस तर या महाराष्ट्रसंरक्षकमंडळाचें केंद्र पाहिजे. शेठ सावकार, व्यापारी, भाटे यांना या संरक्षकांची अत्यंत आवश्यकता असते. हिंदुसंरक्षक पुरेसे मिळत नाहींत म्हणून त्यांना नाइलाज म्हणून पठाण ठेवावे लागतात. हे पठाण ऐन प्रसंगीं कसा अवसानघात व विश्वासघात करितात हें महशूरच आहे. महाराष्ट्रसंरक्षकवर्गाची हिंदुसंघटणेला फार जरूर आहे हें पाहून आमच्या

* गतवर्षाच्या मुंबईच्या दंग्यापासून तेथें नेपाळी गुरखे नेमण्यांत येत आहेत. ह्याच उपक्रम सर्वत्र व्हावा.

ब्राह्मणेतर बंधूंनीं हें परकीय विष घालविण्याचा उद्योग करावा अशी त्यांना अत्यंत प्रेमाची सूचना आहे.

आमच्या बंधूंनीं ब्राह्मणेतर हें नांव धारण करण्यामध्यें मोठी चूक केली असून ब्राह्मणद्वेष करतां करतां हे सर्व ब्राह्मणेतर हल्लींच्या भिकार ब्राह्मणांसारखेच होऊं लागले आहेत. ब्राह्मणांच्या पळीपंचपात्रीचा, दर्भसमिधांचा व भिक्षुकीचा हेवा त्यांच्यामध्यें उत्पन्न होऊन पुष्कळ ब्राह्मणेतर हल्लीं भटजी होऊं लागले आहेत. कित्येकांना ब्राह्मणांच्या कारकुनीपणाचा हेवा वाटतो. हल्लीं त्या कारकुंड्या वर्गांतहि पुष्कळ ब्राह्मणेतर जाऊं लागले आहेत. पुष्कळ ब्राह्मणेतरांना ब्राह्मणांचा ताक, भात, भाजी हा आहारहि बरा वाटत असून ते त्या बाजूनें अनुकरणामुळें निःसत्त्व होत आहेत. ब्राह्मणेतर बंधूंना हिंदुसंघटनेच्या दृष्टीनें आम्हीं असें सांगतों कीं, कृपा करून बामणी कारकुनीचें, बामणी भिक्षुकीचें व बामणी अन्नाचें अनुकरण करूं नका. ब्राह्मणांचें अनुकरण **बुद्धिमत्ता, स्वच्छता, कर्तृत्व, विद्या, धडाडी एवढ्या क्षेत्रांत पाहिजे तितकें करा.** पण आहार, विहार व व्यवहार या बाबतींत भटाळलेले बिलकूल होऊं नका. ब्राह्मणेतर समाजांत मत्स्याहार व मांसाहार करणाऱ्या कितीतरी अभिजात जाती आहेत. त्यांतील पुष्कळांनीं बामणी आहाराचें सेवन करून कांदा, व लसूण यांवरहि बहिष्कार घालण्यास सुरुवात केली आहे हें अत्यंत घातक आहे. हल्लीं पंचद्राविड ब्राह्मण समाजांत तूप, दूध, दहीं, याविरहित जो **निःसत्त्व आहार आहे तो फक्त विधवेला व संन्याशालाच उपयुक्त आहे.** त्याशिवाय इतर व्यावहारिकांना, विशेषतः ब्राह्मणेतरांना व क्षात्रवृत्तीचें रक्षण करणाऱ्यांना या आहारानें मेषपात्रता आल्याशिवाय राहाणार नाहीं. ब्राह्मणेतरांनीं आपल्या समाजांत पौष्टिक मत्स्याहार आणि मांसाहार धडाडीनें प्रचलित करावा. तसेंच कांहीं जातींत विधवावपनाचें बामणी अनुकरण होत आहे तेंहि बंद करावें. ब्राह्मणांचा द्वेष करतां करतां सर्वत्र बामण होण्याचा दुर्धर प्रसंग येत आहे. म्हणून ही सावधगिरीची सूचना मुद्दाम केली आहे.

हिंदुसंघटणाच्या कार्याकरितां ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचें निर्मूलन होणें अत्यावश्य आहे. या वादांत दोन्ही बाजूंसहि बराचसा गैरसमज आहे. सत्यशोधकांचीं मतें अगदीं दुसऱ्या टोकाचीं असलीं तथापि ब्राह्मणेतरांतील फार थोडा वर्ग त्या मताचा आहे. सत्यशोधकसमाजाचा हल्ला हा रावबाजी ब्राह्मण्यावर

आहे. भटजी ब्राह्मण्य ऊर्फ रावबाजी ब्राह्मण्य हें फार घातक आहे. जितका सत्यशोधक समाज वाईट तितकेंच हें रावबाजी ब्राह्मण्य वाईट आहे. हे दोघेहि हिंदुसमाजाचे शत्रू आहेत. महाराष्ट्रिय ब्राह्मणांत वैदिक व स्मार्त ब्राह्मण्यानें युक्त असे थोडे बहुत ब्राह्मण आहेत. परंतु ब्राह्मणांपैकीं बराचसा ब्राह्मणसमाज रावबाजी ब्राह्मण्यानें पछाडलेला आहे. ब्राह्मण म्हणून श्रेष्ठ, तो कितीहि दुराचारी किंवा भ्रष्ट असो, ' जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट। तरी तिहीं लोकीं श्रेष्ठ ' अशीच त्यांची समजूत ! ज्ञान, विद्या, तप, त्याग व सदाचार हीं लक्षणें हे रावबाजी ब्राह्मण पूर्ण विसरून गेलेले आहेत. यांचें ब्राह्मण्य काय तें सोंवळ्याओंवळ्यांत, विटाळ-चंडाळांत, उच्चपणाच्या ऐटीनें दुसऱ्याशीं तुसडेपणाच्या वागणुकींतच सांठविलेलें आहे. या रावबाजी ब्राम्हणांची सर्वांविषयींची अनुदार वृत्ति हीच सत्यशोधक समाजास जन्म देती झाली. महाराष्ट्रिय ब्राम्हणांना घमेंड अशी कीं, आपण फार शहाणे आहोंत, फार बुद्धिमान् आहोंत व मुत्सद्दी आहोंत. या घमेंडीवरच हा ब्राम्हण समाज सामाजिक सुधारणेला नेहमी विरुद्ध असतो. तसेंच सामाजिक सर्व दोष असतांना आपण पूर्वी स्वराज्य मिळविलें व तें चालाविलें अशीहि या वर्गाला ऐट आहे. परंतु भावी लोकशाहीच्या कालांत जी समाजव्यवस्था शक्य तेवढी आपल्या परंपरेनुरूप असावयास पाहिजे, ती करण्याकडे हा ब्राम्हण फारसें लक्ष देत नाहीं, किंबहुना धंदा, व्यवसाय, वागणूक, आचार, शिक्षण या सर्वांत पूर्वपरं-परेविरुद्ध जरी या ब्राम्हणांचें वर्तन चालू असलें तरी स्वतःच्या उच्चपणाची वृत्ति कांहीं कमी होत नाहीं. या वृत्तिविरुद्धच सत्यशोधकसमाजानें बंड केलें. आज हिंदुसंघटनेच्या दृष्टीनें जीं समतेचीं तत्त्वें हिंदुसमाजांत असावीं असें समंजस हिंदूंना वाटतें त्यांचीच मागणी २५-३० वर्षांपूर्वी सत्यशोधकांनीं केली होती. पूर्वी ज्या मागण्या स्पृश्य ब्राम्हणेतरांनीं केल्या, त्यांचा विचार ब्राम्हणांनीं तेव्हांच उदारतेनें केला असता तर हा वाद इतका विकोपास खास गेला नसता. प्रथम ब्राम्हणेतरांना ब्राम्हणांचें धार्मिक व सामाजिक वर्चस्व असह्य वाटत होतें. व २५।३० वर्षांपूर्वी तें खरेंहि होतें. पण गेल्या १५।२० वर्षांत जी जगांत व इतरत्र विचारक्रांती झाली व आर्थिक प्रश्न जो बिकट होऊन बसला त्यामुळें धार्मिक व सामाजिक बाबतींत ब्राह्मणांचें ब्राह्मणेतरांवर वर्चस्व फारच थोडें राहिलें आहे. पण जी गोष्ट ब्राह्मण आज कृतीनें प्रत्यक्ष करीत असतां बोलण्या-सहि तयार नाहींत ती करण्याला २५ वर्षांपूर्वी कसचे तयार असणार ? अर्थात्

या रावबाजी ब्राह्मणांच्या अनुदारपणामुळें व सत्यशोधकांच्या उच्छृंखलपणामुळें हा वाद उत्पन्न झाला आहे.

ब्राह्मणेतरांच्या मागण्या तरी काय आहेत व त्या ब्राह्मणांनीं कशा पुरवाव्यात याला नेमकें व रोखठोक उत्तर यापूर्वी मिळत नसे. कारण सत्यशोधक हे अद्वातद्वा बोलून देव, वेद, संस्कार व संस्कृती या सर्वांची टरच उडवीत असत ! ते वेदाधिकार पाहिजे असें म्हणतील तर उत्तर, तो सर्व हिंदूंस आहे. वेद हे टाकाऊ आहेत असें म्हणतील तर उत्तर, हिंदूंचा ग्रंथ श्रीकृष्णकृत गीता आहे. तेहतीस कोटी देव हें थोतांड आहे असें म्हणतील तर उत्तर, राहोत ते आमचे देव, पण सूर्य हाच सर्व हिंदूंचा देव आहे. भटाभिक्षुकांची दलाली नको असें म्हणतील तर उत्तर, दलाली किंवा मध्यस्थी ही भाषा शास्त्रांतच नाहीं. अशीं उत्तरें त्यांना देतां येण्याजोगीं आहेत. पण तो पक्ष दुराराध्य असल्यामुळें समंजस ब्राह्मणेतरांच्या मागण्या हल्लीं स्पष्ट होत आहेत. त्या पुढीलप्रमाणें आहेत:-

१. ब्राह्मणांनीं अब्राह्मणांस म्हणजे सर्व हिंदूंस हीन समजूं नये व त्यांचा विटाळ मानूं नये.

२. सर्व हिंदूंच्या घरीं त्यांनीं बोलावल्यास पुरोहित या नात्यानें वेदोक्त कर्म करावें. वेदाचा अधिकार सर्व हिंदूंना असावा.

३. स्वतःचे धर्मविधि व संस्कार प्रत्येक हिंदूला आपल्या इच्छेप्रमाणें कोणत्याहि सच्छील व विद्वान हिंदूकडून करवून घेण्याची परवानगी असावी.

४. देवालयांत ( त्र्यंबकेश्वर, पंढरपूर, कोल्हापूर, श्रीक्षेत्र नरसोबाची वाडी इत्यादि ठिकाणीं सुद्धां सर्व हिंदूंस सारखे अधिकार असावेत, म्हणजे जेथें जेथें ब्राह्मणांस आंत जाण्याची व पूजा-अर्चा करण्याची मुभा आहे, तेथें तेथें प्रत्येक हिंदूला जाण्याची व पूजा करण्याची बंदी नसावी.

५. जन्मसिद्ध श्रेष्ठतेचा जुलूम हा कुणीहि दुसऱ्यावर न करावा. स्वोन्नतिकरितां प्रत्येकानें ती लक्षांत ठेवावी.

याप्रमाणें समंजस ब्राम्हणेतरांच्या या मागण्या आहेत. त्या देशकालज्ञ समंजस ब्राम्हणांना मुळींच अमान्य होण्याजोग्या नाहींत. ब्राम्हणेतरांमध्यें स्पृश्य हिंदूप्रमाणें अस्पृश्य हिंदूहि आहेत असें समजून मागण्यांचा विचार केला पाहिजे. या सर्व मागण्या आमच्या मतें ब्राम्हणांनीं पुरविल्या पाहिजेत. रावबाजी ब्राम्हण्यानें भारलेले ब्राम्हण सर्वांचा विटाळ मानतात व सर्व हिंदूंना सर्व स्वतः-

पेक्षां हीन समजतात. मग ते अब्राम्हण कितीहि चांगले वागोत वा कितीहि शुद्ध असोत. आम्ही असें खात्रीनें सांगू शकतों कीं, अब्राम्हणांमध्यें कितीतरी स्वच्छ, आचारसंपन्न व व्यवस्थित अशीं घराणीं आहेत. पण हा ब्राम्हण सर्वांना कमी समजतो. कुत्र्यामांजरांपेक्षां हा रावबाजी ब्राम्हण अशा अब्राम्हणांचा विटाळ जास्त समजतो. ब्राम्हणेतरांना जर कांहीं बोचत असेल तर तें हेंच. या विटाळामध्यें तुच्छतेची वृत्ति आहे व एक प्रकारचे असें आव्हान आहे कीं ब्राम्हणेतर कितीहि श्रेष्ठ झाले तरी ते कधींहि आमच्या बरोबरीचे होणार नाहींत. पायांची वहाण पायीं बरी, हा आधार! हें आव्हान, हा दर्प, हा वृथा अहंकार, विटाळ मानून जो दर्शविला जातो तो ब्राम्हणेतरांना असह्य होतो. सत्यशोधक मतांत न गेलेल्या अगदीं सनातनी ब्राम्हणेतरांचें सुद्धां हेंच म्हणणें कीं, ब्राम्हण हा आमच्याशीं नेहमी उच्चपणाच्या कुर्‍यानें वागतो, हें आम्हाला असह्य होतें. इंग्रजांची उच्च-पणाची वागणूक व आढ्यतेचा दिमाख ब्राह्मणांना खपतो काय ? इंग्रज जसा ब्राम्हणानां खपत नाहीं, तसा ब्राम्हणांचा पोकळ उच्चपणा हा ब्राम्हणेतरांना आज खपत नाहीं, यांत आश्चर्य तें कसलें ! ब्राम्हण स्त्रिया तर अब्राम्हण स्त्रियांचा विटाळ मानून वेळोवेळीं त्यांचा तिरस्कार करून स्वतःच्या सोंवळ्याचें प्रदर्शन करितात. ही वागणूक यापुढें शिकलेल्या व समंजस अब्राम्हण स्त्रियांना सहन होईल काय ? बरें, तो विटाळ तरी असला चमत्कारिक आहे कीं **गजानन मिलचें पातळ** म्हटलें कीं तो जातो व लुगडें म्हटलें कीं तो येतो ! हें विटाळचंडा-ळाचें खूळ ब्राम्हणांत फारच आहे. या भटजी-ब्राम्हणांत सोवळें-ओंवळें, व विटाळ यांशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें म्हटलें तरी हरकत नाहीं. हिंदुसमाजाला समर्थ करण्याकरितां अस्पृश्यतेचें उच्चाटण जर करावयास पाहिजे तर स्पृश्यांतील हे खुळे विटाळ व तन्मूलक उच्चतेची कल्पना यापुढें ठेवणें चुकीचें नाहीं काय ? स्वच्छता, शुचिर्भूतपणा व पावित्र्य यांबद्दल प्रत्येकानें आपल्या समजुतीप्रमाणें खुशाल दक्ष असावें. परंतु त्याचा उपसर्ग दुसर्‍याला न व्हावा. आमच्या समजुती-प्रमाणें हिंदुसमाजांत एकंदरींत विटाळाचा अतिरेक झालेला आहे. त्यांत तारतम्य आलेंच पाहिजे. तें येण्याच्या दृष्टीनें ब्राम्हणेतरांची ही मागणी अवश्य मान्य केली पाहिजे.

ब्राम्हणेतरांची दुसरी मागणी वेदाधिकाराबद्दलची आहे. या मागणींत ब्राम्हणांना वाईट कां वाटावें ? एक ब्राम्हणेतर लिहितात " ख्रिचन व मुसलमान

यांकडे बायबल व कुराण मागितलें तर त्याला आनंद होतो, पण ब्राह्मणाकडे वेदाधिकार मागितला तर त्याला वाईट वाटतें हें आश्चर्य नव्हे काय ! खरोखरीच आश्चर्य ! किंवा समजुतींत महदंतर ! एकाला वाटतें वेद सर्वांना येऊं लागले तर माझी किंमत कमी होईल व माझ्या पोटावर पाय येईल, तर दुसऱ्याला वाटतें कीं बायबल व कुराण यांचा जेवढा प्रचार होईल तेवढें माझें महत्त्व वाढेल. कुराण व बायबल यांचे पाठ, यांचें शिक्षण, यांचा प्रचार चोहोंकडे करण्याचा त्यांचा अट्टाहास व यत्न ! पण हिंदुधर्माचा मिशनरी जो ब्राम्हण त्याची वृत्ति मात्र अगदीं उलट हा दैवदुर्विपाक नव्हे काय ? प्राचीन शास्त्रांत वेदाधिकारनिषेध आहे व असेल, पण उपनयनपूर्वक अपूर्वोत्पत्तीकरितां १२ वर्षे ब्रम्हचर्य पाळून गुरुगृहवास पत्करून वेदाध्ययन करण्याला कोण तयार आहे ? जेथें ब्राम्हण तयार नाहीं तेथें इतर कशाला येतो? व जेथें प्राप्तीच नाहीं तेथें निषेध कशाला ? शाळांमधून वैदिक वाङ्मय शिकविलें, ठिकठिकाणीं त्याजवर चर्चा होऊं लागली तर राष्ट्र दुर्गतीला जाईल काय ? शाळांतील मुलांमुलींना बायबल शिकण्याची सक्ति होतें, तेथें वेदांची झाली तर तें अरिष्ट होईल काय ? जर्मन पंडितांना वेदपरिचयामुळें धन्यता वाटते, इंग्लिश व अमेरिकन संस्कृत पंडित त्या वाङ्मयाकडे आदरानें पाहतात, जगांतील अत्यंत प्राचीन वाङ्मय, उत्कृष्ट वाङ्मय आणि आश्चर्यकारक वाङ्मय या नात्यानें त्यावर सर्व जगाची सत्ता असतांना हिंदूंनाच त्याचा अधिकार नाहीं असें ब्राम्हणांनीं म्हणणें हें भटजी–ब्राम्हणाला शोभेस आहे. अकोला येथें ब्राम्हण परिषदेनें सर्वांना वेदाधिकार आहे हें घोषित केलें हें फार चांगलें केलें पण कांहीं बेअकल्यांना तो ठराव म्हणजे चातुर्वर्ण्याचा दसपिंड करणारा ठराव वाटतो हें किती आश्चर्य ?

समंजस ब्राह्मणेतरांची तिसरी मागणी वेदोक्त संस्कार व धर्मविधि यांसंबंधाची आहे. तीहि त्यांच्या इच्छेप्रमाणें ब्राह्मणांनीं पूर्ण केली पाहिजे. पौरोहित्य हें अब्राह्मणाला शास्त्रांत सांगितलेलें नाहीं हें खरें, पण आज ब्राह्मण तरी अगदीं सत्पात्र व पौरोहित्य करून घेण्याला योग्य असे आहेत कोठें ? धंद्याच्या दृष्टीनें ब्राह्मण पाहिजे ते धंदे करीत आहेत. भिक्षुकांचीं मुलें सुद्धां मोटार ड्रायव्हर, दारूच्या गुत्यांतील कारकून, नाटकांतील नट इत्यादि धंदे करीत आहेत. प्रत्येक खेडयांत बहुतेक जोसपण व कुलकरण हीं दोन्हीं कामें एकच ब्राह्मण करीत असतो. कुलकर्णी म्हणजे गांवांतील महाकारस्थानी मनुष्य, त्यानें सर्व कारस्थानें करून पुन्हा धर्मगुरु म्हणून पाय धुवून घ्यावे हें बरें काय ? व

अशांची पाद्यपूजा समंजस ब्राम्हणेतर यापुढें करतील काय ? आपद्धर्मांच्या सबबी-वर इतर वाटेल ते धंदे करावयास लागून शिवाय इतर वर्णांच्या धर्मविधींमध्यें पुरोहितत्व करण्याचा हक्क ब्राह्मण सांगूं लागेल, व पुरोहिताला न बोलाविलें तरी दक्षणा दे असा वृत्तीचा संबंध जोडूं पाहील, तर ती दक्षणेची मागणी निंद्य ठरेल. धर्मकृत्य चालविण्यास बोलावलें तर जावें पण हक्क सांगूं नये आणि अनाहूत जाऊं नये. शिवाय अत्यंत भ्रष्ट ब्राह्मणांच्या हातून तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं वाड-वडिलांचीं श्राद्धें झालीं तर आपले पितर स्वर्गाला जातील असें हल्लींच्या ब्राह्म-णांना तरी वाटतें काय ? पंढरपूरचे बडवे, प्रयागचे प्रयागवळ, रामेश्वरचे पंडे, आणि असेच वह्या घेऊन धांवपळ करणारे जे क्षेत्रस्थ ब्राह्मण असतात, त्यांची ती चर्या पाहून खास सुशिक्षित समंजस ब्राह्मणांना काय वाटतें ? प्रस्तुत लेख-काला तर यात्रा करितांना कित्येक ठिकाणीं असें वाटलें कीं असल्या पशु–तुल्य ‡ ब्राह्मणांकडून तीर्थविधि करून घेण्यापेक्षां तो न केलेला बरा ! हीच वृत्ति जर समंजस ब्राह्मणेतरांमध्यें ग्रामजोश्याबद्दल उत्पन्न झाली तर त्यांत काय दोष ? रा. गुंजाळ, रा. आवटे, नलावडे, भुईंजचे तात्यासाहेब जाधव, नागपूरचे राजे भोसले, यांसारख्या सनातनी क्षत्रियांनासुद्धां पाहिजे तसल्या ब्राह्मणांकडून तो केवळ जोशी व वतनदार आहे म्हणून धार्मिक विधि करून घ्यावे असें मुळींच वाटत नाहीं. तेव्हां मिळाल्यास चांगला ब्राह्मण व न मिळाल्यास इच्छेप्रमाणें ब्राह्मण किंवा स्वज्ञातीचा कोणीहि हिंदु पुरोहित याकडून धर्मकर्में करून घेण्यास पूर्ण स्वातंत्र्य असावें, अशी त्यांची समंजस मागणी आहे. आमच्या मतें ही मागणी योग्य व न्याय्य आहे म्हणून ती पुरी केली पाहिजे.

समंजस ब्राह्मणेतरांची चौथी मागणी देवालयप्रवेशाची आहे. ब्राह्मण जेथपर्यंत आंत जातो तेथपर्यंत त्यांनाहि आंत जातां यावें व पूजा करतां यावी. जीं देवालयें खाजगी आहेत तेथें व्यक्तीची आवडनिवड ही असणारच. कांहीं देवालयें केवळ ब्राह्मणांपुरतीं, तर कांहीं क्षत्रिय, वैश्य, स्मार्त यांकरितांच असतील. कांहीं विशिष्ट पंथाचीं असतील तेथें सर्वांनीं आंत जावें असें म्हणतां येणार नाहीं. पण नियम असा असावा कीं, हिंदूंच्या प्रत्येक देवळांत सर्व हिंदूंनीं लांबून दर्शन

‡ अत्रिस्मृतिमध्यें १० प्रकारचे ब्राह्मण सांगितले आहेत. त्यांत एक पशू-ब्राम्हण आहे. त्याचें लक्षण नुसत्या जानव्याचा गर्व वाहणारा असें आहे.

घ्यावें. गाभाऱ्याबाहेरून सर्वांनीं दर्शन घ्यावें. आंत पुजाऱ्याशिवाय कोणीहि जाऊं नये. तो पुजारीहि मोठा सत्पात्र व चांगला असावा. नाहीं तर चोर व लुटारू हे एक तऱ्हेनें देवाचें विडंबन करतात, तर पुजारी देवावर देवघेवीचा धंदा करून त्याची विटंबना करतात. असो, तात्पर्य इतकेंच कीं ब्राह्मणब्राह्मणेतर वाद मिटावा म्हणून ब्राह्मणांनीं आपल्या मालकीचीं देवालयें लांबून देवदर्शनार्थ सर्वांना मोकळीं करावीं, इतरांना त्या कामीं प्रोत्साहन द्यावें, आणि दर्शनाकरितां जाणाऱ्या सर्व ब्राह्मणांनीं सर्वांबरोबर लांबून दर्शन घ्यावें.

आज प्रत्येक देवळांत महाराष्ट्रांत ब्राह्मण आंत जातो व स्पर्श करून पूजा अर्चा करतो, या हक्काचा त्याग त्यानें केला पाहिजे. ब्राह्मणांनीं आजवर पुष्कळ त्याग केला आहे. त्याग हेंच त्यांचें वैशिष्ट्य आहे. म्हणून त्यांनीं आजहि हा वाद मिटविण्याकरितां व हिंदुत्वरक्षणाकरितां त्याग केला पाहिजे. देवळें, क्षेत्रें, तीर्थें, हीं सर्वांना दर्शन व स्नान यांकरितां मोकळीं करून दिलीं पाहिजेत. तेथें प्रतारणा उपयोगी नाहीं. मात्र त्या स्थानाच्या सामुदायिक व सार्वजनिक मालकी वहिवाटी काय आहेत हें पाहूनच तीं स्पृश्यांच्या व अस्पृश्यांच्या स्वाधीन स्नानदर्शनाकरितां केलीं पाहिजेत. आमच्या पुष्कळ ब्राह्मणबंधूंना ही भाषासुद्धां सहन होणार नाहीं, हें आम्ही जाणून आहों; परंतु त्यांनीं हें ध्यानांत धरावें कीं सूर्य, अग्नि, इंद्र, वरुण याच आपल्या खऱ्या वैदिक देवता नव्हेत काय ? " ते मंत्रा ब्राह्मणाधीना ब्राह्मणो मम दैवतम् " हें वाक्य ब्राह्मणांनीं आठवावें. ब्राह्मणांना आपले देव गेले असें जर वाटूं लागलें तर त्यांनीं आपल्या अग्निहोत्र संस्थेचें पुनरुज्जीवन करावें. सूर्य व अग्नि याच त्यांच्या खऱ्याखुऱ्या वैदिक उपास्यदेवता आहेत. म्हणून इतर देव, क्षेत्रें व तीर्थें हीं ब्राह्मणेतरांना दर्शन, स्पर्शन, पूजन व स्नान यांकरितां आतां मोकळीं ठेवावीं म्हणजे त्यांचें काम झालें.

ब्राह्मणेतरांची पांचवी महत्त्वाची मागणी, जन्मतः श्रेष्ठ कनिष्ठ ही भावना ब्राह्मणांनीं ठेवूं नये व श्रेष्ठतेचा जुलूम दुसऱ्यांवर करूं नये अशा अर्थाची आहे. जन्मतः आपण उच्च आहोंत, ही कल्पना पूर्वपरंपरेच्या स्मरणाच्या दृष्टीनें इष्ट आहे. पण ती स्वोन्नतीकरितां आहे, दुसऱ्याला दाखविण्याकरितां नाहीं. उच्च व नीच हे शब्दच मुळीं सापेक्ष आहेत. दुसऱ्यानें मान दिला तरच उच्चता प्राप्त होते. कोणतेंहि श्रेष्ठत्व हें दुसऱ्याच्या मानण्यावर अवलंबून आहे. श्रेष्ठत्वाच्या अहंकाराला दुसऱ्याच्या भावनेच्या उपमर्दानें अधिक वाईट स्वरूप येतें. शिष्यानें

मान दिला तरच गुरुचें गुरुत्व, तरुणांनीं मान दिला तरच वडिलांचें वडिलपण, असा व्यवहार आहे, तो लक्षांत घेऊन ब्राह्मणांनीं उच्चता मनांत ठेवावी, घरांत ठेवावी, ती दुसऱ्याला दाखवूं नये व दुसऱ्यावर लादूं नये, असें समंजस ब्राह्मणेतरांचें म्हणणें असल्यास तें अयोग्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

समंजस ब्राह्मणेतरांच्या या मागण्या समंजस ब्राह्मणांनीं मान्य करण्यास धर्मदृष्ट्या मुळींच अडचण भासत नाहीं. कारण या सर्व मागण्या बरोबरीची वृत्ति ठेवा, एवढेंच ध्वनित करीत आहेत. या मागण्यांमध्यें जाति मोडण्याची भाषा नाहीं. सहभोजन व सहपान यांचाहि संबंध नाहीं.

ब्राह्मणेतरांच्या या मागण्यांना मान्यता म्हणूनच चार वर्षांपूर्वीं वाई येथील ब्राह्मण-परिषदेपुढें पुण्याचे रा. ल. ब. भोपटकर यांनीं एक चांगला ठराव आणला होता. ब्राह्मणेतरांच्या मागण्या, भोपटकरांचा ठराव आणि त्यांच्या जोडीला अकोला येथें बृहन्महाराष्ट्र ब्राह्मण परिषदेनें पास केलेले ठराव ठेवले म्हणजे समंजस ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांच्या मागण्या आचारानें व उच्चारानें मान्य केल्या आहेत असें उघड उघड दिसतें. ब्राह्मण समाजाची मनोवृत्ति आतां पालटली आहे असें म्हणण्यापेक्षां समंजस ब्राम्हण ब्राह्मणेतर हे विचारानें आतां एक झाले आहेत असें म्हणतां येतें.

रा. भोपटकरांनीं जो पांच कलमी ठराव पुढें आणला होता त्याचेंच संक्षिप्त स्वरूप म्हणजे अकोला परिषदेचा समतेचा ठराव होय. हा ठराव सूत्रवाक्य समजल्यास ब्राह्मणेतरांच्या मागण्या व भोपटकरांचा ठराव म्हणजे या सूत्रांवरील परिष्कार किंवा स्पष्टीकरण होय. अकोला सभेचा समानतेचा ठराव व दुसरे एक दोन ठराव येथें जसेच्या तसे देतोंः—

समानताः—**हिंदूंतील कोणतीहि** जाती **सामाजिक** अगर **धार्मिक दृष्टीनें जन्मानें श्रेष्ठ कनिष्ठ नाहीं**, असें या परिषदेचें मत आहे.

वेदाधिकारः—आर्यांचे वेद हे अत्यंत पवित्र आहेत, त्यांच्या अभ्यासानें अपवित्रहि पवित्र व धन्य होतील, अशी त्यांची योग्यता आहे. वेदांस अपवित्रता येणें कधींहि शक्य नाहीं. **म्हणून वेदांच्या अभ्यासाचा मनुष्यमात्रास** अधिकार आहे, असें या परिषदेचें मत आहे.

पौरोहित्यः—ब्राह्मणेतरांचीं धर्मकृत्यें करण्यासाठीं त्यांनीं ब्राह्मणास बोलाविल्यास मात्र त्यांचे घरीं जाऊन त्यांचीं धर्मकृत्यें **यथासांग** पार पाडावीं.

जाहीर परिषदेपुढें न आलेला पण विचार-सभेमध्यें पास झालेला अस्पृश्यता निवारण्याचा ठराव 'आजपर्यंत अस्पृश्य मानण्यांत येणाऱ्या जातींना यापुढें कोणत्याहि बाबतींत अस्पृश्य मानण्यांत येऊं नये' असा आहे. हे सर्व ब्राह्मण परिषदेचे ठराव म्हणजे ब्राह्मणेतरांच्या पदरांत त्यांच्या मागण्यांचें घातलेले पुरें पुरें माप होय. हें माप घातल्यामुळें ब्राह्मणेतरांची वृत्ति खास बदललेली असून ना. भास्करराव जाधवरावसारखे ब्राह्मणेतरांचे पुढारी धार्मिक सामाजिक बाबी आतां गौण आहेत, व त्या बाबतींत ब्राह्मणांच्या धोरणाविषयीं कांहीं कुरकूर राहिलेली नाहीं असा कबुली जबाब देत आहेत. अकोला ब्राह्मणपरिषदेनें दूरदर्शीपणानें चांगले ठराव करून हा वाद गाडून टाकण्याचा स्तुत्य उपक्रम केलेला आहे. या ठरावाप्रमाणें ब्राह्मणांमध्यें ती वृत्ति उत्पन्न करण्याचें कार्य व्हावयास पाहिजे. ठरावाप्रमाणें कृति ब्राह्मणांकडून घडली कीं, समंजस ब्राह्मणेतर ब्राह्मणांशीं सहकार्य करून हिंदुसंघटनेच्या क्षेत्रांत खांद्यास खांदा लावून काम करतील. ब्राह्मणांतील कांहीं गणंग हे जसे भटजी-ब्राह्मण्याचा पुरस्कार करून स्वतःचें स्तोम वाढवतील, त्याचप्रमाणें सत्यशोधकी ब्राह्मणेतरहि सांप्रतच्या राजकारणामध्यें केवळ नोकरीचा स्वार्थ साधावा म्हणून हा वाद वाढविण्याचा यत्न करतील. पण जगांत लौकरच या उभयतांचे स्वार्थी कावे उघडकीस आले म्हणजे या दोन्हीहि पक्षांचे लोक समाजामध्यें काडीकिंमतीचे ठरतील. महाराष्ट्रांत समंजस ब्राह्मणांनीं व ब्राह्मणेतरांनीं आतां पुढें येऊन हिंदुसमाजाच्या पुनर्घटनेचें अर्थात् संघटनेचें कार्य जोरानें चालविलें पाहिजे. ना. भास्करराव जाधवांना आज या चळवळीचें महत्त्व कळत नाहीं असें नाहीं. मुसलमानांचें आक्रमण त्यांनाहि असह्य होत आहे, पण करतात काय? माणसें थोडीं, तीं स्वार्थी, सर्वांचें लक्ष नोकऱ्यांकडे, त्यामुळें त्यांचा नाइलाज आहे. श्री. तात्यासाहेब जाधव, बॅ. जयकर, घनश्याम दास बिर्ला, संग्रामकार नलावडे व रा. गुंजाळ अशांसारखी मंडळी पुढें यऊन काम करूं लागली म्हणजे स्वार्थी ब्राह्मणेतर वर्ग आपोआपच मागें पडेल.

हिंदुसंघटनेचा पुरस्कार ब्राह्मणांनीं प्रामाणिकपणानें करून घरोघरीं हिंदु सभेचा संदेश पोंचविला पाहिजे. ब्राह्मणांतील पुष्कळ लोकांकडून हिंदुसंघटनेचीं तत्त्वें अंमलांत येऊं लागलीं म्हणजे जुन्या मताचा ब्राह्मणेतर वर्गहि त्यांचें अनुकरण करील. ब्राह्मणेतरांपैकीं लक्षावधि लोक हिंदुसंघटनेला अनुकूल आहेत. सत्यशोधकी मताचे लोक एकंदरींत फारच थोडे आहेत. त्यांना व्यापक दृष्टी

नसल्यामुळें ते एकांगी विचार करतात. परंतु त्यांना हिंदु संघटनेचें महत्त्व पटविलें व त्यावांचून हिंदुसमाज जगणें अशक्य आहे अशी खात्री करून दिली म्हणजे सत्यशोधकी सुद्धां हिंदुसंघटनावादी होतील. मुसलमानांचें चौफेर आक्रमण त्यांनाहि असह्य वाटतें. आणि धंद्यांवर अर्थात् पोटावर झालेलें आक्रमण त्यांच्या डोळ्यांत भरतें. विश्वासानें विश्वास वाढतो. ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांनीं परस्पर विश्वास उत्पन्न होण्याजोगें हें कार्य हातीं घेतल्यास वाद मिटून महाराष्ट्रिय हिंदुसमाज समर्थ होईल.

समंजस ब्राम्हणेतरांच्या मागण्या अकोला येथें ब्राम्हण परिषदेनें ठराव रूपानें ज्या मान्य केल्या त्यांव्यतिरिक्त जर ब्राह्मणेतर ब्राह्मणांना असें म्हणतील कीं, तुम्ही आमच्या घरीं जेवलेंच पाहिजे, तुमच्या मुली आम्हांस दिल्याच पाहिजेत आणि आर्थिक क्षेत्रहि आमच्याकरितां मोकळीं ठेविलींच पाहिजेत, तर हें म्हणणें आततायीपणाचें होणार आहे. आर्थिक क्षेत्र कोणीं कोणाकरितां मोकळें ठेवीत नाहीं. ज्याचें कर्तृत्व अधिक तो आर्थिक क्षेत्रांत पुढें येतो. अर्थात् ब्राम्हणेतरांनीं ब्राह्मणांना तें क्षेत्र मोकळें ठेवा असें म्हणणें चुकीचें होईल. पुष्कळ ठिकाणीं मुसलमान व्यापारी हिंदु व्यापाऱ्यांना मागें टाकीत असून मोठमोठ्या अधिकाराच्या जागाहि ते आक्रमूं लागले आहेत. ब्राह्मणेतरांनीं ती पात्रता आणली पाहिजे, तिकडे लक्ष दिलें पाहिजे आणि आर्थिक क्षेत्रें बळकाविलीं पाहिजेत.

भोजनव्यवहार हा केव्हांहि हट्टानें होत नसून प्रेमानें होतो. लग्नाचा व्यवहार तर त्यापुढचा आहे. अन्न व लग्नव्यवहार परस्परांत होण्याला संस्कृतिभेद, कल्पनाभेद, आचारभेद, संस्कारभेद आणि वंशभेद हीं नष्ट व्हावीं लागतात. म्हणून, अन्न, लग्न व अर्थ हीं क्षेत्रें सोडून इतर सर्व क्षेत्रांत जे सामाजिक, धार्मिक हक्क असतील ते त्यांनीं घ्यावेत व ब्राह्मणांनीं त्यांना द्यावेत. ब्राह्मण बंधूंनाहि आम्ही असें सांगतों कीं, देशकालपरिस्थिति पाहून जुने दुराग्रह सोडावे, ब्राह्मणेतर म्हणतील ते **सामाजिक व धार्मिक हक्क त्यांना देण्याची ही वेळ आहे.** हा क्रांतीचा काळ असल्यामुळें या वेळेला माघार घेतल्यास हानी होण्याचा संभव आहे. कित्येक दिवस ब्राह्मणांच्या हाडींमाशीं खिळलेले संस्कार मोडणें कठीण आहे हें आम्ही जाणून आहोंत. तथापि जन्मत: उच्चनीचपणाची कल्पना व भिक्षुकहक्काची कल्पना सोडून देऊन समतेच्या पातळींत ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांना आणिलें पाहिजे. हा लोकशाहीचा

काल म्हणजे, समतेचा काल म्हणजे, कृत्रिम उच्चनीचपणा घालविण्याचा काल आहे. धड्डाक्यानें पुढें जातां जातां धांवणाऱ्याला जसा आपला तोल सांभाळतां येत नाहीं तसें या क्रांतीच्या काळांत पुष्कळसें होण्याचा संभव आहे. परंतु त्याची फारशी पर्वा करूं नये. वावटळ ओसरल्यावर जशा सर्व वस्तु स्वच्छ दिसूं लागतात तशीच क्रांतीची लाट ओसरल्यावर समतोल होण्याला वेळहि मिळेल. ब्राह्मणांनीं फक्त अन्नव्यवहार, लग्नव्यवहार व पौरोहित्य फक्त पंच द्राविड गौड ब्राह्मण पोटजातींशीं करूं आणि ज्या क्षेत्रांत जाऊन अर्थसंपादन करतां येईल तें क्षेत्र बळकावूं एवढाच आग्रह धरावा; इतर सर्व दुराग्रह सोडून त्यांनीं ब्राह्मणेतरांच्या बरोबरीचें व्हावें.

अकोल्यास समंजस ब्राह्मणांनीं जरी मागण्या मान्य केल्या, तथापि सर्व ब्राह्मण कुठें तयार आहेत असें कोणी म्हणतील, त्यास उत्तर हेंच कीं, जे तयार आहेत त्यांच्याकडून काम करून घ्या म्हणजे झालें. फार पुढें जाऊन ‘ जात नष्ट करा. ’ सर्व जातींचें रक्त सर्व जातींत खेळलें पाहिजे असें म्हणणारे जे सत्यशोधक आहेत त्यांना आम्ही शेवटीं इतकेंच सांगतों कीं, हिंदुस्थानसारख्या मोठ्या राष्ट्रांत भिन्नभिन्न मानववंशांच्या समुदायांत, ही गोष्ट आणखी कांहीं शतकें तरी अशक्य आहे. हिंदुसमाजांतील अनेक थरांत जें स्वाभाविक अंतर आहे तें अनेक कारणांनीं आज हळूंहळूं तुटत आहे. अंतर तुटण्याला व तोडण्याला परिस्थितीहि अनुकूल असल्यामुळें पोटजातींच्या एकीकरणाची भाषा व कार्य यांचा प्रचार केला पाहिजे. हिंदुसंघटनेच्या दृष्टीनें पोटजातींच्या एकीकरणाला महत्त्व येत असून विरोधहि जात चालला आहे. हें कार्य पन्नास वर्षें पुरेल इतकें आहे. पुढची भाषा व भविष्य बोलण्यांत आज सामर्थ्यहानि होणार आहे. बाह्य प्रेरकशक्तीनें हिंदु-समाज ढवळला जात आहे. अर्थात् अर्ध शतकांत जगांत कोणती उलथापालथ होईल व काय प्रश्न उपस्थित होतील याचा कांहीं पत्ता लागत नाहीं. आज हिंदु-संघटनेच्या दृष्टीनें पोटजातींच्या एकीकरणापर्यंत आपण आलों आहोंत. महा-राष्ट्रीय सत्यशोधकांनीं हिंदुसमाजाचें बल वाढविण्याकरितां व्यवहार्य भाषा बोलावी व व्यवहार्य कार्यक्रम लोकांपुढें ठेवावा, नाहींतर कार्यहानि होऊन तेच खड्यासारखे बाहेर भिरकावले जातील.

**भटाभिक्षुकांची दलालीः**—भटाभिक्षुकांनीं यापुढें आमची दलाली करण्यास येऊं नये, देव व मनुष्य यांच्यामध्यें मध्यस्थांची जरुरी नाहीं. युरोपांत

जसें पाद्र्यांचें बंड मोडलें तसें हें बंड आम्हांला मोडलें पाहिजे. अशा प्रकारचे उद्गार ब्राह्मणेतरांनीं वेळोवेळीं काढिले आहेत. हे उद्‌गार किती अशास्त्रीय व विसंगत आहेत हें आतां पाहूं.

पाश्चात्य देशांप्रमाणें आपल्या इकडे धार्मिक संशोधनाची चळवळ झाली आहे असें सिद्ध करणारे न्यायमूर्ती रावसाहेब रानडे यांनीं भटभिक्षुक हे मध्यस्थ किंवा दलाल होते अशी कल्पना प्रथम आपल्या ग्रंथांत मांडिली. ज्ञानेश्वरापासून शिवाजीमहाराजांपर्यंतच्या सहाशें वर्षांच्या काळांत कर्मठपणाचें व भटाभिक्षुकांचें बंड मोडण्याचें काम साधुसंतांनीं केलें आणि देव व मनुष्य यांमध्यें मध्यस्थाची जरुर नाहीं असा सिद्धांत संतांनीं प्रस्थापित केला असें रावसाहेब रानडे आपल्या ग्रंथांत लिहितात.

" युरोपांतील या पाद्र्यांस व त्यांच्या लोकांस जो अधिकार प्राप्त झाला होता तो केवळ प्राचीन कालापासून चालत आला होता. कालांतरानें आपण चाकर आहोंत हें विसरून धनी आपण, राज्यकर्ते आपण, ऐहिक पारमार्थिक सर्व शक्ति आपल्या ठायीं आहेत आणि ईश्वर व मनुष्य यांच्यामधील मध्यस्थहि आपणच आहोंत असें ते म्हणूं लागले. या मध्यस्थपणास त्यांनीं अनेक धर्मविधींचें व संस्कारांचें कुंपण घातलें. 'पीटर्स मेन्स' नांवाचा कर या अधिकारीवर्गानें सुरू केला. त्या अधिकारीवर्गाविरुद्ध ल्यूथर जेव्हां भांडूं लागला त्या वेळेस या दुष्ट आचारांचा कळस झाला होता. **पश्चिम हिंदुस्थानांतील धर्मसुधारणेचें साम्य याच गोष्टींत दिसून येतें.** " (मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, पा. ९०।९१). या उताऱ्याचें अधिक स्पष्टीकरण करण्याची जरुरी नाहीं. तिकडील पाद्र्यांप्रमाणें इकडील भटभिक्षुक स्वतःला देव व मनुष्य यांतील दलाल असें समजत होते हें रावसाहेबांचें म्हणणें अनैतिहासिक व अशास्त्रीय आहे. पाद्र्यांना मध्यस्थ समजावयाला कोणतीं कारणें उत्पन्न झालीं असतील तीं असोत. परंतु आमच्या इकडील भटाभिक्षुकांना स्वतः दलाल किंवा मध्यस्थ समजण्यासारखी परिस्थिति ज्ञानेश्वरांच्या वेळीं खास नव्हती. इ. स. च्या आठव्या शतकांत श्रीमत् शंकराचार्यांनीं समाजांतील विचार व भावना यांचें शुद्धीकरण नुकतेंच केलेलें होतें. शंकराचार्यांपासून ज्ञानेश्वरांपर्यंतच्या चारशें वर्षांच्या अवधींत कर्मकांडाचें मोठें प्रस्थ माजलें होतें असें म्हणावें तर इतिहासांत तसें आढळत नाहीं. यज्ञसंस्थेची मोठी भरभराट होती असें म्हणावें तर शंकराचार्यांच्या पूर्वीच ती संस्था " कलौ पंच विव-

जयेत्" या सदरांत निःसंशय आली होती. असें असतांना स्वतःला देव व मनुष्य यांतील मध्यस्थ समजण्याइतके दुर्बल विचार भिक्षुकांमध्यें कोठून व कसे उत्पन्न झाले हें धार्मिक इतिहासावरून कळत नाहीं.

शुद्ध शास्त्रदृष्ट्या विचार केल्यास मध्यस्थाची कल्पना आपल्या संस्कृतींत व शास्त्रांत कोठेंहि आढळत नाहीं. ऋत्विग्, होता, पुरोहित–ज्यांना पुढें भटभिक्षुक म्हणण्यांत येऊं लागलें, असे हे सर्व यजमानाच्या धर्मकार्यांत मदत करणारे नोकर आहेत असा शास्त्रसिद्धांत आहे. कोणतेंहि धर्मकर्म ज्याचें त्यानें यथासांग करावें. परंतु यजमानाला सर्वच गोष्टी साध्य असतात असें नाहीं. म्हणून त्यानें तज्ज्ञ मदतीला घ्यावे असें शास्त्र आहे. पूर्वी धर्मकर्मांत अशा प्रकारची मदत करणारा असा एक धंदेवाईक वर्ग उत्पन्न झाला व तो आजहि आहे यांत शंका नाहीं. यजमान अशिक्षित, अविद्वान् व त्याच्या धर्मकर्मांत मदत करणारे पुरोहित विद्वान् अशी स्थिती पुढें पुढें उत्पन्न होऊं लागली. त्यामुळें उभयतांच्या भावनेंत फरक पडले. पूर्वमीमांसेमध्यें व उत्तरमीमांसेमध्यें धर्मकर्माचें फल यजमानालाच कां मिळतें, असा एक प्रश्न उपस्थित केला असून त्याचें उत्तर यजमानालाच धर्मकर्माचें फल मिळतें असें दिलें आहे. कारण पुरोहित हे बोलून चालून दक्षिणा देऊन विकत घेतलेले असतात ! शारीरभाष्य ( अ. ३ पा. ४ अधि. १४ सूत्र ४५ ) "**तस्मै हं परिक्रियते**" म्हणजे त्या सांगकर्मांकरितां यजमान ऋत्विजाला दक्षिणा देऊन विकत घेतो. शारीरभाष्यावरील 'रत्नप्रभा' नांवाच्या टीकेंत "**भृत्यकर्तृके युद्धे राजा युध्यति जयति च**" म्हणजे सेवकांनीं युद्ध केलें तरी राजानें युद्ध केलें, राजाला जय मिळाला असें जसें म्हणतात, तसें धर्मकर्माचें फल ऋत्विजाला न मिळतां यजमानालाच मिळतें असें म्हटलें आहे. पूर्वमीमांसेमध्येंहि ( अ० २ पाद ७ व ८ मध्यें ) निरनिराळ्या ठिकाणीं हा विषय आलेला असून त्याचा निकाल '**यजमानेन क्रीताः कर्तारः ऋत्विजः दक्षिणादानेन कर्मकराः परिक्रेतव्याः**' दक्षिणा देऊन धर्मकर्में करण्याकरितां मदतनीस विकत घ्यावेत, ऋत्विज म्हणजे यजमानानें विकत घेतलेले मदतनीस असा अर्थ दिला आहे. तात्पर्य, शास्त्रांमध्यें दलालीची किंवा मध्यस्थाची कल्पना नाहीं व ज्ञानेश्वरांच्या पूर्वीचा इतिहास पाहिल्यास तेथेंहि या कल्पनेचा मागमूस नाहीं. मध्यस्थांची व दलालांची कल्पना आमच्या सुधारकांनीं पाश्चात्यांच्या इतिहासांतून घेतली व ती भटभिक्षुकांवर लादली.

संतांनीं या मध्यस्थांचें बंड मोडलें असें म्हणतात. पण भिक्षुकांचें बंड नसलें तरी संताळ्यांचें बंड तेव्हांपासूनच समाजांत वाढलें. संत म्हणजे देव भेटविणारा, देव व मनुष्य यांच्यामधील दलाल अशीच कल्पना समाजांत आहे. हिंदुसमाजांत संताळ्यांचें बंड बरेंच आहे, संतांमध्यें अब्राम्हण संतच पुष्कळ आहेत. ते समाजाची जिज्ञासा व कर्तृत्व हीं मारीत आहेत. तेव्हां त्यांचें उच्चाटण वास्तविक व्हावयास पाहिजे. हें आम्ही या ग्रंथाच्या पूर्वार्धांत 'जिज्ञासा मारणारा वेदान्त ' या प्रकरणांत सांगितलें आहे.

ब्राह्मणेतर बंधूंना आम्ही असें स्पष्ट सांगतों कीं, मध्यस्थांची व दलालांची कल्पना आमच्या संस्कृतींत नाहीं, शास्त्रांत नाहीं, जर कोणी ती आहे असें म्हणत असेल तर ती चुकी आहे. घराच्या कामाला जसा सुतार किंवा गवंडी हा मजुरीनें बोलावतात तसाच हा पुरोहितहि दक्षणा देऊन धर्मकर्मांत **मदत पाहिजे असल्यास** बोलवावा. ब्राह्मणानें बोलावल्याशिवाय कोणाचेंहि धर्मकार्य करण्यास जाऊं नये. धर्मकर्म करितांना तें हक्क म्हणून न करितां, कर्तव्यबुद्धीनें करावें अशी ब्राह्मणाला शास्त्राची आज्ञा आहे.

---

# प्रकरण सातवें

## समाजबलविचार

### पोटजातींचें एकीकरण

हिंदुसमाजाचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास हा समाज सांप्रत वर्णबद्ध नसून जातिबद्ध आहे हें उघड दिसतें. वर्णव्यवस्था व वर्णसंस्था यांचीं नांवें मात्र शिल्लक आहेत आणि व्यवहार मात्र जातिसंस्थेच्या द्वारांच होत आहे. वर्ण व वर्णाश्रमधर्म हे जुन्या ग्रंथांतील प्रयोग आज उच्चारणें हास्यास्पद आहे.

चार वर्णांपैकीं कृषि, गोरक्ष, वाणिज्य करणारा वैश्यवर्ग मात्र हिंदुस्थानांत पुष्कळ आहे. महाराष्ट्रांत जमीन धारण न करणारा असा कुणबी क्वचितच आढळेल. म्हणजे वैश्यवर्ग हा जाति व वर्ण—धर्मोचित धंदा या

दोहोंनीं युक्त आहे. महाराष्ट्रांत शूद्र वर्ग म्हणजे केवळ मजूरकाम करणारा वर्ग असा थोडा आहे. कृषि करणाऱ्या कुणब्याला विनाकारण शूद्र म्हणण्यांत येतें. वर्णधर्मोचित आचार, संस्कार व विद्या यांनीं युक्त असे ब्राह्मण आणि क्षत्रिय वर्ग, अस्तित्वांत नाहींत.

ब्राह्मण आणि क्षत्रिय हे जाति मात्र आहेत म्हणजे वर्णधर्मच्युत आहेत. चातुर्वर्ण्य संस्था ही परस्परावलंबी, परस्परोपकारी अशी आहे, चारहि वर्णांनीं आपापलीं परस्पर संबद्ध कर्तव्यें सोडलीं असल्यामुळें आज हिंदुसमाज चातुर्वर्ण्यबद्ध आहे असें म्हणणें सर्वथैव चुकीचें आहे. शिवाय चातुर्वर्ण्य संस्था म्हणजे एक जुडगें आहे. त्या संस्थेंत क्षत्रिय राजा व ब्राह्मण मंत्री हा विशेष आहे. क्षत्रिय राजा जोंवर नाहीं तोंवर चातुर्वर्ण्य संस्थाच व्यवहारांत नाहीं.

आज हिंदुसमाजांतील पुष्कळ जाती ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असें म्हणवून घेऊं लागल्या आहेत. पण तें वर्णधर्मोचित कर्तव्यें करण्याकरितां नसून त्यांना आज उच्च होण्याची आकांक्षा उत्पन्न झाली आहे म्हणून ! वर्णाभिनिवेश, वर्णांचीं ध्येयें, वर्णांच्या वृत्ति, भावना, कल्पना या सर्वांचा अभाव असल्यामुळें आज वर्णसंस्था नाहीं.

आजचा हिंदुसमाज जातिबद्ध आहे. हिंदुसमाजांत जातीचें महत्त्व फार आहे, तें इतकें कीं हिंदु मनुष्य जातीकरतां मरतो. जगांतील माणसें कोणी देशाकरितां, तर कोणी धर्माकरितां मरतात. "जातीकरितां खावी माती," 'Blood is thicker than water' ह्या म्हणी हिंदुसमाजाला तंतोतंत लागतात. जातिबद्ध असणें आणि हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दायविभाग करून घेणें असें हिंदूंचें सामाजिक लक्षण बांधतां येतें. हिंदुसमाजाचा व जातिसंस्थेचा इतका दृढ संबंध आहे कीं, हिंदुसमाजाशेजारीं जो मुसलमानसमाज आहे त्यांतहि ३०।३२ जाती उत्पन्न झाल्या आहेत, आणि ख्रिश्चनांनींहि बाटल्यानंतर पूर्व जातिभेद कायम ठेवला आहे. विविध जातींमध्यें उच्चनीचपणाच्या कल्पना विलक्षण आहेत. जातिविषयक म्हणी पाहिल्या तर प्रत्येक जात स्वतःला उच्च व दुसऱ्याला नीच समजते. महार म्हणतो 'आधीं महार मग सृष्टि होणार', माळी म्हणतो, 'आधीं माळी व मग सृष्टि झाली' या म्हणींवरून या कल्पना किती खोल आहेत हें दिसतें.

हिंदुसमाजांत आज जिकडे तिकडे जातीच जाती झाल्या आहेत. हें जातींचें जंगल ऐवढें मोठें आहे कीं, एकट्या मुंबई इलाख्यांत १४४८ जाती आहेत ! सबंध हिंदुस्थानांत नुसत्या ब्राम्हणांच्याच ३००।४०० पोटजाती आहेत. कोळी, माळी, साळी, शिंपी, मराठे, कुणबी, फार काय पण अस्पृश्यवर्ग जरी घेतला तरी या सर्वांत जाती व उपजाति यांचें एवढें जंजाल वाढलें आहे कीं, सांगून सोय नाहीं. सुरतेला नुसत्या ब्राम्हणांच्या ८४ जाती आहेत, व चौऱ्यांशी जातींच्या महाजनवाड्या आहेत. मद्रास इलाख्यांत वरच्या वर्गांत सोंवळ्या-ओवळ्याचें बंडहि जास्ती व जातींची संख्याहि खूप ! एकंदरींत हिंदुसमाजाचा अभ्यास करणाऱ्यानें या जातिसंस्थेचा अभ्यास काळजीपूर्वक केला पाहिजे. हा विषय एवढा व्यापक व अवाढव्य आहे कीं, त्यांत सबंध जन्म घालविला पाहिजे. आम्ही आमच्या अल्पशक्तीप्रमाणें गेलीं १० वर्षें हिंदुसमाजाचें निरीक्षण करितांना जातींचेंहि निरीक्षण केलें. विषयास कोठून तरी तोंड पाडलें पाहिजे म्हणून प्रथम ब्राह्मण जातींचा विशेष अभ्यास केला त्यावरून आमचींहि कांहीं अनुमानें ठरलीं आहेत.

वर्णव्यवस्थेंतून जातिसंस्था कशी उत्पन्न झाली ? मुख्य जाती कोणीं उत्पन्न केल्या ? पोटजाती कशा निघाल्या ? यांचें सयुक्तिक व समाधानकारक उत्तर जुन्या पंडितांकडून मिळत नाहीं. जुने पंडित म्हणतात, कीं हें सर्व परमेश्वरानें उत्पन्न केलें आहे व हें सर्व जसेंच्या तसेंच राहिलें पाहिजे, असा त्यांचा सिद्धांत आहे. अनुलोम व प्रतिलोम मिश्रणामुळें जाती झाल्या असें स्मृतिकार म्हणतात व त्याकडे हे पंडित बोट दाखवितात. जातिसंस्थेचा अभ्यास करून खानेसुमारीच्या अधिकाऱ्यांनींहि मोठमोठे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. पण इंग्रजी ग्रंथकार व नव विद्वान् या सर्वांचा रोख असा कीं, जाती या धंद्यांवरून झालेल्या आहेत. एक म्हणतो जातींचें कारण जन्म, तर दुसरा म्हणतो जातींचें कारण धंदा. दोघांच्या समजुतींत दक्षिण उत्तर ध्रुवांइतकें अंतर असल्यामुळें समाजकार्याला त्यांचा फारसा उपयोग होत नाहीं. जन्मावरून जात म्हणावी तर, स्मृतिशास्त्रांत आज प्रत्यक्ष विद्यमान असणाऱ्या सर्व जातींचा उल्लेख नाहीं. धंद्यांवरून जात म्हणावी तर मुंबई इलाख्यांत १५०० जाति व १५० धंदे अशी स्थिती आहे. १५० धंद्यांत ज्या अर्थी १५०० जाती मुरल्या आहेत, त्या अर्थी धंदा हें अनेकांपैकीं एक जात बनण्याचें कारण एवढें स्पष्ट होतें. उदाहरणार्थ, मराठी राज्यांतील एक घोडेस्वार घेतला, तर त्याच्याभोंवतीं जिनगर, नालबंद, खरारावाले, मेखा मारणारे, असे

धंदेवाले दिसतात. आजची मोटार घेतली तर तिच्याहि भोंवतीं ५१४ धंदेवाले आहेतच. विविध जातींचा अभ्यास केला तर, जन्म व धंदा यांखेरीज संस्कृति-भेद, आहारभेद, आचारभेद, उपास्यभेद, स्थानभेद, क्रांत्या, दुष्काळ, जलप्रळय, भूकंप इत्यादि उत्पात अशा विविध कारणांनीं जाति बनलेल्या आहेत असें सप्रमाण सिद्ध होतें. आज दिसणाऱ्या अनेक जाती व उपजाती या अनीश्वर व कृत्रिम कारणांनीं बनल्या असल्यामुळें तुल्याचार व तुल्यसंस्कार अशा पोटजातींमध्यें एकीकरण व्हावयास पाहिजे. जातिसंस्था कधीं उत्पन्न झाली या प्रश्नाचें उत्तर इतिहासाचार्य राजवाडे यांनीं दिलें तेंच ग्राह्य वाटतें. बुद्धोत्तरकालांत जातिसंस्था, व कठोर जातिबंधनें उत्पन्न झालीं. एका काळीं पितृसावर्ण्य होतें तें जाऊन मातृ-सावर्ण्य येण्यापूर्वीं मध्यंतरीं ही संस्था उत्पन्न झाली.

ह्या वेळपर्यंत हिंदुसमाज आज वर्णबद्ध नाहीं, तो जातिबद्ध आहे, जाति-संस्थेचा अभ्यास म्हणजेच समाजाचा अभ्यास, जातिसंस्था कधीं उत्पन्न झाली, तिचीं कारणें कोणतीं, इत्यादि मुद्यांचें विवेचन केलें. आतां हिंदुसमाजबलवृद्ध्यर्थ पोटजातींचें एकीकरण कसें अवश्य आहे व तें शक्य, इष्ट व धर्म्य कसें आहे हें सांगतों. हिंदुसमाजांतील प्रत्येक मुख्य जातींत अनेक पोटजाती आहेत. त्या इतक्या अल्पसंख्य आहेत कीं, २५ पासून १०० पर्यंत माणसें पोटजातींत असल्यामुळें त्या मुमूर्षू बनल्या आहेत. मराठ्यांमध्यें ९६ कुळी व ७ कुळी या प्रमुख जाती असल्या तरी त्यांत अवांतरहि पुष्कळ पोटजाति आहेत. मासे धरण्याकरितां जाळीं टाकणें, कडेवरून, खांद्यावरून व डोक्यावरून पाणी आणणें, पानमळे करणें, व्याजबट्टा करणें, असल्या क्षुद्र कारणांनीं ज्या अत्यल्पसंख्य जाती झाल्या आहेत त्यांचें एकीकरण त्वरया केलें पाहिजे. गुजराथेमध्यें ५०।५० ६०।६० घरांची एकेक जात असून त्यांनीं आपल्या गांवाबाहेर मुलगी देऊं नये असले चमत्कारिक निर्बंध केले आहेत. बऱ्हाणपूर भागांत पुष्कळ बनिये आगा-खानी संप्रदायांत शिरतात. त्याचें कारण त्यांना आपल्या जातींतील बायका मिळत नाहींत व अन्य जातींतील केल्यास जातिबहिष्कृत करण्यांत येतें. खान-देशांत भाटिया ऊर्फ भाव्या नांवाची एक जात चोपडें धरणगांव या भागांत आहे. या जातींची लोकसंख्या सरासरी ६०० आहे. पण अविवाहित तरुणांची संख्या १५५ आहे. मुंबईकडचे श्रीमान् भाटे रगड पैसा देऊन इकडच्या मुली नेतात. अर्थात् हे लोक कन्याविक्रय करून जरठकुमारी लग्नें लावून मोकळे होतात !

लोकसंख्या अवघी ६००, दुसऱ्या पोटजातींतील मुली करण्याची चाल नाहीं, मग या जातींतील तरुणांनीं स्वैराचाराशिवाय काय करावें ? कात्यायन व पल्लेवाळ या अत्यल्पसंख्य ब्राह्मणजाति आहेत. " आम्ही सर्वस्वीं ब्राह्मण असून आम्हांला कोणी ब्राह्मण मुली देत नाहींत, मग आमच्या मुलांनीं रखेल्या ठेवाव्या काय ? " अशीं त्यांचीं पत्रें आलीं आहेत. तंजावर प्रांतांत व्यंकोजीराजे यांचेबरोबर कांहीं ब्राह्मण व क्षत्रिय कुटुंबें गेलीं. त्यानंतर आणखी कांहीं कुटुंबें जाऊन त्यांच्या वेगवेगळ्या जातीच पडलेल्या आहेत. मद्रास प्रांतांत मूळ महाराष्ट्रीय, पण आतां मद्रासी झालेल्या ब्राह्मणांची स्थितिही ना इकडे ना तिकडे अशी आहे. कोमटी वैश्यांत ७२ गोत्री निराळे व तदन्य निराळे असे गट असून त्यांतहि अत्यल्पसंख्य जाति आहेत. भट्टप्रभू, कायस्थ, सह्वासी, पल्लेवाळ, जंबूकण्व, किस्ती, या अल्पसंख्य जाती ऱ्हास पावत आहेत. कायस्थांचीहि हीच ओरड आहे. चांद्रसेनीय, पाताणे व दवणे असे यांतील प्रमुख भेद असून क्षेत्रसंकोचामुळें गोरगरिबांना फारच अडचण पडत आहे. मुलीला नवरा व मुलाला बायको जेथें मिळत नाहीं त्या समाजांत रहा कशाला ? मुसलमान कां होऊं नये ? असले विचार कांहींच्या डोक्यांत येणें अशक्य नाहीं. आणि खरोखर पुष्कळ माणसें बायका मिळविण्याच्या लालुचीनेंच मुसलमान किंवा ख्रिश्चन होतात. पुण्यास गेल्या नोवेंबरमध्यें एक पारशांची सभा भरली होती. तेथेंहि पारशी समाज ऱ्हास पावत आहे व त्याचें कारण क्षेत्रसंकोच असें सांगण्यांत आलें. हिंदुसमाजांतील बहुसंख्य जातींना या दुःखाची जाणीव नाहीं. ती करून दिली पाहिजे. व अल्पसंख्य पोटजातींचें एकीकरण मुख्य जातींत अतित्वरया झालें पाहिजे. हिंदुसमाजाचें समाजबल वाढण्यास हा एक महत्त्वाचा उपाय आहे.

हिंदुसमाजाला समर्थ करण्याकरितां पोटजाती मोडण्यापेक्षां सर्व जाति एकदम मोडणें इष्ट नाहीं काय ? असें कोणी विचारतात. पण आम्हांला अनेक कारणांस्तव सबगोलंकाराची कल्पना सर्वस्वीं अमान्य आहे. पोटजातींचें एकीकरण हें कार्य सबंध हिंदुसमाजाला ५० वर्षें पुरेल एवढें आहे. नव्यांना तें आवश्यक असून जुन्या लोकांना तें पटवितां येण्याजोगें आहे. परकीय राज्ययंत्र, दळणवळणाची वाढ, एक कायदा, एक शिक्षणपंथविध्वंस, वृत्तिविध्वंस यांमुळें जातीजातींचे कंगोरे झिजून समाजांत एकरूपता वाढत आहे हें खरें. तथापि असल्या एकरूपतेनें सर्व जातींचें एकीकरण धर्म, समाज व राष्ट्रदृष्ट्या इष्ट होईल असें

आम्हांस वाटत नाहीं. हिंदुसमाज हा मोठ्या राष्ट्रांतला आहे, तो भिन्न वंश, भिन्न आचार व भिन्न विचार यांनीं युक्त आहे. म्हणजे समाजांतल्या विविध थरांत अंतर फार आहे. म्हणून सर्व जाति मोडण्याची भाषा बोलणें मूर्खपणाचें आहे. पण पोटजाती मोडण्याची घिसाडघाई करूं नये हेंहि म्हणणें तितकेंच मूर्खपणाचें आहे. आहेत त्या सर्व जाति तशाच ठेवणें व सबगोलंकार करणें हीं दोन्हीं टोंकें सोडून पोटजातींच्या एकीकरणाचा सुवर्णमध्य व्यवहारांत आणला पाहिजे.

हिंदुसमाज संघटित करण्याकरितां पोटजातींचें एकीकरण अत्यावश्यक आहे, असें म्हणतांच शिवाजी व रामदासांनीं पूर्वीं या जाती ठेऊनच धर्मरक्षण केलें नाहीं काय ! स्वराज्य मिळविलें ना ? बापजाद्यांनीं पराक्रम केले ना ? ते सर्व गाढव होते काय ? असा एक कोटिक्रम करण्यांत येतो. त्याचें उत्तर देऊन हें प्रकरण आटोपतों. श्रीशिवछत्रपतीच्या वेळचें स्वराज्य व आजचें स्वराज्य यांत महदंतर आहे. आजच्या लोकशाहीच्या स्वराज्याला जशी सामाजिक सुधारणेची आवश्यकता आहे तशी पूर्वीं नव्हती. आज भवानी तरवारीनें व चिलखतानें लढतां येणार नाहीं किंवा घोरपडी टाकून किल्लेहि सर करतां येणार नाहींत. शास्त्रीय ज्ञानांत जितकें अंतर पडलें आहे तितकेंच सामाजिक विचारांतहि पडलेलें आहे. शास्त्रीय शोध, जगाशीं परिचय, देशाभिमानाची भावना अशी परिस्थिति पूर्वीं नव्हती. पूर्वींचा जुलूम प्रत्यक्ष तर आजचा बुद्धिगम्य व तर्कगम्य अशी स्थिति आहे. शिवाजीमहाराज जर आज असते तर त्यांनाहि अस्पृश्यतानिवारण, पोटजातींचें एकीकरण व हिंदुसंघटन हेंच योग्य आहे असें म्हणावें लागलें असतें.

वाडवडिलांना कळत नव्हतें असें नाहीं. त्यांना न कळणाऱ्या गोष्टी आम्ही कोठून सांगणार ? आमचे बापजादे हे खास गाढव नव्हते. ते धर्मशास्त्रज्ञ, देशकालज्ञ व दूरदर्शी होते. अर्थात् त्यांचे वंशजहि आम्ही देशकालपरिस्थिति पाहून बोलतों व वागतों. कारणांतील गुण कार्यांमध्यें येतात. बापजादे गाढव नव्हते म्हणूनच आम्ही त्यांचे वंशजहि खास गाढव नाहीं. देश, काल आणि परिस्थिति लक्षांत न घेतां जे कांहींतरी बोलतात त्यांनाच तें विशेषण लागतें. तात्पर्य, तुम्हीच कोण शहाणे ? पूर्वीं असले प्रश्न कां आले नाहींत ? असें बाष्कळपणें जे विचारतात त्यांना भीक न घालतां, पण अनादरहि न दाखवितां हिंदुसमाजानें पोटजातींचें एकीकरण आतां शीघ्र केलें पाहिजे.

गेल्या सात प्रकरणांत समाजबल वाढण्याचे उपाय सांगितले. आतां पुढील दोन प्रकरणांत समष्टिधर्मांचा गोड घास वाढून हा ग्रंथ संपवितों.

---

# प्रकरण आठवें

## समाजबलविचार

### समष्टिधर्म

हिंदुसमाज समर्थ कसा होईल ? या प्रश्नाचा विचार करीत करीत आपण समष्टिधर्मापर्यंत आलों. हा या ग्रंथांतील शेवटचा विषय होय. आतांपर्यंत जो उहापोह केला त्या व्यतिरिक्त राहिलेल्या स्थूलसूक्ष्म प्रश्नांचा विचार करून हा ग्रंथ संपवितों. त्यापूर्वी विषयाचें थोडें सिंहावलोकनहि अवश्य आहे.

पहिल्या प्रकरणांत हिंदुसंघटनेची भूमिका वैदिक आर्यांच्या वृत्तीशीं कशी एकरूप आहे हें सांगितलें. दुसऱ्या प्रकरणांत 'हिंदु' शब्दाची व्यापक व्याख्या लक्षांत ठेवण्याच्या सूचना करून हिंदुसमाजाच्या मनोदौर्बल्याकडे वळलों. शकुन, ज्योतिष, भुतेंखेतें यांपासून प्रारंभ करून तों जिज्ञासा मारणाऱ्या वेदांतापर्यंत हिंदुसमाजाच्या मनोदौर्बल्याची चर्चा केली. उत्तरार्धामध्यें प्रथम शारीरबलाची आवश्यकता सांगून हिंदुसमाजाचें सामाजिक बळ वाढविण्याकरितां स्त्रियांची उन्नति, वैवाहिक सुधारणा, अस्पृश्यतेचें उच्चाटण, चढाईचें शुद्धिकार्य, ब्राम्हणब्राम्हणेतर वादाचें निर्मूलन, पोटजातींचें एकीकरण असे विषय क्रमानें चर्चेस घेतले. म्हणजे हिंदुसंघटनाच्या क्षेत्रांत जेवढे महत्त्वाचे विषय येतात त्या सर्वांचा विचार झाला. हिंदुसमाजाचें मानसिक, शारीरिक व सामाजिक बळ वाढण्याकरितां हिंदुसमाजानें यापुढें ज्या समष्टि धर्माचें अनुष्ठान करावयास पाहिजे, त्याच्या चर्चेकडे वळतों.

हिंदुसमाजाच्या भावी राष्ट्रीय जीवनाला समष्टिधर्माची फारच आवश्यकता आहे. हिंदुसमाज जितका व्यष्टिधर्माबद्दल उत्सुक आहे तितका तो समष्टिधर्माबद्दल नाहीं; व्यक्तीची उन्नति, व्यक्तीचा मोक्ष, व्यक्तीचें सुख, व्यक्तीची नीतिमत्ता इत्यादि व्यवहारांत इतर समाजांपेक्षां हिंदुसमाज कांकणभर सरसच ठरेल. हिंदुसमाजांतलि व्यष्टिधर्माचें श्रेष्ठत्व समष्टिधर्मांत परिवर्तित व्हावयास पाहिजे. इतर समाजांत जी जूट, शिस्त आणि सामुदायिक

आस्था आढळते त्याचें कारण त्यांचें समष्टिधर्माचें वैशिष्ट्य हें होय. उत्साह, उद्योग, आस्था व कळकळ हे सद्गुण समाजांत असले तर तो समाज वर्धिष्णु व जयिष्णु होतो. परंतु समाजांतील कांहीं व्यक्तींत जरी वरील सद्गुण आढळले परंतु ते जर समाजांत कमजास्त प्रमाणांत नसले तर समाज सहिष्णु होऊन हळूहळू मृत्युपंथाला लागत असतो.

हिंदुसमाजाला समष्टिधर्माचें बाळकडू वर्णसंस्था अस्तित्वांत होती त्या वेळीं होतें. पण हल्लीं वर्णसंस्थेचा मागमूस नाहीं. तिचीं शकलेंन् शकलें उडालीं असून हिंदुसमाज हा जातिद्वारांच ओळखला जातो. भिन्नभिन्न जातींचे घटक हिंदुसमाजांत आहेत. त्या सर्वांना आपण हिंदु आहोंत, हिंदुसमाज आपला आहे, हिंदूंचा हिंदुस्थान हा देश आहे, अशी जाणीव करून देऊन हिंदुसमाजाला समष्टिधर्म शिकविला पाहिजे. म्हणजे व्यक्तीचा धर्म निराळा आणि समाजाचा धर्म निराळा हें तत्त्व चांगलेंच बिंबवावयास पाहिजे. मी अमुक समाजाचा घटक, त्या समाजाचीं अमुक श्रेष्ठ तत्त्वें, त्याची विशिष्ट संस्कृति, त्या समाजाकरितां धर्म, राजकारण, उद्योग, व्यवहार इत्यादि क्षेत्रांत मी अमुक पद्धतीनेंच वागलें पाहिजे, असें ज्ञान प्रत्येक हिंदूला या दृष्टीनें व्हावयास पाहिजे.

समाजामध्यें सामुदायिक बल वाढविण्याकरितां कांहीं बंधनें पाळावीं लागतात. हिंदुसमाजांत इतकें शैथिल्य आलें आहे कीं, त्याला कोणतेंच बल वाढेल अशीं बंधनें उरलेलीं नाहींत. समाजांत बल वाढण्याकरितां समाजाला श्रद्धेय अशीं बरींच ध्येयें—निदान चार दोन ध्येयें—पाहिजेत आणि समाजाचें द्वेष्यहि एकच पाहिजे. समाजापुढें द्वेष्य एक असलें म्हणजे प्रतिकारशक्ति, सावधानता आणि दूरदर्शीपणा हे गुण वाढतात आणि समाजांत श्रद्धेय ध्येयांनीं प्रेम, ऐक्य, सहकार्य हे गुण वृद्धिंगत होतात. हिंदुसमाज अत्यंत उदार असें तत्त्वज्ञान बाळगीत असल्यामुळें त्याला श्रद्धेय असें कांहींच नाहीं किंवा द्वेष्यहि कांहींच नाहीं; किंवा सर्वच श्रद्धेय आणि सर्वच द्वेष्य अशी त्याची स्थिति झाली आहे. समाज जेव्हां समर्थ असतो, जयिष्णु असतो, तेव्हां त्याला श्रद्धेय व द्वेष्य असें कांहींच नसलें तरी किंचित्काल चालतें. परंतु दुर्बल समाज हा नुसतें विश्वबंधुत्व, नुसतें तत्त्वज्ञान, नुसतें औदार्य जर उराशीं कवटाळूं लागला तर त्याला मरणावांचून गति नाहीं. हिंदुसमाज हा फाजील औदार्य आणि अक्षम्य औदा-

सिन्य या दुर्गुणांनीं मरत आहे. त्याचें मरण टाळण्याकरितां उत्कट समाजधर्म अंगीं बाणविला पाहिजे आणि समाजबंधुत्वानें वागण्याचें शिक्षण दिलें पाहिजे.

हिंदुसमाजाचे घटक जातिरूपानें आहेत, समाजरूपानें नाहींत. व्यक्ति-स्वातंत्र्याचें बंड इतकें माजलें आहे कीं, तें कुटुंब, जात व समाज यांच्या आड येत आहे. प्रत्येक व्यक्ति सुटी, तुटक, संन्यस्त आणि स्वतंत्र किंवा एकांडी अशी बनल्यामुळें समाजबल उत्पन्न होण्याला अवसर मिळत नाहीं. सामाजिक बलवर्धनाकरितां समष्टिधर्मांतील कांहीं तत्त्वांचें विवेचन येथें करीत आहों, पण तें पूर्ण आहे असें म्हणतां येणार नाहीं. तथापि दिशा दाखविण्यापुरतें हें विवेचन पुरें आहे. वास्तविक वैयक्तिक आणि सामुदायिक धर्मांतील मर्म समजून घेण्याची आवश्यकता वाटली कीं पात्रता येते. ही पात्रता वृद्धिंगत होत होत समष्टिधर्मांत अंतर्धान पावते आणि व्यष्टिधर्मांचा आग्रह आपोआप कमी होतो. कोणत्याहि वस्तूला दोन ताण सारखे तुल्यबल असले तरच ती स्थिर राहाते. एक ताण कमी झाला कीं ती दुसरीकडे झुकते. व्यष्टिधर्मांचा ताण कमी झाला आणि समष्टि-धर्मांचा ताण चांगला ओढला गेला तर त्याच ओढीनें हिंदुसमाजाचें बल वाढेल.

समष्टिधर्माचें **पहिलें तत्त्व हें कीं, सर्व हिंदूंचे कर्णवेध, उपनयन, विवाह आणि अंत्येष्टि** हे संस्कार हिंदुत्वदर्शक समजले पाहिजेत. कारण हिंदुत्व हें संस्कारांकित आहे. हे संस्कार वेदमंत्रांनीं सर्व हिंदूंचे व्हावेत, ते ज्याचे त्यानें करावेत, फार तर **मदत नसेल म्हणून तज्ज्ञांची मदत घ्यावी**, मध्यस्थ म्हणून कोणासहि बोलवूं नये. हिंदुत्वनिदर्शक संस्कार वेदमंत्रांनीं प्रत्येक हिंदूंचे झाले पाहिजेत. ते करण्याचा प्रत्येक हिंदूला सामाजिक हक्क आहे. वेदाचा अधिकार हा सर्वांस आहे. त्यांतल्यात्यांत हिंदूंच्या बापजाद्यांनीं वेदाची जोपासना अत्यंत आस्थेनें केली असल्यामुळें त्यांना वेदमंत्रयुक्त संस्कार करण्याची पात्रता सहजच येते. सर्व हिंदूंनीं उदार मनस्कतेनें आणि पवित्र भावनेनें या वेदांचा उपयोग संस्काराचे वेळीं अवश्य केला पाहिजे. अधिकार आणि अनधिकार यांची भाषा आतां पुरे आहे. त्या भाषेनें संस्कारशैथिल्य आलेलें आहे. बाप्तिस्मा, सौनतविधि केल्यानें म्हणजे कांहीं विशिष्ट विधींनीं जर ख्रिश्चन व मुसलमान होतां येतें तर कांहीं संस्कारांनीं हिंदुत्व मुद्रा कां आणतां येऊं नये ? एकदां हिंदु धर्मांत मनुष्य जन्मला कीं तो जन्मोजन्मीं हिंदूच होत असतो; कांहीं झालें अगर केलें तरी अहिंदु होत नाहीं, मोक्ष मिळेपर्यंत हिंदूच राहातो यांत संशय

नाहीं. तथापि हिंदुत्वदृढीकरणार्थ समष्टिधर्म म्हणून वरील संस्कार अगत्य केले पाहिजेत. संस्कार हा एक विधि आहे, हें एक प्रायश्चित्त आहे, मनःसमाधानार्थ आणि विशिष्ट धर्माचें चिन्ह म्हणून त्याची अत्यंत आवश्यकता आहे. प्रत्येक धर्माला व समाजाला कांहीं आचारांची जरूर असते. प्रत्येक समाज हा इतर समाजांपासून आपलें भिन्नत्व आणि व्यावृत्ति हीं कांहीं विशिष्ट खुणांनींच दाखवितो. हिंदुत्वनिदर्शक कांहीं खुणा संस्काररूपानें हिंदूंच्या मनावर केल्या पाहिजेत. संस्कारशून्य मनुष्य पशु होय. संस्कारानें नैतिक सामर्थ्य वाढतें आणि परंपरेचा आभिमान उत्पन्न होतो. शरीररक्षणार्थ जसें वस्त्र प्रावरण पाहिजे त्याप्रमाणें मनाला सुयंत्रित करण्याकरितां वैदिक संस्कार पाहिजेत. वेदमंत्रांनीं संस्कार केले तरच वेदांचें स्मरण राहील. हल्लीं संस्कार कांहीं जातींत होतात. त्यांतहि धर्मापेक्षां व्यवहाराचा व लौकिकाचा भागच अधिक आढळतो. वास्तव शास्त्रशुद्ध संस्कार झाले पाहिजेत; ते अर्थ समजून त्या प्रसंगाचें गांभीर्य समजून घेऊन झाले पाहिजेत. त्या संस्कारांत एक धर्मभावना आहे, एक पावित्र्याची जाणीव आहे, तिचें रक्षण व्हावयास पाहिजे. संस्कार म्हणजे एक नाटक आहे अशी कल्पना अत्यंत अनिष्ट आहे. प्रत्येक हिंदु आस्तिक पाहिजे, ईश्वरावर त्याचा विश्वास पाहिजे आणि त्या विश्वासाचें द्योतक म्हणून त्यानें समष्टिधर्मांतील प्रत्येक आचार अत्यंत श्रद्धेनें पाळला पाहिजे आणि शेजाऱ्यांकडून पाळविला पाहिजे. विद्येला प्रारंभ करण्यापूर्वी मुलामुलींचा उपनयन ऊर्फ विद्यारंभसंस्कार पवित्र भावनेनें करून विद्येचा प्रारंभ करावा आणि त्याच वेळीं विद्यार्थिधर्माचें शिक्षण द्यावें. विवाहविधि हा इहलोकांतील पवित्रतम विधि असून त्याचें महत्त्व वधूवरांनीं समजून घ्यावें व त्या विधींतील मंत्रांचा अर्थ ध्यानांत ठेवून वागावें. मृतात्म्याचें अभीष्टचिंतन, सद्गतिलाभ आणि पुन्हां त्याचा हिंदुसमाजांत जन्म याकरितां अंत्येष्टिसंस्कार पाहिजे.

हिंदुसमाजानें समष्टिधर्म म्हणून सूर्य या देवतेचेंच पूजन केलें पाहिजे. सर्व हिंदूंचें सूर्य हें अनादिकालापासून वेदप्रतिपादित दैवत आहे. त्याच्या पूजनानें तप, तेज, विद्या यांची प्राप्ति होते म्हणून सूर्योपासनेचा पुरस्कार केला पाहिजे. हिंदुसमाजांतील सर्व जातींनीं, घटकांनीं, थरांनीं, स्त्रियांनीं, पुरुषांनीं, बालांनीं, वृद्धांनीं **गायत्री मंत्राचा सकाळ सायंकाळ पांच वेळां तरी जप करून सूर्याची मानसिक आराधना करावी** आणि सूर्यनारायणाला निदान साठ तरी

नमस्कार घालून शारीर तपश्चर्या करावी. नमस्कार हे पुरुषांनींच घालावेत असें नसून स्त्रियांनीं सुद्धां घालण्यास हरकत नाहीं. मानसिक आणि शारीरिक तपस्या श्रीसूर्यनारायणाच्या उपासनेनें प्रत्येक हिंदूनें करावी. कारण सूर्य हा सर्व हिंदूंचें दैवत आहे. सर्व हिंदूंना दर्शन, स्पर्शन व उपासना सहजसुलभ असून सर्व पंथांना आणि मतांना ' सूर्य आत्मा जगतः तस्थुषश्च ' सूर्य हा स्थावर-जंगम जगताचा आत्मा आहे हें तत्त्व सर्वस्वीं मान्य आहे. यास्तव समष्टिधर्म म्हणून याच देवतेची पूजा प्रत्येक हिंदूनें अत्यावश्य केली पाहिजे. इतर सर्व देव पर-ब्रह्माचे प्रतीक आहेत अशा बुद्धीनें त्यांची पूजाअर्चा कुळधर्म म्हणून करावयाची असेल तर ती खुशाल करावी; परब्रह्माचे प्रतीक म्हणून गांवांतील राम, कृष्ण, मारुती इ. देवतांचे उत्सव व मिरवणुकीहि मोठ्या थाटानें काढाव्यात. प्रत्येक हिंदूनें उत्सव व मिरवणूक यांमध्यें भक्त व सैनिक या दृष्टीनें अवश्य भाग घेतला पाहिजे.

कोणत्याहि समाजाच्या आयुष्यांत आनंद व आशा नसणें हें एक समाज-नाशाचें कारण आहे. म्हणून समाजांत आनंद व उत्साह उत्पन्न करण्याकरितां उत्सव व मिरवणुकी हीं अवश्य पाहिजेत. उत्सवांत राष्ट्रवर्धनाचें तें एक साधन या दृष्टीनें महत्त्व आहे. हिंदुसमाजामध्यें देवतांचे उत्सव व मिरवणुकी यांचा प्रचार चांगला आहे, तो अधिक वाढवला पाहिजे. वाद्यांचा व उत्सवाचा निकट संबंध आहे. किंबहुना उत्सवाचें दर्शक वाद्य व वाद्याचा निनाद म्हणजे आनंदाचा स्फोट होय. हिंदुधर्मशास्त्रामध्यें वाद्यांचें विधान आहे. देवतांचे उत्सव, यात्रा, जत्रा याच काय पण रोजच्या पूजेमध्यें सुद्धां गानवादननर्तन पाहिजे असें शास्त्रांत आहे. पहाटे चौघडा, पूजेचे वेळीं सूरसनई, पूजेनंतर गायनवादन, त्या-नंतर गोंधळी व डौरी यांची हजेरी असा क्रम मोठमोठ्या देवालयांत व संस्था-निकांच्या देवळांतहि अद्याप चालू आहे. सनई, चौघडा, तंतुवाद्यें आणि इतर अशाच तऱ्हेचीं मंगल व मंजुळ वाद्यें वाजविणाऱ्या लोकांना वंशपरंपरा उत्पन्नें देऊन नेमणुकाहि केलेल्या असतात. म्हणजे शास्त्रांत विधान आणि व्यवहारांत वतन असा मेळ हिंदुसमाजांत आहे.

भारत, रामायण व पुराणें यांतील अवतारी कथांत व आख्यानांत जेथें जेथें आनंदाचे प्रसंग आहेत तेथें तेथें वाद्यगजरांचें वर्णन मोठ्या बहारीचें आहे. जरासंध, कंस, रावण, शिशुपाल इत्यादि दुष्टांचा वध होतांच दुंदुभि वाजूं लागल्या. गंधर्व, तुंबर, किन्नर, गाऊं लागले, वाजवूं लागले. देव जयघोष करूं लागले. ऋषि पुष्पवृष्टि

करूं लागले; असें वर्णन पदोपदीं आढळतें. श्रीरामचंद्राचा जन्म झाला, श्रीकृष्णाचा अवतार झाला त्या वेळीं आनंदाचा परिस्फोट अनेक प्रकारच्या वाद्यांनीं केलेला आहे. मानसशास्त्रदृष्ट्या सूक्ष्म विचार केला तर असें दिसेल कीं, आनंदाचा दर्शक ध्वनि आहे. मनुष्य आनंदांत असला कीं गुणगुणूं लागतो, अवघड गणित सुटलें असें वाटलें कीं एकदम चुटकी वाजवितो व त्याला आनंददायक अशी एखादी गोष्ट वाटली कीं टाळी पिटतो. म्हणजे काय ? तर गुणगुणणें, चुटकी व टाळी या साधनांनीं तो आनंदच व्यक्त करितो. आनंदब्रह्म, नादब्रह्म व अन्नब्रह्म अशी ब्रह्मत्रयी आपल्या परंपरेंत आहे. वादनशास्त्रदृष्ट्या मनुष्याच्या बुद्धिमत्तेचा विकास वाद्यांत नाहीं काय ? अनेक प्रकारचे आवाज एका शास्त्रांत बसवून त्याचा स्फोट वाद्यांच्या द्वारें मनुष्य करतो ही कांहीं सामान्य गोष्ट आहे ? नुसत्या हाताची टाळी, दोन दगड घेऊन अगर टिपऱ्या घेऊन एकावर एक मारणें, बांबूला भोकें पाडून वायूच्या सहाय्यानें सूर काढणें असा उत्क्रांतिक्रम या वाद्यांत आहे. काष्ठ-वाद्यें, धातुवाद्यें, चर्मवाद्यें व अगदीं शेवटचीं तंतुवाद्यें असा विकास आहे. म्हणजे कोणत्याहि दृष्टीनें विचार केल्यास हिंदुसमाजांतील मिरवणुकी व त्यांतील वाद्यांचा गजर यांना कोणीहि समंजस मनुष्य हरकत घेणार नाहीं.

पण चमत्कार असा कीं, हिंदुस्थानांत हिंदूंना मिरवणुकी व वाद्यें या पायीं फार उपद्रव होत आहे. मुसलमानांच्या मुरवतीखातर वाद्यें बंद करा, मिरवणुकी काढूं नका, असें म्हणणारे पुढारी हे या विषयांत शास्त्रदृष्ट्या अत्यंत अनभिज्ञ होत. वाद्यांच्या प्रश्नाबाबत मुसलमान पुढारी जेव्हां मतप्रदर्शन करतात तेव्हां ते कांहींतरीच करतात. "मशिदीवरून वाद्यें वाजवूं नयेत किंवा नमाजाचे वेळीं वाद्यध्वनि नसावा अशा आज्ञा कुराणांत नाहींत, तसेंच हिंदुधर्मशास्त्रांतहि वाद्यें वाजवावींतच असें विधान नाहीं, असें बिनादिक्कतपणें मुसलमान पुढारी बोलतात व गयाळ हिंदूहि त्याचा अनुवाद करतात. कुराणामध्यें वाद्यांविरुद्ध विधान नाहीं, असेल तर तें मुसलमानांना असेल हें स्पष्ट आहे. पण हिंदुधर्मशास्त्रांत विधान नाहीं असें म्हणणें साफ चुकीचें आहे. हिंदूंनीं त्यांच्या परंपरेंत वेदांतशास्त्रदृष्ट्या, मानसशास्त्रदृष्ट्या, वाद्यें अवश्य आहेत म्हणून तीं वाजविलींच पाहिजेत व मोठ-मोठ्या मिरवणुकीहि काढल्या पाहिजेत. मुसलमानांच्या नमाजाला किंवा मशिदीला त्यांपासून उपद्रव होतो हें म्हणणें लुच्चेगिरीचें आहे. नमाज चालला असतांना मशिदीपुढच्या रस्त्यावरून गाड्याघोड्यांची वर्दळ, मोटारी, लॉऱ्या, स्टीमरोलर यांचे

हॉर्न, कर्कश शिव्या, चाकांचा दणदणाट, गाड्यांचा घडघडाट, यंत्रांचा गडगडाट, हा झालेला खपतो, पण हिंदूंच्या मिरवणुकींतील झांज, डफ, सूर व सनई हीं ऐकतांच डोकें फिरतें ही लुच्चेगिरी नव्हे काय ? हिंदूंना वाद्यें वाजवूं द्यावयाचीं नाहींत या हट्टानें मुसलमान वरचेवर आगळीक करतात. ताबुतांमध्यें पंजांपुढें वाद्यें चालतात त्या वेळीं मात्र नमाजांत कांहीं व्यत्यय येत नाहीं. तुर्कस्थान, इराण, इराक, अफगाणिस्थान इत्यादि देशांत मशिदीवरूनच काय पण मशिदीपुढें सारखीं दोनदोन तास वाद्यें वाजविलीं तरीहि बिघडत नाहीं. पण हिंदुस्थानांतच हा उपद्रव कां ? घोड्यांचें खिंकाळणें, गुरांचें हंबरणें, पक्ष्यांचें किलबिलणें, माणसांची बोलाचाल हीं सर्व मुसलमानांना सोसतात, पण हिंदूंचें वाद्य व मिरवणूक म्हटली कीं, त्यांचा मस्तकशूल उठतो यांतील इंगित काय आहे, हें लक्षांत घेऊन हिंदूंनीं स्वाभिमानदर्शक वाद्यें वाजवून मिरवणुकी काढल्याच पाहिजेत.

हक्काच्या दृष्टीनें हिंदूंच्या हिंदुस्थानांत वाद्याचा हक्क हिंदूंचाच नाहीं काय ? हिंदुस्थानांत हिंदु हे अनादि व अगोदरचे व मुसलमान उपरे व मागोदरचे हें तर खरें ना ? हिंदु आधीं कीं मुसलमान आधीं ? देवळें आधीं कीं मशिदी आधीं ? हा समंजस विचार हिंदूंपेक्षां मुसलमानांनीं करावा. व भलत्या गोष्टींमध्यें आग्रह धरूं नये. हिंदूंच्या हिंदुस्थानांत हिंदूंचें दहा हजार वर्षांचें अस्तित्व आहे. मुसलमानांनीं हजारबाराशें वर्षें राज्य केलें, एवढ्यानें हिंदु आपल्या अनादि हक्काला पारखे झाले असें मुळींच नाहीं. तात्पर्य, प्रत्येक देवालयांत, उत्सवांत व मिरवणुकींत वाद्यें वाजवून आनंदप्रदर्शन करण्याचा हक्क हिंदूंचाच आहे. तथापि मुसलमान आलेच आहेत, म्हणून व त्यांच्यावर मेहेरबानी म्हणून प्रत्येक गांवांतील एका प्रसिद्ध मशिदीपुढें हिंदूंनीं फक्त दुपारीं बारा साडेबाराच्या सुमाराला चार दोन मिनिटें वाद्यें वाजवूं नयेत हें योग्य होय. तशा प्रसिद्ध मशिदी एकदां ठरवून टाकल्या म्हणजे कटकट संपली.

मुसलमानांचा आजचा मशिदींचा उपक्रम मात्र कांहीं अजब आहे. झाडाला हिरवें निशाण बांधलें, घरावर निशाण फडकावलें, रस्त्यांत कोठें एखाद्या ठिकाणीं पिराचें थडगें उभारलें कीं झाली मशीद ! पुणें स्टेशनवर, कोल्हापूर येथील राजरस्त्यावर, नागपूर स्टेशनच्या रस्त्यावर आणि इतरत्रहि त्यांनीं पीरांचीं थडगीं उभारून वाद्यबंदीची जी पूर्वतयारी चालविली आहे तिकडे हिंदूंनीं डोळ्यांत तेल घालून लक्ष ठेवलें पाहिजे. नाहींतर या हिरव्या निशाणामुळें हिंदूंच्या

घरावर मशिदींची संक्रांत येईल ! हिरवें निशाण, थडगें, फकिराची बैठक, पीराचा उरूस व मशीद यांचा नवा उपक्रम दिसतांच हिंदूंनीं तो नष्ट करण्याचा उद्योग केला पाहिजे. कारण मुसलमानांचीं हीं साधनें हिंदूंना अपकार करण्याकरतांच असतात. सर्व हिंदूंनीं आपापल्या परिस्थितिप्रमाणें सुशिक्षित, अशिक्षित, स्पृश्या-स्पृश्य हा भेदाभेद न ठेवतां, मिरवणुकी काढाव्या, वाद्यें वाजवावीं व गाफिल मुळींच राहूं नये. कारण आजवरचा अनुभव असाच आला आहे कीं, सरकारी अधि-काऱ्यांनीं कितीहि बंदोबस्त ठेवला तरी मुसलमान दंगे करतातच. म्हणून पोलीस व अधिकारी यांवर मुळींच विश्वास न ठेवतां स्वावलंबनानें प्रतिकारसिद्धता ठेवावी. संगमनेर, पारोळा, सोलापूर, नागपूर, गोध्रा, सुरत या ठिकाणच्या मिरवणुकीच्या वेळीं काय अनुभव आले ? हिंदूंनो, तुम्ही हे अनुभव विसरणार काय ? असावध राहणार कां प्रतिकारासिद्ध राहणार ? मार खाऊन मरणार कां मारीत मारीत मर-णार ? हें आपल्या मनाशीं ठरवा. उत्सव व मिरवणूक यांत उत्साह आहे, जोम आहे, समाजाचें जीवन आहे, व तुमच्या धर्माचें रहस्य आहे. यास्तव अडाणी-पणा व फाजील शहाणपणा यांमुळें अनास्था न दाखवतां तत्परतेनें, दक्षतेनें, कर्तव्यबुद्धीनें, उत्साहानें मिरवणुकी काढा, मिरवणुकींत भाग घ्या, वाद्यें वाजवा असें तुम्हांस धर्मशास्त्रदृष्ट्या सांगणें आहे.

**समष्टिधर्माप्रमाणें गीता हा एकच हिंदूंचा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ होय.** त्या ग्रंथाचा प्रत्येक हिंदूला अधिकार आहे. गीतेंतील कर्मयोगाची अर्थात् राजर्षींची परंपरा हीच सर्व हिंदूंना शिकवावयास पाहिजे. प्रत्येक हिंदूनें समाजांत गीताग्रंथाचाच पुरस्कार व प्रसार केला पाहिजे. कारण हिंदु-समाजाचें कल्याण या ग्रंथांतील कर्मयोगाच्या तत्त्वानेंच होणार आहे, अशी समजूत प्रत्येक हिंदूची असावयास पाहिजे; आणि नसल्यास तिची शिकवण हिंदुसमाजास दिली पाहिजे. हिंदुसमाजांत शैव, वैष्णव, गाणपत्य, शाक्त, द्वैती, अद्वैती, विशिष्टाद्वैती, वारकरी, धारकरी, समर्थसांप्रदायी, नाथसांप्रदायी, दत्त-सांप्रदायी इत्यादि विविध सांप्रदायिक लोक असले तरी त्यांनीं आपली देवता, ग्रंथ, व सांप्रदाय यांचा आग्रह स्वतःपुरता घरींच ठेवावा. समाजांत तो आग्रह दाखविला तर दुसरा तितकाच आग्रही होऊन विग्रह होण्याचा संभव असतो. आपापल्या घरीं प्रत्येकाला देव, धर्म, पंथ इत्यादींचें स्वातंत्र्य आहे. परंतु घराबाहेर समाजोपयोगीच कल्पनांचा विस्तार व्हावयास पाहिजे. सामाजिक हिताकरितां व्यक्तीनें आपली

आवड आणि हौसहि क्षणभर बाजूस ठेवून समाजाच्या कल्याणाला पोषक असलेलीं तत्त्वेंच आत्मसात केलीं पाहिजेत. भारत, रामायण, भागवत, उपनिषदें, ज्ञानेश्वरी, दासबोध, गाथा, गुरुचरित्र, शिवलीलामृत हे ग्रंथ पुष्कळांच्या आवडीचे असतील व आहेत. त्यांच्याबद्दल आमचा अनादर आहे असेंहि समजण्याचें कारण नाहीं. या प्रत्येक ग्रंथांत बहुमोल तत्त्वसंपत्ति व सिद्धान्तसंपत्ति असली तरी समाजदृष्टीनें गीता, गीता, अशीच घोषणा प्रत्येक हिंदूचें तोंडून व्हावयास पाहिजे. गीताधर्म, गीताशास्त्र यांचा अभिमान प्रत्येक हिंदूस पाहिजे व तो आग्रहानें पाहिजे. श्लोक अगर श्लोकार्ध वाचणें, त्याचा विचार करणें, नित्य स्नानोत्तर गीतापाठ ठेवणें हें प्रत्येक हिंदूचें कर्तव्य आहे. गीता हा प्रत्येक हिंदूचा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे. तो साक्षात् भगवंताचे मुखानें प्रश्नोत्तररूपानें प्रगट झाला आहे. त्याचा अधिकार स्पृश्य, अस्पृश्य, ब्राम्हण, अब्राम्हण, स्त्रिया, पुरुष, बाल, वृद्ध अशा सर्वांना म्हणजे हिंदुमात्राला आहे. गीतेंतील भक्ति, तत्त्वज्ञान व कर्मयोग हीं अति उत्कृष्ट असल्यामुळें तीं जगाला शिकविण्याचा हिंदूंचा जन्मसिद्ध अधिकार आहे अशी अभिनिविष्ट बुद्धि हिंदूंमध्यें यावयास पाहिजे. इतकी पूज्य बुद्धि, आग्रही बुद्धि, अभिनिविष्ट बुद्धि केव्हांहि एखाद्याच ग्रंथाबद्दल असणें शक्य असतें. प्रत्येक ग्रंथाबद्दल इतका आदर असणें शक्य नाहीं, इष्ट नाहीं, आणि आवश्यकहि नाहीं. सारांश, समष्टिधर्माप्रमाणें प्रत्येक हिंदूचा गीता हा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ असल्यामुळें त्याचा प्रचार प्रत्येक हिंदूनें केलाच पाहिजे. बायबलाप्रमाणें गीतेचीं पुस्तकें फुकट वाटलीं पाहिजेत. घरोघरीं गीता दिसली पाहिजे आणि अगदीं मागसलेल्या किंवा खालच्या घरांतील हिंदूला—नव्हे अर्भकाला—पोराला गीता हा माझा ग्रंथ आहे, मी हिंदु आहें, गीता हा माझा ठेवा आहे. निधान आहे असें वाटलें पाहिजे.

**गोरक्षण**—समष्टिधर्म म्हणून प्रत्येक हिंदूनें गंगा, गीता, गायत्री व तुळस हीं पूज्य मानलीं पाहिजेत. त्यांतील गाय हें जीवंत व पवित्र जनावर आहे. गोरक्षण हें धार्मिक, सामाजिक, आरोग्य आणि राष्ट्रीय दृष्ट्या अवश्य आहे. हिंदुधर्मशास्त्रदृष्ट्या गोरक्षण हें मोठें धर्मकार्य असें म्हटलें आहे. प्राचीन काळापासून तों शिवाजीमहाराजांपर्यंत अनेक क्षत्रियांनीं स्वतः गोरक्षण करून लोकांकडून तें करविलें आहे. अकबर व हुमायून या मुसलमान राजांनीं

गोरक्षण केलें व महादजी शिंद्यांनीं तर दिल्लीपति मुसलमान बादशहांकडून गोवधाची बंदी करविली. आज हिंदुस्थानांत इंग्रज व मुसलमान असे दोघेहि गोभक्षक आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानांत दरसाल ५४००००० गाईबैल मारले जातात. मुंबईजवळच्या वांद्र्याच्या कत्तलखान्यांत ५० हजारांपेक्षां जास्त जनावरें प्रतिवर्षीं मारलीं जातात. १९२० सालीं ५४००० गाई हिंदुस्थानांत मारल्या गेल्या ! नुसत्या १०००००० जनावरांचें मांस गोऱ्या लष्करी खात्याला लागतें ! हा गोवध बंद करण्याचा यत्न कायदेकौन्सिलें व असेंब्लीमध्यें भांडून करावयास पाहिजे. गोरक्षण संस्थांच्या चालकांचें लक्ष व लोकांचेंहि लक्ष असा कायदा करून घेण्याकडे पाहिजे. कायद्यानें गोवधबंदी झाली कीं सरकारकडून जो भयंकर क्षय होत आहे तो थांबेल.*

सरकारच्या खालोखाल मुसलमान हे धर्माच्या नांवाखालीं गोभक्षण करून हिंदु लोकांस चिडवीत आहेत. डोळ्याआड होणाऱ्या शतशः गोवधापेक्षां डोळ्यासमोर होणारा एक गोवध हिंदूला फार चीड आणतो. हिंदूंनीं हें लक्षांत ठेवलें पाहिजेच कीं, मुसलमानी कुराणांत गोहत्या नाहीं, हिंदुस्थानांतल्या मुसलमानांनीं हिंदूंना चिडविण्याकरितां ही अरेरावी सुरू केली आहे. कुराणांत उंट, बकरा अगर मेंढा यांची कुरबानी करण्याची आज्ञा आहे. हिंदुद्वेष्ट्या हसन निजामीनेंहि गोवध करूं नये असें एक पत्रक नुक्तेंच काढलें होतें. अफगाणांचे एक अमीर हबिबुल्लाखान हे पूर्वीं दिल्लीस आले होते. त्या वेळीं बकरीदचा सण होता. मुसलमानांनीं शेंकडों गाई त्या वेळीं मारण्याची सिद्धता केली होती. परंतु अमीरसाहेबांनीं हें धर्मविरुद्ध आहे असें स्पष्ट कळविलें व तें बंद केलें. म्हणजे मुसलमानी धर्मशास्त्रांत जें नाहीं व मुसलमान बादशहांना आणि अमिरांना जें मान्य नव्हतें व नाहीं तें करून मुसलमान आगळिक करितात. अर्थात् तिचा प्रतिकार हिंदूंनीं ठिकठिकाणीं केलाच पाहिजे.

हा प्रतिकार आमच्या मतें दोन प्रकारांनीं करावा. मुसलमान मशिदींत गाय कापतात असें कळलें कीं, डुकर कापण्याची तयारी पाहिजे. गाईच्या खरजेवर डुकराच्या मलमाचाच रामबाण उपाय पाहिजे. देवळांत गोमांस टाकल्यानें जेवढें तें अपवित्र होतें तेवढीच वराहमांसानें मशीदहि अपवित्र होते !

---

* नुक्ताच गोवधबंदीचा ठराव असेंब्लीमध्यें नापास झाला !

मुसलमानांत जोंवर चीड आणण्याकरितां गोवध करण्याची वृत्ति आहे तोंवर वराहाच्या वधानें उट्टे फेडण्याची वृत्ति हिंदुसमाजांत नसली तरी कांहीं काल आणली पाहिजे. दुसरा प्रकार असा कीं, गोरक्षणसंस्थांनीं या शुद्धिकार्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. गाई सोडविणें, गोरक्षणाचा प्रचार करणें, लोकांनीं गाई बाळगणें, लोकांकडून गोरक्षणार्थ पैसा मिळविणें या सर्वांपेक्षां गोभक्षकांना व हतकांना हिंदु करून घेण्याचा यत्न गोरक्षण संस्थांनीं केला पाहिजे. गायखाऊ लोकांना सायखाऊ करणें हा त्यांजवर उपकार करणेंच आहे. गोवध करणारे जे लोक आहेत त्यांना हिंदु करणें हेंच खरें गोरक्षण आहे. एक गोभक्षक संबंध आयुष्यांत ३ ते ५ गाई मारतो असें प्रमाण धरिलें तर त्याला हिंदु करण्यांत ५ गाईंचे प्राण वांचविल्याचें पुण्य मिळतें. यास्तव गोरक्षणार्थ गोहतकांना हिंदु करून घेतलें पाहिजे. त्यायोगें हिंदुधर्माची सेवा, गोभक्षकांचा उद्धार आणि गोरक्षण अशीं तीन कार्यें एकसमयावच्छेदेंकरून होतील.

हिंदुसमाजांत पुष्कळ सण आहेत. व ते पुष्कळ आहेत म्हणूनच सामुदायिक दृष्ट्या ते पाळले जात नाहींत. वर्षप्रतिपदा, गणेशचतुर्थी, विजयादशमी, नागपंचमी, व मकरसंक्रमण **एवढे तरी सण हिंदु स्त्रीपुरुषांनीं समष्टिधर्म म्हणून सामुदायिक** पद्धतीनें पाळले पाहिजेत. वर्षप्रतिपदेस हिंदुसमाजाचा वार्षिक आढावा घेऊन पंचांगश्रवण व लिंबलोण हे विधि मोठ्या समारंभानें व्हावेत. विजयादशमीच्या सणाचें सामाजिक व राष्ट्रीय दृष्ट्या फारच महत्त्व आहे. सीमोल्लंघनाच्या मिरवणुकींत सर्व हिंदूंनीं समाविष्ट होऊन वर्षांतला हा एक फार मोठा दिवस असें स्वरूप यावें. सीमोल्लंघन, व्याख्यान, एकमेकाला सोनें देणें, हे कार्यक्रम, प्रेम, ऐक्य व सहकार्य हे गुण वाढविण्याला फारच उपयुक्त आहेत. हिंदुसमाजांतील सर्व घटकांत अधिक दळणवळण वाढविण्याकरितां सणांचा उपयोग आहे. अशिक्षित जनतेला सणाचें रहस्य कळत नाहीं व सुशिक्षित माणसाला महत्त्व वाटत नाहीं, त्यामुळें संघटनेला जोर येत नाहीं, हें अनिष्ट होय.

**सत्पात्रीं दान**—समष्टिधर्माप्रमाणें सत्पात्रीं दान करणें हें हिंदुसमाजाचें कर्तव्य आहे. प्रत्येक हिंदूनें आणि हिंदुसमाजानें आपली आर्थिक उन्नति अवश्य करून घ्यावी. परंतु आर्थिक उन्नतीबरोबरच समाजोन्नतीकरितां प्राप्तींतील कांहीं भाग देणें अवश्य आहे. रुपयामागें पैसा आणा अगर याहिपेक्षां अधिक भाग सत्पात्रीं दानाकडे खर्च झाला पाहिजे. हिंदुसमाजाजवळ आज पैसा नाहीं असें नाहीं व

त्याजकडून दानधर्म होत नाहीं असेंहि नाहीं. परंतु आमच्या मतें सत्पात्रीं दान होत नाहीं व श्रीमंत हिंदूंच्या पैशाचा उपयोगहि समाजहिताचे दृष्टीनें योग्य होत नाहीं. श्रीमंत शेठसावकारांचे पैसे खटले, कोर्टें, भांडणें, यांतच नाहींसे होतात. पुष्कळांचा पैसा कडाक्यानें लग्नें लावण्यांत थाटमाट, बँड व दारू यांत खर्च होतो. वऱ्हाडखानदेशांतील ब्राह्मणेतर पाटील पटवाऱ्यांचा पैसा गंधर्व लावण्यांत व रगडून दारू पिण्यांत खर्च होतो ! तर मुंबईच्या भाट्यांचा पैसा जनावरांना जिलब्या चारण्यांत खर्च होतो. वकील व डॉक्टर लोकांचा पैसा मोटारी, बंगले व साहेबी थाटाची चैन यांत खर्च होतो ! मामलेदार, मुनूसफ, जज्ज यांतील जे थोडे आस्तिक बुद्धीचे असतात त्यांचा पैसा गुरूचे मठ चालविण्यांत, गुरूंना दक्षिणा देण्यांत, शिष्यांना भोजनें घालण्यांत खर्च होतो ! संपन्न व निपुत्रिक मनुष्य असला कीं त्याला एखादें देवालय बांधण्याची हुक्की येते. पिढीजाद धनिकांचा पैसा नसतीं छानछोकी, नसता डामडौल करण्यांत, विदेशी पेहेराव आणि तऱ्हा यांचें अनुकरण करण्यांत खर्च होतो. तात्पर्य, श्रीमंत काय मध्यम काय व सामान्य काय, काटकसरीनें, हिशेबानें, कांहीं पद्धतीनें वागून योग्य ठिकाणीं कोणीहि दानधर्म करीत नाहीं. यापुढें हिंदुसमाजानें आपल्या दानधर्माचा ओघ अनाथालयें, विधवाश्रम, रुग्णालयें, शुद्धिसभा, अस्पृश्योन्नति यांकडे वळविला पाहिजे. महाराष्ट्रांत द्रव्य देणारा वर्ग थोडा, तो ठराविक व संस्था फार, अशी स्थिति आहे. संस्थांना कितीहि दिलें तरी पुरत नाहीं. दान देतांना देश, काल व पात्र यांचा विचार अवश्य करावा लागतो. हिंदुसमाजावर आज मोठी आपत्ति आहे, म्हणून ज्यांना बारा वर्षे होऊन गेलेलीं आहेत अशा जुन्या संस्थांकडे थोडा कानाडोळा करून हिंदुसमाजोद्धारक नवसंस्थांना पैसा पुरवला पाहिजे.

हिंदुसमाजाला समर्थ करण्याकरितां मिशनरी व मुसलमान मौलवी यांच्यासारखे आटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. हिंदुस्थानामध्यें मिशनऱ्यांनीं साक्षरतेच्या शाळा, रात्रींच्या शाळा, हायस्कुलें, कॉलेजें, रुग्णगृहें, दवाखाने अशा विविध संस्था काढून केवढे उद्योग चालविले आहेत, त्यांचें विवेचन ' चढाईचें शुद्धिकार्य ' या प्रकरणांत केलें आहेच. येथें इतकेंच सांगावयाचें कीं, अनेकविध उद्योगांनीं ते लोक लोकांवर उपकार करतात. तशा उपकारक अनेक प्रकारच्या संस्था हिंदुसमाजानें काढल्या पाहिजेत व तिकडे आपला द्रव्यौघ वळविला पाहिजे.

**दोन नमुनेदार संस्था**–नागपूर येथें अनाथ मुलांकरितां अनाथालय नांवाची संस्था तेथील पुढाऱ्यांनीं चार वर्षांपूर्वी काढली आहे. ती संस्था पाहिल्यावर लहान मुलांवर मुसलमान व ख्रिश्चन यांचें आक्रमण कसकसें होत आहे हें पाहून चिंता उत्पन्न होते. ब्राह्मणापासून अस्पृश्यापर्यंत सर्व जातींचीं मुलें त्यांच्या तडाक्यांत सांपडतात. कुणाला गुरें राखतांना पळवून नेण्यांत येतें तर कोणाला पोरासोरांत खेळतांना 'सुंता करून घे व शेंडी काढ' असें दाटून सांगण्यांत येतें. कोणाला बुद्धिपुरःसर भाकरीतुकडा खावयला देऊन "तूं अमक्याच्या हातचें खाल्लेंस, तुला घरीं घेणार नाहींत" अशी थाप देऊन परस्पर नेण्यांत येतें; तर कांहीं मुलें घरांतून बाहेर पळून गेलेलीं दिसतांच त्यांच्यावर झडप घालण्यांत येते. अनेक प्रकारच्या भल्याबुऱ्या उपायांनीं विधर्मी लोक हिंदुसमाजावर हल्ले करीत आहेत म्हणून अशा संस्थांची फार जरुरी आहे.

**श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम**--ही मुंबईची अत्यंत उपयुक्त संस्था आहे. बॅ. जयकरप्रभृति पुढाऱ्यांनीं चालविलेली ही संस्था यंदा आम्ही नुक्तीच पाहिली. या संस्थेंत १९२८।२९ सालांत मिळून ७०।८० स्त्रिया आश्रयार्थ आल्या. महाराष्ट्रीय, पंजाबी, गुजराथी, कनोजी, गौड अशा ब्राह्मण जातींच्या व अस्पृश्य, मराठा, वाणी, शिंपी, कासार, कोळी, भंडारी, नायडू वगैरे सुमारें ४० जातींच्या स्त्रिया आश्रमांत आल्या. गुजराथ, मद्रास, बडोदा, पतियाळा, संयुक्त प्रांत अशा महाराष्ट्राबाहेर निरनिराळ्या प्रांतांतील स्त्रियाहि या संस्थेंत आल्या. या ७०।८० स्त्रियांचे जे इतिहास संस्थेमध्यें लिहून ठेविलेले आहेत ते वाचले म्हणजे आंगावर रोमांच उभे राहातात, डोळ्यांतून अश्रू येतात व हिंदुसमाजामध्यें स्त्रियांवर कोणकोणते अत्याचार होत आहेत हें पाहून छाती फाटून जाते. कांहीं अबलांना घरांत नवरा, सासरा, दीर, सासू यांच्याकडून इतका त्रास होतो कीं, तो असह्य होऊन त्या मुसलमानाकडे पळून जातात ! कांहीं हलक्या जातींतील लोक आपल्या स्त्रियांना पैशाकरितां वेश्याव्यवसायांत घालतात, तर कांहीं पठाणाकडे पाठवितात, तें त्यांना असह्य होऊन त्या पळून जातात व मग आश्रमांत आश्रयाला येतात. नवरा मेल्यावर एकदोन मुलांच्या मध्यम वयाच्या विधवा कोणाच्या तरी आश्रयाला गेल्या म्हणजे दीर, मामा अगर इतर आप्त हे तिजजवळचें असेल नसेल तें लुबाडून तिची अब्रू घेऊन गरोदर होतांच तिला घरांतून हाकलून देतो. अशा बिचारीला आश्रमाशिवाय आश्रय कोठें मिळणार ? कॉलेजांतील

उत्साही, ध्येयवादी पण महामूर्ख असे तरुण विद्यार्थि एखाद्या तरुण विद्यार्थिनीशीं रत होतात आणि ती गरोदर होतांच माणुसकी सोडून वागूं लागतात. अर्थात् अशा पतित कुमारिका या संस्थेकडे आश्रयार्थ येतात. साधूंच्या नादीं लागून फसल्यामुळें तर यात्रेस गेल्यावर तेथील पंड्यांनीं अत्याचार केल्यामुळें कांहीं अबला या संस्थेंत आलेल्या आहेत. नवऱ्यांनीं बदकर्मे करावींत, व्यसनांत पैसा घालवावा व घरांतील बायकांना झोडपावें व हाकलून द्यावें अशा स्त्रियांनीं असल्या संस्थेशिवाय जावयाचें तरी कोठें? असे एक ना दोन प्रकार. वाचकांनीं ती संस्था अवश्य पाहावी, स्त्रियांचे इतिहास काळजीपूर्वक वाचावे व या चुकलेल्या गाईंना जेथें आश्रय मिळतो त्या संस्थेला मदत करण्यांत पैसा खर्च करावा असें आम्ही आग्रहानें सांगतों.

मोठा चमत्कार हा कीं, कोणत्याही हिंदु स्त्रीला घरांत घालण्याला मुसलमान हा जेथें तेथें सिद्ध असतो. हिंदूंतल्या डांबरट माणसालासुद्धां अशा चुकलेल्या गाईला घरीं ठेवण्याला त्याच्या स्नेह्यांची, जातीची व समाजाची भीति वाटते. पण मुसलमानाला या कामीं धर्माचें व समाजाचें पाठबळ असल्यामुळें तो निर्भय असतो. उदाहरण म्हणूनच दोन संस्थांचा निर्देश येथें केला आहे. हिंदुसमाजानें अशा संस्थांना, हिंदुसमाजाकरितां काम करणाऱ्या लोकांना, पुस्तकें, मासिकें, वृत्तपत्रें, व्याख्यानें, यांद्वारें जागृति करणाऱ्या लोकांना या वेळीं सढळ हातानें मदत केली पाहिजे. अशी मदत समष्टिधर्म म्हणून हिंदुसमाज या वेळीं जर न करील तर फारच कठीण प्रसंग आहे. इतर समाज काय करीत आहेत, त्यांच्या हालचाली काय आहेत, आपले लोक काय करितात, आपले पुढारी काय बोलतात, हें सर्व पाहून समाजाला उपकारक अशा सत्पात्रींच हिंदुसमाजानें पैसा दिला पाहिजे आणि सत्पात्रीं दान करून समाजाला वांचविलें पाहिजे.

# प्रकरण नववें

## समाजबलविचार

### समष्टिधर्म (पुढें चालू)

समष्टिधर्मांतील कांहीं तत्त्वांचें निरूपण गेल्या प्रकरणांत झालें. प्रस्तुत प्रकरणांत तोच विषय पूर्ण करितों.

समष्टिधर्माचें तत्त्व म्हणून हिंदुसमाजाच्या पापपुण्याच्या कल्पनाहि समष्टिधर्मानुकूल बनल्या पाहिजेत. कारण, वैयक्तिक पापपुण्य निराळें. वैयक्तिक क्षेत्र संकुचित, अतएव त्या अल्प क्षेत्रांतील पापपुण्याच्या कल्पना ह्या वेगवेगळ्या पाहिजेत. समाजाला अपकार ज्यायोगें होईल असें पातक हिंदूनें करूं नये. उपकार होईल असेंच पुण्यकर्म करावें. समाजोपयुक्त कार्य हें पुण्य व अनुपयुक्त अर्थात् अपकारक जें कार्य तें पाप अशीच पापपुण्याची व्याख्या हिंदुसमाजानें करावयास पाहिजे. ही समष्टिधर्माची व्याख्या कांहीं नवीन करावयास नको किंवा शोधावयास नको. व्यासमहर्षींनीं सर्व पुराणांचें सार म्हणूनच ही व्याख्या सांगितली आहे.

**अष्टादश पुराणानां सारंसारं समुध्दृतम् ।**
**परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥**

समाजावर उपकार हें पुण्य व अपकार हेंच पाप. तुकाराममहाराज याचाच अनुवाद करितात, “ पुण्य उपकार पाप तें परपीडा । आणिक नाहीं दुजा जोडा यासी ॥ ” उपकार आणि अपकार या समाजोपयोगी पापपुण्याच्या व्याख्या नवीन आहेत असें नाहीं, त्या जुन्याच असून चांगल्या आहेत. फक्त त्यांचा हल्लींच्या परिस्थितीप्रमाणें उपयोग करण्याचें शिक्षण आणि शहाणपण हिंदुसमाजाला दिलें पाहिजे.

**पापपुण्याच्या कल्पना मुख्य तत्त्व लक्ष्यांत ठेवून परिस्थितीप्रमाणें बदलल्या पाहिजेत.** कारण त्या आजपर्यंत बदलतच आल्या आहेत. एका काळीं मोठा यज्ञ करणें हें पुण्य होतें तर पुढें मोठें देवालय बांधणें हें पुण्य आहे असें समजण्यांत आलें. कारण त्या त्या काळाला या दोन्ही गोष्टींची जरुरी

होती. सत्पात्र ब्राह्मण सांगून श्राद्ध करावें, तें न जमल्यास चटश्राद्ध करावें, तेंहि न जुळल्यास प्रेताच्या उद्देशानें खाण्याचा कांहीं पदार्थ किंवा तो विकत घेतां येईल इतकें द्रव्य द्यावें, अशा श्राद्धाच्या व्याख्या परिस्थितीप्रमाणें करण्यांत आलेल्या आहेत. त्या सर्व त्या त्या काळीं रूढ होत्या. यज्ञसंस्थेचा जोरानें प्रचार होता, त्या वेळीं यज्ञांत पुण्य समजलें जाई. पुढें स्मार्ताग्नी ठेवण्यांत आणि त्याहीपुढें घरींच पंचमहायज्ञ यथाशक्ति करण्यापर्यंत मजल आली व त्या सर्वांत पुण्याचा अंश एकच आहे असें समजण्यांत आलें. सारांश, कालमानाप्रमाणें पाप-पुण्य व धर्माधर्म यांच्या कल्पना बदलत असतात. सहस्रब्राह्मणभोजनाचें जें पुण्य असतें किंवा तसें भोजन घालण्यांत जो आनंद आहे, तोच आनंद आज शुद्ध करून परत हिंदुधर्मांत घेतलेल्याला पंक्तिपावन करण्यामध्यें आहे. अर्धहिंदूंना पूर्ण हिंदु करण्यांत, अहिंदूंना हिंदु करण्यांत व त्यांना मिष्टान्नभोजन देण्यांत आज महत्पुण्य आहे. कारण शुद्धिकार्य हें समाजाला आज अत्यंत उपयुक्त आहे. हिंदुसमाजाचा पैसा आज हिंदुसमाजाच्या उपयुक्त कार्याकडेच खर्च झाला पाहिजे. हिंदुसमाजाच्या ज्या दान, पुण्य आणि पावित्र्य यांच्या कल्पना आहेत त्या सर्व हिंदुसमाजाला उपयुक्त होतील असेंच त्यांना वळण आतां लाविलें पाहिजे. सर्वांभूतीं भगवंत म्हणून अपकाऱ्यावरहि उपकार करणें व दया करणें हें एका वेळीं पुण्य समजलें जाई. परंतु तशा लोकांना दूध पाजण्याचें कार्य हें केवळ समाजाला अपकारक असें अनुभवानें ठरल्यामुळें तें आज करणें महापातक आहे. देवळें बांधणें, सहस्रभोजनें घालणें यांपेक्षां निरक्षरांना साक्षर करण्यांत पुण्य अधिक आहे.

आज पुण्यकर्म म्हणून कोणी देवालय बांधूं लागेल तर तें समाजाला अत्यंत जाचक आहे व पाप आहे. कारण आधींच देव पुष्कळ आणि देवळेंहि पुष्कळ ! त्यांतल्या त्यांत पुष्कळ देव असे बेवारसी पडले आहेत कीं, त्यांच्या पूजेअर्चेलाहि पत्ता नाहीं. पोरके व परदेशी देव पडलेले पाहिले आणि त्यांची दुर्दशा पाहिली कीं, या देवांचें विसर्जन कां करून टाकूं नये असें मनांत येतें. कारण वेद-मंत्रांनींच त्यांची प्राणप्रतिष्ठा केलेली आहे आणि वेद-मंत्रांनींच त्यांचें विसर्जन कर्तव्य आहे. ज्या समाजाला आपल्या देवांचें रक्षण करितां येत नाहीं त्या समाजाचेंहि रक्षण देव करूं शकत नाहीं. धर्माचें रक्षण केलें कीं, धर्म माणसांचें रक्षण करितो. ' **धर्मो रक्षति रक्षितः** ' असें

शास्त्रवचन आहे. देवांचें रक्षण समाजानें केलें तरच देव त्या समाजाच्या रक्षणाला धांवतील असें कां न म्हणावें ? कारण " **परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ** " असें गीताशास्त्र सांगतें. पूर्वीचा काळ असा होता कीं, त्या वेळीं देवळें बांधणें हें समाजोपयोगी कार्य-पुण्यकार्य--असें समजलें जात असे. परंतु, आतां देवळें बांधणें हें पापकर्म आहे असें म्हणण्याची पाळी आली आहे ! कुणी तरी उपटशुंभानें वैयक्तिक समाधानाकरितां देवालय बांधिलें व त्या देवळांतील मूर्तीचा संरक्षणाच्या अभावीं भंग झाला तर त्याबद्दल सर्व समाजाला मान खालीं घालण्याचा प्रसंग येत आहे. तो टाळावयाचा असेल तर नवीं देवळें नकोत आणि नव्या प्राणप्रतिष्ठाहि नकोत. आहेत त्यांतीलच कांहीं देव कमी करून दर पंचवीस हजार वस्तीला एक देव आणि एकच देवालय करण्याची आतां वेळ आली आहे. पुष्कळच देव आणि देवळें झालीं कीं, त्यांची आबाळ होते. परंतु ते थोडेच असले म्हणजे अपूर्वाईनें त्यांचें महत्त्व वाढतें. कित्येक गांवांत पुष्कळ देवळें दिसतात. कित्येकांच्या घरीं पाटीपाटी देव असतात ! इतका विस्तार हा पावित्र्याच्या व श्रद्धेच्या दृष्टीनें अत्यंत अनुचित होय. फार देव व पुष्कळ देवालयें झाल्यानें बहुसंख्य देवांवर भार टाकून स्वस्थ बसण्याची हिंदुसमाज वाटच पहात बसला आहे. म्हणून नवीं देवालयें बांधण्याचें सामाजिक पाप कोण्याहि हिंदूनें* करूं नये.

समष्टिधर्मातील एक तत्त्व असेंहि आहे कीं, हिंदुसमाजानें आपल्या स्वर्ग-नरकांच्या कल्पनाहि बदलल्या पाहिजेत. व्यक्तीचा स्वर्ग, नरक, मोक्ष यांबद्दल हिंदुसमाजांत अनेक कल्पना आहेत. त्या श्रौत, स्मार्त आणि पौराण कल्पना समष्टिधर्माला फारशा उपयुक्त नाहींत. व्यक्तीचा स्वर्ग व मोक्ष अगदीं स्वतंत्र असून त्याकरितां प्रत्येक व्यक्ती सुटी व स्वतंत्र आहे. परंतु समाजाच्या स्वर्ग-नरकाचा विचार हिंदुमात्रानें केला पाहिजे. हिंदुसमाजांत समाजाच्या स्वर्ग-नरकाचा विचार फारसा कुणी करीत नाहीं. जो तो स्वतःच्या स्वर्गनरकाच्या कल्पनेंत अगदीं गुंग झाला आहे असें दिसतें. परंतु समाज जर नरकांत असेल, म्हणजे परवशतेंत असेल तर व्यक्तीला स्वर्ग कसा मिळेल ? समाजाचा नरक परवशता हा आहे. " **को नरकः परवशता** " असें श्रीशंकराचार्य म्हणतात.

---

* देवालयाविषयीं विस्तृत विवेचन ' आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष, पूर्वार्ध, प्रकरण ९ ' या आमच्या ग्रंथांत पाहा.

**परवशताचि निरयगति जाणुनि तूं संग सोडुनी सरक** । असें याचें भाषांतर कवि मोरोपंत यांनीं केलें आहे. जो समाज पारतंत्र्यांत आहे, ज्यावर इतर समाज आघात करीत आहेत, जो समाज इतरांच्याकडून नेहमी अपमान करून घेत आहे अशा निरयापन्न झालेल्या समाजाला वर काढणें हाच खरा धर्म आहे. हिंदुसमाजाला या अधोगतींतून वर उचलणें हा स्वर्ग आहे, हा सामाजिक स्वर्ग आहे असें समजावयास नको काय ? ज्या समाजांत फूट, वैमनस्य, मत्सर आहे तो समाज नरकांत आहे आणि ज्या समाजांत एकोपा, जूट, शिस्त, प्रेम आणि सहकार्य हीं आहेत तो समाज स्वर्गांत आहे असें हिंदुसमाजानें पक्कें लक्षांत ठेवलें पाहिजे. **सुखविशेषः स्वर्गः** अशी स्वर्गाची व्याख्या तंत्रवार्तिकांत श्रीकुमारिल भट्टांनीं केलेली आहे. तीच सामाजिक स्वर्गाची चांगली व्याख्या आहे. एक विचार, एक ध्येय, एक भावना, एक स्फूर्ति, एक श्रद्धेय आणि एकच द्वेष्य समाजापुढें असतें तेव्हां तो समाज बलवान् होतो; आणि विशेष सुख अनुभवितो. अतएव तो स्वर्गांत असतो असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. हिंदुसमाज हा सुखविशेषांत गेला पाहिजे. जिकडे तिकडे उत्साह, आनंद, हुरूप, स्फूर्ति, तडफ, धडाडी यांचें बाहुल्य दिसलें पाहिजे. समाजांत जर हे गुण नसतील तर तो नरकांतच आहे असें समजून चाललें पाहिजे. हिंदुसमाजांत जातिमत्सर, वर्णमत्सर अस्पृश्यता इत्यादि दुर्गुण आहेत, त्यामुळें हिंदुसमाजाचें समाजबल वाढत नाहीं. तसेंच कांहीं दुर्गुण असे आहेत कीं, ते मनोदौर्बल्य उत्पन्न करीत आहेत. या सर्वांची हकालपट्टी करून हिंदुसमाजाला स्वर्गस्थिति प्राप्त करून दिली पाहिजे. हिंदुसमाजाचें लक्ष आतां सामाजिक स्वर्गाकडे पाहिजे. समाजाची स्थितीच अशी दिसते कीं, आतां व्यक्तींनीं वैयक्तिक स्वर्गाच्या कल्पना बाजूस ठेवून सामाजिक बळ वाढविण्याचें कार्य करण्यांतच स्वर्ग मानला पाहिजे. धृत्युत्साहसमन्वित होऊन निरभिमानवृत्तीनें अखंड कार्यतत्पर राहाणें व कार्यांत मग्न असतां तोच वैयक्तिक स्वर्ग आहे असें समजणें हें प्रत्येक हिंदूचें कर्तव्य आहे. सामाजिक स्वर्गाकरितां वैयक्तिक स्वर्गहि कार्यरूप बनवून निधड्या छातीनें उद्योग केला पाहिजे.

समष्टिधर्माप्रमाणें हिंदुसमाजांतील सर्व जाती हिंदुसमाजाच्या धारणापोषणाच्या दृष्टीनें सारख्याच योग्यतेच्या आहेत. **जन्मतः कोणतीहि व्यक्ति अगर जाति उच्च नाहीं आणि नीच नाहीं; तशीच ती स्पृश्य नाहीं आणि अस्पृश्य नाहीं.** जन्मानें प्रत्येक मनुष्य सारखाच आहे, प्रत्येक जातहि

सारखीच आहे. प्रत्येक मनुष्याची किंमत ही त्याची विद्या, शील, कर्तृत्व, गुण आणि संपत्ति यांवरून ठरवावयाची असते. या गुणांनीं कोणीहि मनुष्य श्रेष्ठ होतो व तदभावीं कनिष्ठ होतो. हिंदुसमाजांत पुष्कळ जाति आहेत. त्यांमध्यें शैक्षणिक, सांस्कृतिक, आचाराविचाराविषयक अंतर पुष्कळच आहे. परंतु यापुढें अनेक कारणांनीं तें अंतर कमी होत आहे. यास्तव आपण सर्व हिंदु आहोंत, हिंदूंची प्रजा आहोंत, हेंच ज्ञान समष्टिधर्माच्या दृष्टीनें समाजाला मिळालें पाहिजे. हिंदुसमाजांत जन्मतः उच्चनीचपणाच्या कल्पना आहेत व त्या एकदम जाणें कठीण आहे. तथापि प्रत्येकानें घरांत स्वतःला पाहिजे तितकें उच्च समजावें. परंतु घराबाहेर तो विचार प्रगट करूं नये. हिंदूंतील प्रत्येक जातीला नव्हे, प्रत्येक मनुष्याला आपल्या वाडवडिलांचें तप, त्याग, विद्या, उद्योग, शोध, पराक्रम, कर्तृत्व, व्यापार, सेवा, इत्यादि गुण आठवून त्याप्रमाणें स्वतः होण्याकरितां प्रयत्न करण्याचा हक्क आहे. त्या प्रयत्नाला पूर्वस्मरणाची स्फूर्ति वरचेवर मिळावयास पाहिजेच असते. म्हणून घरांत जातीचें, वर्णाचें, कुळाचें स्मरण ठेवावें व तें स्वतःच्या उन्नतीला साधक म्हणून ठेवावें; घराबाहेर त्यांचें स्मरण हें समाजोन्नतीला बाधक असतें म्हणून तें समाजांत न आणावें.

जन्मतः उच्चनीचपणा सोडण्याचा त्रास हा हिंदुसमाजांतील सर्वांना सारखाच होणार आहे. कारण प्रत्येक हिंदु स्वतःला इतरांपेक्षां उच्च समजतो. अशी जरी स्थिति असली तरी या कल्पना आतां सर्वांनींच सोडल्या पाहिजेत. ब्राह्मण–अब्राह्मण, ब्राह्मणब्राह्मणेतर, स्पृश्यअस्पृश्य, अस्पृश्य आणि अस्पृश्येतर अशा सर्व हिंदूंनीं जन्मप्रमुख, जन्मावलंबी, जन्मपुरस्कृत उच्चनीचपणाच्या कल्पना सोडून कर्तृत्वप्रमुख, कर्तृत्वावलंबी, कर्तृत्वपुरस्कृत अशा त्या केल्या पाहिजेत. हिंदुसमाजाला उपकारक असें जो वर्तन करितो तो श्रेष्ठ व अपकारक अशी वर्तणूक जो करितो तो कनिष्ठ. हिंदुसमाजाला उपयोगी असें ज्याचें वर्तन, विद्या, शील असेल तो मनुष्य श्रेष्ठ, मग तो कोणत्याहि नांवाचा असो वा पंथाचा असो. परंतु हिंदुसमाजाला घातक, विघातक, अपकारक व हानिकारक असा जो वागेल तो वरील गुणांनीं जरी मंडित असला तरी त्याला अस्पृश्य समजण्याची तयारी हिंदुसमाजानें केली पाहिजे.

जन्मतः उच्चनीचपणाच्या कल्पना हिंदुसमाजांतच आहेत असें नाहीं. जगांतील सर्व समाजांत या कल्पना थोड्याबहुत प्रमाणांत आढळतात. विशेषतः

जेता समाज हा जित समाजाला स्वतःपेक्षां सर्व दृष्टींनीं तुच्छ लेखीत असतो. जित हा कितीहि चांगला असला तरी तो जित असल्यामुळें जन्मानें सुद्धां हीन असतो व जेता हा केवळ जेतेपणानें सर्व बाबींत उच्च आहे असें भासवीत असतो. हिंदुसमाज हा जित, सर्वस्वीं जित, आत्यंतिक जित असा झाल्यामुळें त्याला आपापसांत आतां उच्चनीचपणा जन्मानें ठेवण्याचें कारणच उरलें नाहीं. शिवाय या लोकशाहीच्या परिस्थितींत ती कल्पनाहि टिकणें अशक्य आहे. अतएव आपण सर्वच हिंदु जित आहोंत, सर्वांनीं मिळून परकीय समाजाच्या व परकीय राज्याच्या आघातांना तोंड द्यावयाचें आहे अशा भावनेनें यापुढें वागावें. अनेक दृष्टींनीं विचार केला तरी जन्मावलंबी उच्चनीचपणाची कल्पना या युगांत आतां उपयोगी नाहीं.

कोणत्याहि समाजाच्या दोन अवस्था असतात, एक गतिशील आणि दुसरी स्थितिशील. समाज हा स्थितिशीलतेमध्यें असला कीं, तेथें जन्मावलंबी कल्पना पुढें येतात. आणि तसें त्या वेळीं होणें सोयीचें असतें. परंतु पारध व मेंढपाळ या अवस्थांमध्यें समाज गतिशील असतो. त्या वेळीं जन्मावलंबी कल्पना येतच नाहींत. कृषिप्रधान समाज स्थितिशील असतो, त्या वेळीं जन्मावलंबी कल्पना पुढें येतात. परंतु औद्योगिक जगांत किंवा युगांत त्या कल्पना कोणत्याहि समाजांत राहात नसतात. हिंदुस्थान देशांतील हिंदुसमाजाला यापुढें औद्योगिक क्षेत्रांत प्रवेश करावयाचा आहे म्हणून जुन्या जन्मप्रमुख कल्पना उराशीं बाळगण्यांत अर्थ नाहीं. जन्मावलंबी अस्पृश्यता हिंदुसमाजांत उपयोगी नाहीं, म्हणून अस्पृश्यतेचें उच्चाटन केलेंच पाहिजे. दुष्टपणा, भयंकर रोग, समाज व राष्ट्रद्रोह आणि दुर्वर्तन यांमुळें व्यक्तीला अस्पृश्यता येते असें तत्त्व समाजांत रूढ झालें पाहिजे.

कोणत्याहि हिंदु स्त्रीपुरुषानें पिराफकिरांचे नादीं लागूं नये, अहिंदु साधूंस व देवतांस भजूं नये, उरुसास जाऊं नये व ताबुतांत मुळींच भाग घेऊं नये, अशी समष्टिधर्मांतील एक आज्ञा आहे. ही आज्ञा प्रत्येक हिंदूनें प्रत्यक्ष कृतींत आणलीच पाहिजे. मोहरमच्या सणांत मुसलमान गुंडांच्या वृत्ति अगदीं बेताल झालेल्या असतात आणि त्याच वेळीं मोठमोठे दंगे होतात हें सर्वश्रुत आहे. यास्तव हिंदूंनीं गाफील न राहातां मोठ्या सिद्धतेनें गोट आवळून असलें पाहिजे.

एकाद्या हिंदूला पिराच्या वरप्रसादानें म्हणे मुलगा होतो ! म्हणून तो पिराचा उरूस करण्याकरितां मोठी मशीद बांधून देतो ! आधीं हिंदूनें पिराला

भजणें हा मूर्खपणा होय. त्याच्या प्रसादानें पुत्र होतो असें समजणें गाढवपणा होय, आणि वैयक्तिक समाधानाकरितां त्या पिराची मशीद बांधून देणें व ती भर समाजांत हिंदूंच्या उरावर बांधणें हा अधमपणा होय. पंचमहापातकींहि प्रसंगीं पुरवेल, कारण त्याचें पातक अल्प क्षेत्रांतच आपला प्रभाव दाखवितें. परंतु हा हिंदुसमाजद्रोही मनुष्य इतका अधम आहे कीं, तो आपल्या पापाचा प्रभाव सर्व हिंदूंना भोगावयाला लावितो ! मूर्ख, अजागळ, गचाळ असे जे हिंदू आहेत, त्यांनीं प्राण जातच असेल तर घरांत त्या नवसास पावलेल्या पिराचें अगर फकिराचें स्मरण करावें. परंतु त्याचे देव्हारे जर ते समाजांत माजवूं लागले आणि हिंदूंच्या नाकावर टिचून माजवूं लागले तर त्या नराधमांना हिंदु-समाजानें "आपलें" असें म्हणण्याचें सोडून द्यावें किंवा त्यांना ताळ्यावर आणावें. सर्व जगांत चैतन्य आहे,सर्वत्र परमेश्वर आहे, 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हें जरी खरें असलें तथापि ' सर्प विंचू नारायण । परि ते वंदावें दुरून ' असें श्रीतुकाराम-महाराज सुद्धां म्हणतात. त्यांचा उपदेश लक्षांत वागवून सर्पविंचवांप्रमाणें जो समाज हिंदुसमाजाशीं कित्येक वर्षें वागत आला आहे व वागतो आहे, त्याचे देवहि त्याच जातीचे आहेत असें समजून कोणत्याहि हिंदूनें त्या अहिंदु देवाचें प्रस्थ माजवूं नये, फार काय पण भजनपूजनहि करूं नये, असें शास्त्रदृष्टीनें म्हणतां येतें.

हिंदूनें अहिंदु देवांना भजणें, उत्सवांत भाग घेणें, तामसी देवांना भजणें हें महत्पाप आहे. जसा समाज तसें त्याचें तत्त्वज्ञान व जसा समाज तसे त्याचे देव असा न्याय आढळतो. धर्माच्या नांवाखालीं परधर्मीय मनुष्याची स्त्री, द्रव्य व जीवित ह्यांच्यावर डोळा ठेवणें, तसें करण्यांत पुण्य, मोक्ष आणि स्वर्ग समजणें, हें ज्या धर्मांत आहे आणि समाजांत आहे त्यांचे देव कशा जातीचे असतील हें प्रत्येकानें विचारपूर्वक पाहिलें पाहिजे. सर्व जगांत चैतन्याचें अधिष्ठान आहे, त्या चैतन्याचीं प्रतीकें अनेक आहेत. अर्थात् अशा सात्त्विक, सर्वगुणयुत देवतांची पूजा करण्याचें सोडून पिरांच्या, फकिरांच्या व आणखी त्याच जातीच्या वेडास बळी पडणें हा केवढा वेडेपणा आहे! पुष्कळ अजागळ हिंदु, अहिंदु साधूंच्या नादीं लागतात आणि सर्वस्व गमावतात. आश्चर्याची गोष्ट ही कीं, ३३ कोट देव आणि कांहीं लक्ष साधु हिंदुसमाजांत असतां ते त्यांना पुरत नाहींत म्हणूनच पिरा-फकिरांच्या नादीं लागतात ! समष्टिधर्माप्रमाणें अहिंदु दैवत, अहिंदु साधु,

अहिंदु फकीर यांचें पूजन करणें, उत्सव करणें अत्यंत अनुचित, त्याज्य व अंधतम निरगतिदायक आहे. "येनास्य पितरो याता येन याताः पितामहाः" या वचना-प्रमाणें सर्व हिंदूंनीं हिंदु देवतांचेंच आराधन-पूजन केलें पाहिजे. वाडवडिलांनीं ज्यांच्या उपासनेंत देह झिजविले, तेच देव भक्ती केली तर केव्हां तरी प्रसन्न होतील. अहिंदू व उपरे देव कांहीं बरें करणार नाहींत, म्हणून त्यांचा नाद सोडला पाहिजे.

समष्टिधर्माचें तत्त्व म्हणून **हिंदुसमाजांत समाजबंधुत्व** यावयास पाहिजे. हिंदूनें आपला बंधू कोण आहे? आपल्या संस्कृतीचा कोण आहे ? आपल्या देवधर्माकरितां व संस्कृतीकरितां मरावयास कोण तयार आहेत हें नेहमी पाहून सर्व व्यवहार हिंदु बंधूंशींच केले पाहिजेत. प्रत्येक हिंदूनें '**हिंदु तितका मेळवावा**' हें तत्त्व हृदयांत धारण करून ईश्वराला '**देवा जगीं वाढवि हिंदूधर्म**' अशी प्रार्थना केली पाहिजे.

हिंदुसमाजांत समाजबंधुत्वाचा अभाव असून विश्वबंधुत्वाचा सुकाळ आहे. विश्वबंधुत्व हें समाजाच्या समर्थावस्थेंत उपकारक असतें. कारण,

**सर्वं बलवतां पथ्यं सर्वं बलवतां शुचि ।**
**सर्वं बलवतां धर्मः सर्वं बलवतां स्वकम् ॥** १५-३-२४

असें महाभारतांत म्हटलें आहे. परंतु दुर्बलानें विश्वबंधुत्वाच्या तत्त्वाचा अंगिकार करणें हें सर्वस्वीं घातक आहे. कोणताहि समाज समाजबंधुत्वानें जगतो. हिंदुसमाजांत कुटुंबबंधुत्व आणि जातिबंधुत्व थोडें फार आढळतें, पण समाजबंधुत्व आढळत नाहीं. एक स्वार्थ पाहावा आणि तो सुटला कीं एकदम परमार्थाचा विचार करावा. एक देहावर प्रेम करावें आणि त्याचा कंटाळा आला कीं, एकदम देवाकडे धावावें अशी संवय हिंदुसमाजाला आहे. देह आणि देव यांच्यामध्यें देश आहे. कुटुंबबंधुत्व व विश्वबंधुत्व यांमध्यें समाजबंधुत्व आहे हें हिंदुसमाज जाणत नाहीं. विश्वबंधुत्वाची अवजड कल्पना बाजूस ठेवून समाजबंधुत्वाची सुटसुटित कल्पना आणि त्याचें सद्यःफलदायी तत्त्वज्ञान हें हिंदुसमाजांत यावयास पाहिजे. हिंदु म्हटला कीं, त्याच्या मदतीस धांवणें, त्याला मदत करणें, स्त्रीवर हात टाकला, मूर्तीचा भंग केला, समाजाचा अपमान केला, तर त्याकरितां प्राण गेला तरी बेहेत्तर अशा निर्धारानें पुढें सरसावणें, हे गुण हिंदु-समाजांत आले पाहिजेत. जर कांहीं लोक स्वसमाजाला त्रास देत असतील,

आगळिक करीत असतील, जुलूम व जबरदस्ती करीत असतील तर त्यांचा प्रतिकार हिंदुसमाजानें तावडतोब केला पाहिजे व अशा लोकांशीं सर्व व्यवहार करण्याचें सोडून दिलें पाहिजे.

श्रीमंतांनीं व शेठसावकारांनीं आपल्या घरच्या कोणत्याहि व्यवहारांत परधर्मियांचा संबंध वर्ज्य केला पाहिजे. मोटार ड्रायव्हर, क्लीनर, तगाद्याचा गडी, चपराशी, पट्टेवाला, माळी, न्हावी, धोबी, बागवान, गवंडी, सुतार, गवळी, दुकानदार, टांगेवाला, हमाल, कल्हईवाला, कासार, फेरीवाला, सुतार, सोनार, लोहार, फार काय पण जे जे अनेक व्यवहार व्यवहारांत करावे लागतात ते सर्व **समाजबंधुत्वाच्या दृष्टीनें हिंदूंतच केले पाहिजेत.** सावकारांच्या दुकानांत व घरांत बरेचसे अहिंदु लोक नेमलेले दिसतात. घरांतील बायकामाणसांपर्यंत त्यांचा येजा असते. हें इतकें वाईट आहे कीं, त्याचें विवरण अधिक न केलेलेंच बरें. दिल्लीला ३१-१२-१९२६ रोजीं तबलिक परिषद भरली होती. तिच्या अध्यक्षांनीं मुसलमानांना समाजबंधुत्वानें वागा असें सांगितलें तें असेंः—

That Muslims should take a vow to buy all the requirements from the Muslims alone.

मुसलमान लोक समाजबंधुत्वाकरितां कितां दक्ष आहेत हें वरील उद्गारांवरून अगदीं अडाणी माणसासहि समजून येईल. हिंदूंनीं वरील उद्गारांना केवळ कृतीनें प्रत्युत्तर दिलें पाहिजे. To buy all the requirements from the Hindus alone. वास्तविक हरहुन्नर करणारे हिंदूंतील अठरा पगड जातींचे लोक असतांना मुसलमानांची आवश्यकताच मुळीं उरत नाहीं; मग विनाकारण परधर्मीयांचा विटाळ कशाला? हिंदूंनीं सर्व व्यवहार हिंदूंमध्येंच उरकणें यांत द्वेषाचा, तिरस्काराचा किंवा हिंसेचा कांहीं संबंध नसून त्यांत समाजबंधुत्व व ऐक्य यांचाच संबंध आहे. हिंदुसमाजांत समाजबंधुत्व येण्याला अहिंदूंशीं कोणताहि व्यवहार न करणें हाच मोठा उपाय आहे.

नागपूरसारख्या शहरांत कल्हईवाले, फेरीवाले, खिळेमोळे विकणारे दुकानदार, छत्र्याकुलपें विकणारे, उडविण्याची दारू विकणारे हे सारे पूर्वी मुसलमान असत. पूर्वी अकोल्यास सर्व टांगेवाले मुसलमानच होते. हल्लीं कांहीं टांगे हिंदूंचे झाले आहेत. कल्याण, मुर्तिजापूर, कऱ्हाड, सुरत व बऱ्हाणपूर येथें हिंदु टांगेवाला विरळाच सांपडेल. बऱ्हाणपूर, मालेगांव येथील हिंदु कोष्टी नामशेष

होऊन मुसलमान मोमीनच जिकडे तिकडे वाढत आहेत. तसेंच पुष्कळ गांवीं गवंडी देखील मुसलमानच आहेत. बँड वाजविण्याचा धंदा तर मुसलमानांनींच उपटला आहे. पिण्याची आणि उडविण्याची दारू विकण्याचा धंदा करणारे हिंदु क्वचित्‌च आढळतील. पटवेगार, तांबोळी, बागवान, विणकर, कल्हईवाला, मोटारवाला हे सर्व धंदेवाले पुष्कळ ठिकाणीं मुसलमानच आढळतात. मुसलमानांशिवाय हे धंदे करणारे हिंदु आढळतच नाहींत. कित्येक ठिकाणीं न्हावी, परीट, सुतार, सोनार, बुरूड, बोहरी असे हरप्रकारचे धंदेवाले मुसलमान हिंदु धंदेवाईकांना खालीं बसवून हिंदुसमाजावर चढाई करीत आहेत असें दिसतें. यःकश्चित् कासाराचा धंदा तर शेंकडा ९० हिस्से मुसलमानांच्याच हातीं आहे. * कित्येक गांवांत मुसलमानांनीं असे प्रयत्न चालविले आहेत कीं, मुसलमानसमाजांतील पैसा हिंदुधंदेवाईकांना बिलकुल मिळूं द्यावयाचा नाहीं. अगदीं खालचे धंदे करणारे, मध्यम धंदे करणारे आणि उच्च प्रतीचे धंदेवाले लोक मुसलमानसमाजांत निर्माण होत असून ते हळूहळू हिंदूंना चेपून त्यांवर कुरघोडी करीत आहेत. पुण्यासारख्या शहरांत म्हणजे महाराष्ट्राच्या केंद्रांत लग्नकार्यप्रसंगीं मंडप घालण्याचा धंदाही बुरुडांना बाजूस सारून मुसलमान बळकावीत आहेत. मिरज, सुरत, कल्याण इ. गांवांत मुसलमानांशिवाय दुसरे गवळी थोडे आहेत. त्यांचीं दुधाचीं अस्वच्छ भांडीं पाहिलीं कीं, कांहींना किळस येते. पण म्लेंच्छ गवळ्यापासून दूध घेण्याला हिंदूंना-नव्हे ब्राह्मणांना-कांहींच वाटत नाहीं! सांगली, कऱ्हाड व अशाच कित्येक ठिकाणच्या पेठा कच्छी लोकांनीं व्यापलेल्या आहेत. भुसावळच्या आसपास व भुसावळेंत बत्तासे करण्याचा मक्ता मुसलमानांनींच घेतला आहे. हिंदु हलवाई म्हणे मुसलमानांकडून बत्तासे घेऊन विकतात! पुष्कळ देवालयांच्या आसपास फुलें विकण्याकरितां मुसलमान बसलेले असतात. जत्रेच्या वेळीं हे फुलारी अगदीं देवाजवळ येऊन बसतात व उन्हाळ्यांत फुलें कोमेजूं नयेत म्हणून त्यांवर जसें हातानें पाणी शिंपडतात तसें तोंडानेंहि शिंपडतात!! या असल्या गलिच्छ गोष्टींचा प्रतिबंध तेथल्या तेथें हिंदु करूं शकत नाहींत!

जोडे शिवणारे पुष्कळ ठिकाणीं हिंदू चांभार असले तथापि जोडे विकणारे बहुतेक मुसलमान आहेत. जोडे विक्रीचीं सुबक, व्यवस्थित, थाटामाटाचीं हिंदूंचीं

---

* मुसलमान हिंदु स्त्रियांचे हात धरून बांगड्या भरतो हें दृश्य किती हिडीस आहे. ही चाल अविलंबें बंद केली पाहिजे.

दुकानें फार क्वचित् आढळतील. त्याच्या उलट ब्राह्मणी थाटाचीं फराळाचीं दुकानें मुसलमानांत कोठेंच नसावींत असें वाटलें होतें. पण भुसावळेस एका मुसलमानानें स्टेशनवर नव्हे तर पोस्टाजवळ भर बाजारांत, चिवडा, लाडू, जिलबी, मोतीचूर यांचें ब्राह्मणी थाटाचें दुकान थाटलें असून तेथें विक्रीहि रग्गड होते !

खिळेमोळे, कुलपें, चाकू, कात्र्या असलीं बोहऱ्यांचीं दुकानें बहुतेक मुसलमानांचीं आहेत. हिंदूंचीं कोठेंहि आढळत नाहींत. याचें कारण काय असावें याचा शोध करितां असें कळलें कीं या दुकानाशीं चांभार, महार इत्यादि अस्पृश्य लोकांचा संबंध फार येतो. विशेषतः चांभाराला लागणारा पादत्राणाशीं संबद्ध असा सर्व माल याच दुकानांतून पुरवला जातो. म्हणजे हिंदूंना हीं दुकानें शिवाशिवीमुळें काढतां येत नाहींत. पुष्कळ ठिकाणीं सुगंध्यांचीं दुकानें मुसलमानांचींच आहेत, सुशिक्षित बेकार हिंदु तरुणांनीं त्यांत पडावें कीं नाहीं ? पण या तरुणांत ही दृष्टी नाहीं व धडाडी नाहीं. बडोद्यास एक मोठें विठ्ठल मंदीर आहे-तें बहुतेक सरकारी असावें—कारण काय असेल तें असो; या देवालयाच्या महादरवाज्याच्या दोन्ही बाजूंस म्हणे मुसलमान सुगंध्यांचीं दुकानें आहेत !

हिंदूंच्या कल्पना, भावना, समजुती ह्यांचा फायदा मुसलमान घेतात. पाहिजे तेथें पाहिजे तसलीं दुकानें काढतात. हिंदु गिऱ्हाईकांशीं अत्यंत बेगुमानपणें वागून माल अगदीं भाजून विकून बघतां बघतां गबर होतात. गेल्या दहापांच वर्षांत मुसलमान समाजाच्या व्यापारी हालचाली व आर्थिक घडामोडी अनेक प्रकारानें चालल्या आहेत. त्यांचें निरीक्षण करून तोडीस तोड केल्याखेरीज हिंदुसमाजाचें आर्थिक बल वाढणार नाहीं. हिंदु लोक प्रेतें जाळतात पण प्रेतें जाळण्याचें सामान व प्रेतयात्रेचें सामान विकणें हें अशुभ समजतात. मुसलमान हे हिंदूंच्या या अशुभ कल्पनेचा फायदा घेतात. ते स्मशानांत दुकानें काढतात. प्रेतयात्रेचें सामान पाहिजे तसें महाग विकतात आणि आजाराच्या एकदोन सांथी आल्या म्हणजे काफरांच्या पैशावर अगदीं गब्बर होऊन बसतात. मुसलमान हिंदुस्थानांत आले तेव्हांपासून त्यांनीं हिंदूंच्या धार्मिक समजुतींवर जगण्यास प्रारंभ केला. हें लक्षांत घेऊन यापुढें तरी हिंदूंनीं, सर्व आर्थिक क्षेत्रें व्यवस्थितपणें आपलींशीं केलीं पाहिजेत. चिंचवडास पुष्कळ हिंदु यात्रा जमते. तेथें एकच मुसलमान बोहरी आहे. तो कुलपाच्या किंमतीइतकी नुसत्या किल्लीची किंमत घेतो

म्हणे ! म्हणून सर्व यात्रेकरू त्याच्या नांवें बोटें मोडतात, पण चिंचवडचा एकादा हिंदु तरुण बोहऱ्याचें दुकान घालीत नाहीं हें आश्चर्य नाहीं काय ?

ब्राह्मणेतर समाजावर पठाणांची सावकारी अत्युत्तम चालते. हिंदूंचे उद्योग-धंदे आधीं इंग्रजांनीं बुडविले व आतां ते मुसलमान बुडवीत आहेत. अशा वेळीं हिंदूंनीं एकूण एक धंदे आपलेसे केले पाहिजे व पाहिजे तो धंदा करण्यास धडाडीनें जर हिन्दु पुढें येतील तरच दुबळ्या हिन्दुसमाजाचा जो आर्थिक ऱ्हास होत आहे तो थोडा तरी थांबेल. बेकार सुशिक्षित हिन्दु तरुणांनीं जरा व्यवहाराचें निरीक्षण करावें, म्हणजे त्यांना पंचवीस पासून दोनशें भांडवलावर करितां येण्यासारखे शेंकडों धंदे आढळतील. मुसलमान तर हिन्दूंचे धंदे बुडविण्याकरितां बद्धपरिकर झालेले दिसतात तेव्हां हिन्दूंनीं जशास तसें असें वर्तन करावयास नको काय ? ध्वनीस प्रतिध्वनी, शेरास सव्वाशेर, आघातास प्रत्याघात आणि “ अरेस कारे ” असा सृष्टीचा धर्म आहे. या धर्मास अनुसरून हिन्दुसमाजानें जीवनाचा मार्ग चोखाळला पाहिजे. झाडून सर्व धंदे, एकूण एक उद्योग, सर्व कलाकौशल्य हिन्दु-बंधूंच्या हातीं यावें असा उद्योग समाजबंधुत्वाच्या दृष्टीनें प्रत्येक हिन्दूनें केला पाहिजे.

मुसलमानांचा ब्यांड लावून हिंदूनें आपलें मंगलकार्य करणें हें अत्यंत अधर्म्य नव्हे काय ? धर्मकार्यांत आणि मंगलकार्यांत अविंधाचा, म्लेंच्छांचा संबंध कशाला ? ब्यांड हें रणवाद्य लावावयाचेंच जर असेल तर हिंदु ब्यांडवाला अवश्य पाहिजे असा आग्रह हिंदूंच्या ठिकाणीं दिसला पाहिजे. मंगलकार्याचा मंडप हिंदूंनींच उभारावा, अहिंदूचें तेथें दर्शन नको, मुसलमान गवळ्याच्या दुधांत काय असेल आणि काय नसेल, दूध काढण्याच्या भांड्यांत काय शिजविलें असेल व नसेल हें कांहीं सांगतां येणार नाहीं. म्हणून खाण्यापिण्याच्या वस्तूंचा व्यवहार हिंदूंनीं मुसलमानांशीं बिलकुल करतां कामा नये. हिंदु स्त्रियांच्या हातांत गोमांसभक्षकानें बांगड्या भरणें यासारखी लज्जास्पद स्थिति कोणती ? गोमांसभक्षकाकडून बांगड्या भरवून न घेतां त्या **हिंदु कासारणीकडूनच** भरून घेतल्या पाहिजेत, किंवा स्वतः तरी भरल्या पाहिजेत. दिपवाळीच्या सणांत उडविण्याची दारू हिंदु मक्तेवाल्याकडूनच विकत घेतली पाहिजे. तशी न मिळाली तर दारू उडविणार नाहीं अशी प्रतिज्ञा हिंदु मुलांनींहि केली

---

१. शेतकी कुणब्याकडे व कारकुनी ब्राह्मणाकडे सोपवून मधले उडाणटप्पु धंदे झाडून मुसलमानांकडे चालले आहेत.

पाहिजे. ज्या भांड्यांत आपण जेवतों, त्या भांड्याला कल्हई कोण लावतो ? ज्या बैठकीवर मी बसतों ती बैठक कोण करतो, जें दूध मी पितों तें कुणाकडून येतें व कोण आणून देतो, जी भाजी मी खातों, जीं फळें, फुलें, विडयांचीं पानें मला लागतात त्यांचा व हिंदूंचा कांहीं संबंध आहे कीं नाहीं अशी सर्व चौकशी प्रत्येक हिंदूनें वेळोवेळीं करावयास पाहिजे. देवावर फुलें घालावयास पाहिजेत खरीं, पण तीं जर गोमांसभक्षकाच्या दुकानांतून आणलीं तर देवाला कशीं पोंच-तील ? असा सर्व बारकावा हिंदूंमध्यें येऊं लागला कीं, आपोआप समाजबंधुत्वाचें तत्त्व हिंदूंना समजूं लागेल व समाजबल वाढेल.

कोणताहि अर्थोत्पादक धंदा करण्यास देशकालपरिस्थितीप्रमाणें शास्त्राची अडचण नाहीं, ही पहिली समजूत हिंदुसमाजांत आली पाहिजे. नाहीं तर कोठें धडाडीचा अभाव, तर कोठें धर्मशास्त्राची अडचण व कोठें मनाची कुचंबणा यामु-ळेंच हिंदूंची गळचेपी होत आहे. मुसलमानांचें तोंड येवढें मोठें कीं, त्यांत पाहिजे तें मावतें आणि हिंदूचें येवढें संकुचित आहे कीं त्यांत कांहींच मावत नाहीं ! सारांश, हिंदुसमाज हा पथ्याखालींच मरत आहे, तर मुसलमान समाजाला कसलेंच पथ्य नाहीं म्हणून तो सर्व गिळतो आहे.

अडाणी हिंदुसमाज हा नवीन नवीन धंद्यांत एकदम पुढें येत नाहीं. अशा वेळीं सुशिक्षित हिंदु तरुणांनीं पुढें येऊन हल्लींच्या या बेकार स्थितींत विविध धंदे बळकावले पाहिजेत. सर्व व्यवहार हिंदूंशीं आणि हिंदूंमध्येंच जर उरकावयाचे अस-तील, तर अहिंदूंशीं जसा संबंध सोडला पाहिजे तसाच तो हिंदूंशीं अधिक वाढ-विण्याकरितां हिंदूंमध्यें सर्व तऱ्हेचे धंदे उत्पन्न केले पाहिजेत. प्रत्येक धंद्यांत हिंदु माणसें दिसलीं पाहिजेत. हिंदुसमाजाशेजारीं राहून हिंदूंच्या पैशावर जगून त्याजवरच चढाई करणाऱ्या मुसलमान समाजाला ताळ्यावर आणण्याचा आणि हिंदुसमाजांत उद्योगधंदे वाढविण्याचा समाजबंधुत्व हा एकच मार्ग आहे. गांवांतला एखादा वळू मस्त झाला म्हणजे लोक त्याला चारापाणी देण्याचें बंद करतात. तसें केलें म्हणजे तो लवकर ताळ्यावर येतो. हिंदूंनीं समाजबंधुत्व वाढवून उद्योगधंदे निर्माण करून सर्व व्यवहार हिंदूंमध्येंच करावयाचे असें ठरविलें म्हणजे हां हां म्हणतां शेजारचे समाज ताळ्यावर येतील. समष्टिधर्मांतील समाजबंधुत्वाचें तत्त्व हिंदु समाजाच्या नसानसांत जितकें लवकर भिनेल तितकें हें कार्य अति शीघ्र होणार आहे.

समष्टिधर्माच्या दृष्टीनें यापुढें हिंदुसमाजाचें **तत्त्वज्ञान चढाईचें आणि आक्रमशील** असें पाहिजे. कोणताहि समाज चढाईच्या तत्त्वज्ञानानेंच जयिष्णु होतो. समाजाची वाढ बचावानें व सहनशीलतेनें केव्हांहि होऊं शकत नाहीं. सहिष्णुता व बचाव या गोष्टी मुमूर्षु समाजांत आधिक्यानें आढळतात. परंतु जिवंत समाजाचें तत्त्वज्ञान त्याच्या अगदीं उलट असतें. हिंदुधर्म हा सहिष्णु आहे, सहिष्णुत्व हा हिंदुसमाजाचा स्वभाव आहे, असें जें म्हणण्यांत येतें तें हल्लींच्या परिस्थितीच्या दृष्टीनें थोडेंसें खरेंहि आहे. पण वैदिक आर्यस्वभाव हा जयिष्णु बाण्याचा आहे. हिंदुस्थानासारख्या मोठ्या राष्ट्रांत आणि जगांतहि आर्यांच्या संस्कृतीचे ठिकठिकाणीं जे अवशेष आढळतात ते जर त्यांचें बचावाचें धोरण असतें तर कधींहि आढळले नसते. सारांश, हिंदुसमाजाला आर्यांच्या चढाईच्या तत्त्वज्ञानाची आवश्यकता आहे.

हल्लीं ' **शठं प्रति शाठ्यं** ' आणि ' **शठं प्रति सत्यं** ' अशीं दोन तत्त्वें लो. टिळक व महात्मा गांधी यांनीं प्रतिपादिलेली हिंदुसमाजापुढें आहेत. या दोन तत्त्वांनीं जगांतील व्यवहाराचें प्रतिपादन केलेलें आहे. हीं दोन्हीं तत्त्वें सर्वांशीं सारखींच लागूं पडतील असें नाहीं. कारण एखादा शठ सत्यानें वश होतो तर दुसऱ्याला ताळ्यावर आणण्याकरितां शाठ्याचाच अवलंब करावा लागतो. म्हणजे शठाच्या मनोवृत्तीच्या अपेक्षेनें शाठ्य किंवा सत्य हे दोन्ही उपाय प्रसंगानुसार उपयोगांत आणावे लागतात. सरसकट " बारा टक्के " असें करून चालत नाहीं. परंतु चढाईच्या दृष्टीनें हीं दोन्ही तत्त्वें कुचकामाचीं आहेत. '**शठंप्रति शाठ्यं**' आणि '**शठंप्रति सत्यम्**' या दोन्ही तत्त्वांत आधीं शठाची अपेक्षा आहेच म्हणजे शठानें तोंडांत मारल्यावर किंवा कांहीं डाव केल्यावर शाठ्यानें बचाव करावा कां सत्यानें बचाव करावा एवढाच काय तो प्रश्न आहे. **दोन्ही तत्त्वांत बचाव** आहे. दुसऱ्यानें तोंडांत लगावल्यावर सहन करून बचाव करावा कां दोन भडकावून करावा इतकाच विचार वरील तत्त्वांत आहे. म्हणजे दुसऱ्यानें ठोकल्यावर जिवंत राहिल्यास कसें वागावें हें तीं तत्त्वें सांगतात. शठास आधीं ठोकण्यास तीं सांगत नाहींत. आधीं तूं लगाव, आधीं तूं भडकाव, अशी चढाई दोन्ही तत्त्वांत नाहीं. हिंदुसमाजामध्यें आधीं आगळीक करण्याचें, आरोपी होण्याचें, प्रतिवादी होण्याचें, तत्त्वज्ञान यावयास पाहिजे. जगाला सांगण्यासारख्या आत्म्याचें अमरत्व, पुनर्जन्म आणि तत्त्वज्ञानजन्य मनःसमाधान इत्यादि पुष्कळ गोष्टी हिंदु-

समाजाजवळ आहेत. म्हणून हिंदुसमाजानें अभिनिवेशानें तसें तत्त्वज्ञान निर्माण केलें पाहिजे. दुसऱ्यानें आधीं आगळिक केल्यावर कसें वागावें हा विचार करणारा समाज जगांत फार दिवस जगूं शकणार नाहीं. दुसरा आपली आगळीक न करील, आपल्या वाटेस न जाईल, आपल्या कोणत्याहि वर्मावर घाव घालूं शकणार नाहीं अशी तयारी हिंदुसमाजानें करावयास नको काय ? आधीं आगळीक, आधीं शहाणपणा, आधीं उपदेश, आधीं चढाई, हिन्दुसमाजानेंच करावयास शिकलें पाहिजे. कारण जगांत अत्यंत प्राचीन, सुसंस्कृत आणि जिवट समाज असा हिन्दुसमाजच आहे. हिन्दुसमाजाच्या ठिकाणीं जगाला देण्यासारखें तत्त्वज्ञान आहे व जगांत शांतता, समता आणि बंधुत्व आणण्यासारखी सिद्धांत-संपत्ती आहे. तेव्हां त्या संपत्तीच्या जोरावर हिंदुसमाजानें सात्त्विक चढाई करून आपलें अस्तित्व जगांत ठसठशीतपणें अवश्य दाखविलें पाहिजे. हिंदु-समाज हा जिवंत समाज आहे, याचा जिवंतपणा जागतिक स्पर्धेत सिद्ध करून दाखवावयाचा आहे, असें हिंदुसमाजाला वाटलें पाहिजे आणि हें ध्येय सिद्ध करण्याकरितां आक्रमशीलतेचें, आटोपाचें म्हणजे चढाईचें तत्त्वज्ञान स्वीका-रलें पाहिजे. आजपर्यंत बचावाच्या, सहिष्णुतेच्या, शांततेच्या धोरणाचा अनुभव हिंदुसमाजाला चांगलाच आलेला आहे. महाभारतीय युद्धानंतर आणि गौतम-बुद्धाच्या क्रांतीपासून काय काय* घडलें, ते कशानें घडलें, याची साक्ष इतिहासांत सुस्पष्ट मिळत असतां आतां डोळेझांक करण्यांत मुळींच अर्थ नाहीं. हिंदुसमाजाला (Dying race) मुमूर्षु समाज असें म्हणण्यापर्यंत पाळी आलेली आहे. Hindu is not a dying race, but a living race हें सिद्ध करण्या-करितां समष्टिधर्मात चढाईचें तत्त्वज्ञान आणलें पाहिजे.

समष्टिधर्मातील मुख्य तत्त्वांचें विवेचन येथपर्यंत झालें. शेवटीं हिंदुसंघटनेला अत्यंत उपयुक्त अशी कांहीं सूत्रें देऊन ग्रंथाची पूर्णता करितों.

१. आसिंधुसिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका
पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिंदुरितिस्मृतः ।

ही हिंदु शब्दाची बॅ. सावरकरप्रणीत व्याख्या रूढ करावी.

२. शीख, जैन, लिंगायत, मानभाव, आर्यसमाजी, नेपाळी व सनातनी हे सर्व हिंदूंतील पोटभेदच आहेत.

* ' आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष ' पूर्वार्ध, शेवटचें प्रकरण पाहा.

३. हिंदुत्व हें संस्कारांकित आहे. प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषाचें उपनयन ( विद्यारंभ ), विवाह व अंत्येष्टी वेदमंत्रांनीं व्हावेत.

४. सर्व हिंदूंना वेदाधिकार आहे. शास्त्रोक्त संस्कार करण्यास मदतनीस म्हणून कोणताहि तज्ज्ञ हिंदु पुरोहित बोलवावा.

५. सूर्य हें सर्व हिंदूंचें अनादि दैवत म्हणून त्याची उपासना संधिकालीं निदान पांच पांच वेळ गायत्री जप करून करावी. राम, कृष्ण, हनुमान, विठ्ठल, इत्यादि दैवतें परब्रह्माचीं प्रतीकें म्हणून उपास्य समजावीं व त्यांचे महोत्सव वाद्यें वाजवून मोठ्या मिरवणुकी काढून करावेत. या देवतांचें दर्शन गाभाऱ्याबाहेरून सर्वांनीं घ्यावें.

६. हिंदुमात्राचा गीता हा एकच तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे. प्रत्येक हिंदूनें गाय, गीता, गंगा व तुळस हीं पवित्र व पूज्य मानावीं व वडिलमातुश्रींचें मरणोत्तर श्राद्ध करावें.

७. प्रत्येक हिंदूनें स्थानिक हिंदु सभेचा सभासद होऊन हिंदु महासभेच्या कार्याकडे सारखें लक्ष ठेवावें.

८. प्रत्येक हिंदूनें धर्माचा प्रचारक व रक्षक या नात्यानें धर्मरक्षणार्थ मारीत मारीत मरण्याची वृत्ति ठेवावी.

९. प्रत्येक हिंदूनें स्वतः व्यायाम करावा, लाठीकाठीचें शिक्षण घ्यावें व मुलामुलींना तें अवश्य द्यावें.

१०. प्रत्येक हिंदूनें धर्म, राष्ट्र व समाजहितपोषक अशा ठिकाणींच दानधर्म करावा.

११. प्रत्येक हिंदूनें कोणत्याहि हिंदूच्या प्रेतयात्रेबरोबर चार पावलें जावें. आप्त, इष्ट, गोत्रज, स्नेही यांव्यतिरिक्त प्रेत असल्यास स्नानाची आवश्यकता नाहीं.

१२. सर्व हिंदु स्त्रीपुरुषांनीं वर्षांतील कांहीं सण सामुदायिक पद्धतीनें पाळावेत. वर्षांतून दोन वेळां स्त्रियांचें सामुदायिक हळदकुंकू व्हावें

आणि सर्व हिंदु स्त्रीपुरुषांनीं महिन्यांतून दोन वेळां म्हणजे एकादशीस एकत्र जमून सामुदायिक वैदिक प्रार्थना करावी.

१३. सर्व हिंदूंनीं विश्वबंधुत्वाची अवघड कल्पना टाकून समाज व बंधुत्वाची सवघड कल्पना डोळ्यांपुढें ठेवून सर्व व्यवहार शक्य तों हिंदु बंधूंशींच करावेत.

१४. धार्मिक, सामाजिक व घरगुती व्यवहारांत अहिंदूंचा संबंध आवर्जून टाळावा.

१५. हिंदु स्त्रियांनीं अहिंदु स्त्रीपुरुषांकडून दूध घेऊं नये, कल्हई करून घेऊं नये, कुंकू, बुक्का, फुलें, नाडापुडी वगैरे पूजासाहित्य विकत घेऊं नये व विशेषतः बांगड्या त्यांच्याकडून कधींहि भरून घेऊं नयेत.

१६. हिंदूंच्या घरांत फकीर, फेरीवाला, आवलिया, खरखरमुंडे या नात्यानें अहिंदूंचा प्रवेशहि नसावा.

१७. कोणत्याहि हिंदु स्त्रीपुरुषानें पिराफकिराच्या नादीं लागूं नये, उरूसास जाऊं नये व ताबुतांत भाग मुळींच न घेतां मोहरमच्या सणांत गाफील न राहतां प्रतिकारासिद्ध असावें.

१८. सहिष्णु वृत्तींचें तत्त्वज्ञान सोडून जयिष्णु तत्त्वाचा अंगीकार करावा.

१९. धार्मिक व सामाजिक दृष्ट्या स्त्रीपुरुष हीं एकमेकांचीं पूरक आहेत, म्हणजे तुल्यबल आहेत.

२०. हिंदुसमाजांतील सर्व जाति धार्मिक व सामाजिक दृष्ट्या सारख्या आहेत, म्हणजे जन्मानें कोणतीहि जाति श्रेष्ठ नाहीं, कनिष्ठ नाहीं, स्पृश्य नाहीं व अस्पृश्य नाहीं.

२१. वाईट रोग, दुर्वर्तन, समाज व राष्ट्रद्रोह ह्या पापामुळें व्यक्तीला अस्पृश्यता येते व विद्या, द्रव्य, कर्तृत्व, शील, त्याग यांमुळें व्यक्तीला श्रेष्ठपणा येतो.

२२. आजचा हिंदुसमाज वर्णबद्ध नसून जातिबद्ध आहे. मुख्य जातींच्या अनेक पोटजाती अनीश्वर व कृत्रिम कारणांनीं झालेल्या आहेत. म्हणून पोटजातींचें एकीकरण अतित्वरया करावें. सर्व जाति मोडण्याची अनिष्ट व अधर्म कल्पना हिंदूंनीं मनांतहि आणूं नये.

२३. हिंदु आईबापांच्या पोटीं जन्मलेला मनुष्य छलबलानें व अज्ञानानें अगर कोणत्याहि कारणानें अहिंदु होतच नाहीं. जो बाटतो तो हिंदु नव्हे व बिटाळतो तो देव नव्हे हें तत्त्वज्ञान लक्षांत ठेवावें.

२४. सर्व सज्ञान हिंदु स्त्रीपुरुषांनीं परस्परांशीं बोलतांना " आहो जाहो " असा शिष्टप्रयोग करावा.

२५. प्रत्येक हिंदूनें शकुन, ज्योतिष, दैववाद, कालि, अवतारवेड व निवृत्तिपर वेदांत इत्यादि कारणांनीं आलेलें मनोदौर्बल्य घालवावें.

२६. शास्त्र व शास्त्रकार यांच्या अपौरुषेय कल्पनेला न बुजतां आस्तिक बुद्धीनें त्यांचा अभ्यास करावा.

२७. पापपुण्य, स्वर्गनरक यांविषयीं तारतम्यानें व्यवहार्य कल्पना मनांत बाळगाव्या.

२८. जगत् हें मिथ्या म्हणजे खोटें नसून तो चैतन्याचा विकास आहे. जगत्चक्र चालविण्याकरितां प्रत्येकानें नियत कर्तव्य केलें पाहिजे. हें हिंदुधर्माचें पहिलें तत्त्व आहे.

२९. धैर्य व निर्भयता हें हिंदु धर्माचें दुसरें तत्त्व आहे. हीं दैवी संपत्तीचीं लक्षणें अंगीं बाणवून प्रत्येक हिंदूनें जगांत विजय संपादन करावा.

३०. आत्मा अमर व देह नश्वर हें हिंदु धर्माचें तिसरें तत्त्व आहे. पुनर्जन्माची निश्चिती एकटा हिंदु धर्मच देतो. यास्तव प्रत्येक हिंदूनें स्वधर्म, स्वसमाज, स्वदेवता, स्वराष्ट्र, स्वाभिमान व स्त्रियांचे पातिव्रत्य यांकरितां मारण्यास व मरण्यास तयार असलेंच पाहिजे.

३१. तत्त्वज्ञानजन्य मनःसमाधान हें हिंदु धर्माचें चौथें तत्त्व आहे. सर्व जगत् ब्रह्म आहे हा सिद्धान्त जगाला हिंदुसमाजानें शिकविला पाहिजे. या तत्त्वज्ञानाचा प्रसार जगांत करण्याचा अधिकार हिंदूंनाच आहे.

## उपसंहार

पूर्वार्ध व उत्तरार्थ मिळून अठरा प्रकरणांमध्यें हिंदुसमाजाला मानसिक, शारीरिक, सामाजिक व आर्थिक दृष्टया कसें समर्थ करितां येईल हा विचार केला. ग्रंथांतील विषय धर्म व समाजसंबद्ध असा आहे. त्याचा विचार प्राचीन परंपरा, शास्त्रकारांचें धोरण व सद्यःपरिस्थिति यांचा समन्वय करूनच केला आहे. हिंदुसमाजरूपी विराट पुरुषाच्या चरणीं मालेच्या प्रथम पुष्पाची ही द्वितीयावृत्ति अनन्यभावानें अर्पण करितों. जनताजनार्दन प्रसन्न होऊन या पुष्पाची लाखोली वाहाण्यास जेव्हां आज्ञा करील तोच सुदीन ! प्रभुकृपेनें हिंदुसमाज समर्थ व्हावा व त्यानें विश्वाला आर्य करावें अशी भक्तिभरानें प्रणिपातपूर्वक जगन्नियंत्याची प्रार्थना करून हा ग्रंथ येथें पूर्ण करितों.



पुढील महत्त्वाचें पुस्तक

# ब्राह्मणजातिहितविचार

हिंदुसमाजाचा अभ्यास म्हणजे जातींचा अभ्यास होय. एकाद्या पुढारलेल्या जातीचा अभ्यास सूक्ष्मपणें केला म्हणजे इतर जातींविषयीं अंशतः तींच अनुमानें उपयोगी पडतात. या दृष्टीनें आम्ही ब्राह्मण जातीचा जो वैदिक व स्मार्त वाङ्मयाधारें अभ्यास केला, स्वधर्म व संस्कृतीच्या उद्धारार्थ काढलेल्या ब्राह्मण-जातीय संस्थेंत चालक या नात्यानें दहा वर्षें जो अनुभव घेतला आणि प्राज्ञपाठशाळेचा प्रचार करितांना ब्राह्मणसमाजाचें जें निरीक्षण केलें; त्या सर्व दृष्टींनीं हा ग्रंथ तयार होणार आहे. ब्राह्मण जातीचा आजपर्यंतचा इतिहास कसा आहे, या जातीची सद्यःस्थिति काय आहे व भविष्य काळांत या जातीनें स्वधर्म व स्वराष्ट्रदृष्टीनें कसें हित साधावें याचें मार्मिक, सप्रमाण आणि हृदयंगम विवेचन या ग्रंथांत येईल. प्रत्येक ब्राह्मणानेंच नव्हे तर हिंदूनें सुद्धां हा ग्रंथ अवश्य संग्रहीं ठेवावा. आगाऊ नांवें नोंदल्यास ग्रंथ मिळ-ण्याची पंचाईत पडणार नाहीं. किंमत अंदाजी रुपाया.

# हिंदुसमाजांतील स्त्रिया

समाजाचे मुख्य घटक स्त्रिया व पुरुष हे होत या दोन घटकांत परस्पर उदार आणि विश्वासाचे विचार असावयास पाहिजेत. परंतु दुर्दैव हिंदुसमाजाचें कीं, गेल्या हजार दीड हजार वर्षांत स्त्रियांविषयीं एकांगी व अनुदार विचार पुढें आलेले आहेत. यापुढें अस्पृश्य लोक स्पृश्यांचा जुलूम जसा सहन करणार नाहींत, ब्राह्मणेतर स्पृश्य हिंदु ब्राह्मणांचा जन्मसिद्ध मोठेपणाचा जुलूम जसा सहन करणार नाहींत; त्याप्रमाणें स्त्रियाहि पुरुषांनीं केलेले भलते आरोप ऐकणार नाहींत ! गृहिणी म्हणजेच गृह. गृहापासूनच कुटुंब, जाति, समाज व राष्ट्र यांचा उद्भव होतो. स्त्रियांना समाजांत गृहिणी, माता व पतिव्रता या दृष्टींनीं किती महत्त्व आहे व त्यांचें स्थान कुठें आहे हें अवश्य कळलें पाहिजे. या ग्रंथांत स्त्रियांच्या सर्वांगीण उन्नतीचा विचार होणार असल्यामुळें प्रत्येक साक्षर स्त्रीच्या हातांत देण्याजोगें हें एकच एक पुस्तक होईल.

याची किंमत अंदाजी बारा आणे. आगाऊ नांव कळविण्यास विसरूं नये.

# हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमाला

उद्देश--१. हिंदुसमाजाच्या भावी धार्मिक, सामाजिक व राष्ट्रीय उद्धाराला पोषक असें वाङ्मय प्रसिद्ध करणें. २. हें वाङ्मय भरपूर लोकाश्रय मिळाल्यास मुद्रणमूल्यावर किंवा विनामूल्य देणें.

विनंति—या सदुद्योगास एकदम २५ रुपये देऊन शाश्वत ग्राहक होऊन साह्य करावें. संपन्न हिंदूंनीं एकदम शंभर रुपये देऊन हितचिंतक व तीनशें रुपये देऊन आश्रयदाते व्हावें अशी त्यांना विनंति आहे.

आजवरचें कार्य—

१. हिंदुसमाज समर्थ कसा होईल? आवृत्ति २ री, किं. १ रु.
२. ब्राह्मण पोटजातींचें एकीकरण पूर्वार्ध व उत्तरार्ध किं. १॥ रु.
३. आर्यसंस्कृतीचा उत्कर्ष व अपकर्ष, किंमत १ रुपाया.

अशीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

मालेचीं पुढील पुस्तकें:—

(१) ब्राह्मणजातिहितविचार (२) हिंदु समाजांतील स्त्रिया (३) आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष (उत्तरार्ध) (४) सनातनधर्मप्रदीपाचें खंडण (५) हिंदुधर्मशिक्षण पुस्तक ३ रें व ४ थें (६) भारतीय विद्यार्थिधर्म.

पत्रव्यवहाराचा पत्ता—महादेवशास्त्री दिवेकर,
हिंदुसमाजोद्धारक कार्यालय, पोष्ट-वाई (जि. सातारा).